# उजाडलं! पण सूर्य कुठें आहे?

[ स्वातंत्र्यापूर्वीच्या दीड वर्षांत व नंतरच्या सहा महिन्यांत देशाच्या राजकारणांत घडलेल्या विलक्षण घटनांची आणि कांहीं व्यक्तींच्या वाट्याला आलेल्या सुखदुःखांची हृदयंगम कहाणी ]

ना. सी. फडके

आवृत्ति दुसरी

एप्रिल १९५१.



किंमत रु. ५

अंजलि प्रकाशन लिमिटेड

प्रकाशन तिसरें

एकमेव विक्रेते : ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४

## —: फडके साहित्य :—

### कादंबऱ्या

१ अल्ला हो अकबर
२ कुलाब्याची दांडी
३ जादूगार
४ दौलत
५ अटकेपार
६ निरंजन
७ कलंक शोभा
८ आशा
९ उद्धार
१० काश्मिरी गुलाब
११ प्रवासी
१२ समरभूमि
१३ उन्माद
१४ गुप्त प्रायश्चित्त
१५ इंद्रधनुष्य
१६ प्रतिज्ञा
१७ वादळ
१८ शाकुंतल
१९ अखेरचं बंड
२० बस नंबर बारा
२१ जीवनसंगीत
२२ माझा धर्म
२३ झंझावात
२४ अंजलि
२५ जेह्लम
२६ पतंग
२७ हंसू आणि आंसू
२८ उजाडलं! पण सूर्य कुठें आहे!
२९ भरतीची लाट
३० खेळणीं

### प्रबंध

१ मानसोपचार
२ मानसोन्नति
३ सुखाचे संसार
४ संतति नियमन
५ आजचे तरुण स्त्री-पुरुष
६ प्रतिभासाधन
७ वाङ्मयविहार
८ आधुनिक गीता
९ मानसमंदिर
१० साहित्य व संसार
११ मनोहरची आकाशवाणी
१२ वेचलेले मोती
१३ टाकीचे घाव
१४ टांकाच्या फेकी
१५ माझ्या साहित्यसेवेंतील स्मृती
१६ कोंदणें
१७ शेलापागोटें

### नाट्य

१ युगांतर
२ संजीवन

[ पुढील पानावर चालू

३ तोतया नाटककार
४ काळे गोरे
५ जानकी
६ जडावाची देवी ( नाटिका )
७ आगलावी ( ,, )
८ क्षमेसाठीं अपराध ( ,, )

**गोष्टी**

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ ,, ,, ,, ,, भाग २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनदार गोष्टी
५ उल्हासकथा
६ वत्सला आणि इतर गोष्टी
७ चंद्रा आणि इतर गोष्टी
८ लाडकी लक्ष्मी आणि इतर गोष्टी
९ माझा देश आणि इतर गोष्टी
१० जिवाचं मैतर
११ बाजुबंद
१२ अत्तरगुलाब
१३ मागं वळून पाहूं नकोस
१४ अभ्यंगस्नान

**ललित-गद्य**

१ गुजगोष्टी
२ नव्या गुजगोष्टी
३ धूम्रवलयें
४ अबोलीच्या गोष्टी
५ मैफल
६ कमलपत्रें

**चरित्रें**

१ दादाभाई नौरोजी
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी व्हॅलेरा
४ तीन थोर देशभक्त
५ लोकमान्य टिळक

**व्याख्यानें**

१ गाजलेलीं भाषणें
२ मित्र हो !
३ मंथन
४ खाडिलकरांच्या नाट्य-कृती
५ किर्लोस्कर, देवल आणि गडकरी

**काव्य**

१ रुमझुम

**अिंग्रजी**

1 Sex Problem in India
2 Psychology
3 Social Psychology
4 Elements of Ethics
5 History of Philosophy
6 Manual of Logic
7 Birth Control
8 Leaves in the August Wind ( A Novel )
9 Birth Pangs of New Kashmir
10 Sun beams and Shadows ( Stories )
11 India Vs. Commonwealth Tests 1950-51

# प्रकरण पहिलं

बाहेर उषःकालाचा उजेड चोरट्या पावलांनीं पसरूं लागला होता. चार महिन्यांपूर्वी घरांत आलेली इनामदारांची सून उषा हातांत रिकामी चरवी घेऊन एका वाकड्या तिकड्या खांबाला टेकून गोठ्यांत उभी होती.

चुन्यानं न सांधलेल्या दगडी भिंतीच्या एका कोनाड्यांत रॉकेलचं डबडं जळत होतं, त्याचा तांबुस उजेड गोठ्यांत पडला होता. गाई-म्हशींच्या बैलांच्या आणि पारड्यांच्या सावल्या हालत होत्या त्यांकडे पाहिलं कीं वाटत होतं, बाहेरच्या झाडांच्या फांद्यांप्रमाणें या सावल्याहि हालविण्याचा खेळ वारा करीत होता. एखाद्या जनावरानं मधूनच हास-डून मारलेली लाथ, गाईम्हशींच्या तोंडांत भरडला जाणारा कडबा, गुरांच्या गळ्यांतल्या घंटा, एका नाठाळ खोंडाच्या मानेला बांधलेलं खालच्या फरशीवर घरंगळणारं लाकडी लोढणं, म्हशीची धार काढणाऱ्या दादूच्या कासंडींत आणि उषाच्या सासूबाई आक्कासाहेब गाय पिळीत होत्या त्यांच्या छोट्या चरवींत पडणाऱ्या धारा—यांचे आवाज गोठ्यांत भरून राहिले होते. शेणामुताचा, कडब्याचा, आणि बाहेरून येणारा पाऊसपाण्यानं भिजलेल्या मातीचा वास सुटला होता. आक्कासाहेबांची छोटी चरवी भरली कीं ती घरांत न्यायसाठीं घेऊन रिकामी चरवी त्यांच्या-पुढें करण्याच्या तयारीनं खांबाला किंचित् टेकल्यासारखं करून उषा उभी होती. मधूनच तिला जांभई येत होती, व ती आली कीं सासूबाईंच्या लक्षांत ती येऊं नये म्हणून तिचा आवाज होऊं न देतां आपल्या उजव्या पंजानं ती तोंड झाकीत होती. म्हशीच्या आणि गाईच्या धारांचे भांड्यां-तल्या दुधांत पडतांना होणारे चळक चळक असे आवाज ऐकतां ऐकतां तिला मधूनच एकदम हळूच झोप येत होती. डोळे न मिटण्याचा ती कसोशीनं प्रयत्न करीत होती. परंतु तिचे डोळे उघडे राहिले तरी तिच्या मनावर नाजुक झापड आल्यासारखं होत होतं, आणि झोपेंत स्वप्न पडावं

त्याप्रमाणें तिचं मन नंदगढच्या लहानशा टेकडीवरच्या इनामदारांच्या वाड्यांतल्या त्या गोठ्यांतून बाहेर पडून दूर तिच्या माहेरीं जात होतं.

त्या घरांत ती इतक्या लवकर एक दिवस देखील उठली नव्हती. उन्ह चांगलीं वर आल्यानंतर आईनं दहादां हांका माराव्या, शेवटीं धाकट्या भावानं तिच्या अंगावरचं पांघरूण खसूदिशीं ओढून काढावं, तेव्हां कुठें तिनं उठावं, असा तिच्या उठण्याचा समारंभ वाजत गाजत रोज होत असे. स्वयंपाकघरांत जाऊन तिनं चटईवर मांडी घालावी, तिला पाहतांच जवळ येणाऱ्या दोन्ही मांजरांना उचलून एकत्र घट्ट पोटाशीं धरावं, आणि जांभया देत आईला म्हणावं, 'चहा दे कीं लवकर'. तिच्या आईनं म्हणावं, "अग पण न्हाणीघरांत जाऊन तोंडबिंड धुशील कीं नाहीं ?" तिनं म्हणावं, "तोंड मग धुईन, आधीं चहा दे बाई." तिच्या आईनं चहाचा गरम पेला तिच्यापुढें ठेवतांना म्हणावं, "सासरीं गेलीस कीं असा चहा मिळणार आहे तुला ?"

उषा म्हणे, "म्हणूनच माहेरीं आहें, तंवर करून घेऊं दे मला ही मिजास. अन् आई, मी ज्याच्याशीं लग्न करीन त्याला सांगेन, मला दुसरं कांहीं नको; पण उठल्याबरोबर गरम चहाचा पेला पाहिजे."

तिची आई म्हणे, "लग्नाच्या वेळेस अटी घालायचा हक्क पुरुषांना असतो; बायकांना नसतो, हें विसरूं नकोस."

चहा पिऊं लागल्याचं निमित्त करून उषा गप्प रहात असे, पण ती आपल्याशीं म्हणत असे, इतर पुरुष नसतील ऐकत बायकांच्या अटी; पण मी ज्या कोणावर प्रेम करीन तो माझ्या साऱ्या अटी मानील, माझे सारे हट्ट पुरवील, स्वतःच्या हातांनीं तयार केलेल्या गरम चहाचा पेला पुढें करीतच तो मला रोज सकाळीं म्हणेल, "उठा राणीसाहेब."

गाईच्या आंचळांतून चरवींत पडणाऱ्या धारा अंतरानं पडूं लागल्या, तेव्हां त्यांच्या बदललेल्या आवाजानं उषा भानावर आली. आक्कासाहेबांनीं चारी सड आळीपाळीनं ओढून कोरडे केले व वळून पाहिलं, तेव्हां उषा त्यांच्या हातची भरलेली चरवी घेण्यासाठीं त्यांच्यापुढें तयार होती. गाईच्या अंगाखालून उठून दुधाची चरवी उषाच्या हातीं देतां देतां आक्कासाहेब म्हणाल्या,

" हें घेऊन जा. दादूची धार संपली कीं तो कासंडी घेऊन येईल. म्हशीचं आणि गाईचं दूध वेगवेगळ्या पातेल्यांत चुलीवर चढवायचं. कपाटांतलं दही घुसळायसाठीं तपेल्यांत नीट काढून ठेव. नीट करशील ना सारं ? आतां तूं पुन्हां इकडे येऊं नकोस. ही शेवटची धार काढून येतेंच मी. जा. "

रिकामी चरवी सासूबाईच्या हातांत देऊन उषा गोठ्यांतून बाहेर पडली, आणि मोठं परसू ओलांडून वाड्याच्या मुख्य भागाकडे जाऊं लागली. पावसाची सर थांबली होती, पण शेवग्याच्या झाडांनीं तिच्या डोक्यावर पाण्याचे थेंब टाकले. डोंगरी वाऱ्याची झुळूक तिच्या अंगाला क्षणभर बिलगून पुढें गेली. उजव्या डाव्या अंगांना मांडवांवर छोटीं मोठीं घोसाळीं आणि काकड्या लोंबत होत्या. धान्याच्या कोठाराच्या कौलारावर भोपळीचा वेल माजला होता, त्यानं ठिकठिकाणीं हिरव्या काळ्या भोपळ्यांचीं गाठोडीं मांडून ठेवलीं होतीं. मोरीलगतच्या गुलबाशीच्या झाडांवर पांढऱ्या, तांबड्या, केशरी रंगाच्या लांबट कळ्या माजल्या होत्या. ती चार पावलं पुढें गेली. उजव्या हाताच्या वेलावर लगडलेल्या तोंडल्यांपैकीं एक अगदीं लालचुटुक झालेलं तिला अंधुक उजेडांत दिसलं. ती क्षणभर थबकली व त्याकडे बघत राहिली...तिचं प्रभाकरशीं लग्न होण्यापूर्वी तो तिला एकदां म्हणाला होता, " इतके दिवस बायकांच्या ओठांना पिकलेल्या तोंडल्यांची उपमा कां देतात मला कळत नसे. " तिनं विचारलं होतं, " तें कां ? पिकलेलं तोंडलं कधीं पाहिलं नाहीं काय तुम्हीं ? " तो म्हणाला होता, " कितीदां तरी पाहिलं आहे. आमच्या वाड्याच्या मागच्या परसांत वेलावर सदा लागलेलीं असतात. तूं कधीं आलीस तर दिसतील तुला. आमचा दादा म्हणतो, तोंडलीं खाऊं नयेत. आयुर्वेदाचा अभिमानी वैद्यराज आहे ना तो ? पण आमच्या बाबांना तोंडलीं फार आवडतात. अन् मलाहि. तोंडलीं रगड पाहिलीं आहेत मीं. " तिनं विचारलं होतं, " मग ओठांना दिलेली उपमा कां कळत नव्हती ? " प्रभाकर हंसून म्हणाला होता, " कारण, इतके दिवस तोंडल्यासारखे ओठ पाहिले नव्हते. " तें ऐकून ती एकदम गप्प झाली होती. तो तिच्याशीं प्रथमच असं बोलला होता. आणि त्याच्या त्या बोलण्यानं ती थोडी दचकली होती. तिच्या मनांत आलं

होतं, मीं पूर्वी एकदां दुसऱ्यावर प्रेम केलं आहे हें याला कळलं तर याला काय वाटेल ? आणि ज्याच्यावर प्रेम केलं त्या जगन्नाथाला अजिबात विसरून याच्याबरोबर प्रेमाचा संसार मला करतां येईल का ?

...आणि नंतर अवघ्या चार महिन्यांनीं तिचं प्रभाकरशीं लग्न झालं होतं. नंदगढच्या बाबासाहेब इनामदारांची सून म्हणून ती या वाड्यांत आली होती...तिनं हळूच तें लाल तोंडलं खुडून घेतलं, दांतांनीं त्याचा लहानसा तुकडा काढून तोंडांत धरला, आणि फुटलेल्या तोंडल्यांतून वाहणाऱ्या रसाकडे पहातांच ती स्वतःशीं हंसली...

मागचा सोपा ओलांडून ती सैंपाकघरांत गेली. चुलीपाशीं हात शेकीत बसलेले दादा तिला दिसले. तिची चाहूल लागल्याबरोबर चुलींतलं लाकूड सरसावीत त्यांनीं विचारलं, "काय वहिनी, आणलीस का धार ? मी वाटच पाहतों आहे. दे."

त्यांनीं हात पुढें केला. पण उषा म्हणाली, "तुम्हांला प्यायसाठीं सासूबाई घेऊन येताहेत दूध. हें पातेल्यांत ओतायला सांगितलंय त्यांनीं मला."

"माहीत आहे ग मोठी आज्ञाधारक सून आहेस ती." असं म्हणत दादांनीं तिच्या हातची चरवी काढून घेतली. "मागून आई आणील तें काय आणि हें काय, दोन्ही गाईचीं दुधंच ना ? अन् खाते आहेस काय तूं उषा ?"

तिनं उजव्या हातांतला तोंडल्याचा तुकडा त्यांना दाखविला.

"काय तोंडलं ? टाकून दे पाहूं आधीं. तुझ्यासारख्या मुलीला अगदींच वाईट बघ."

"माझ्यासारख्या म्हणजे ?"

"सांगितलं असतं, पण रागावशील."

"नाहीं रागावायची. सांगा."

"अग, तोंडलीं खाल्लीं कीं मुलं होत नाहींत."

"इश्श !" असं म्हणून उषा दूर झाली. "होतात ! बघाल तुम्ही !" असं म्हणावसं तिला वाटलं. पण ती लाजून गप्प राहिली.

दादा हंसले. ते म्हणाले, "प्रभाकर आज येणार आहे ना ग ?"

कपाटांतलं दही काढीत उषा म्हणाली, “ हं. ”

“ तुझी खात्री नसल्यासारखं हं करते आहेस. ”

“ हो, कदाचित् आज यायचेहि नाहींत. साऱ्या सामानाची खरेदी आटपायला हवी ना ? ”

“ काय काय आणणार आहे ? ” चुलीपुढें पुन्हां बसत दादांनीं विचारलं.

“ मिठाई, तोरणं, राष्ट्रध्वज, पताका. शिवाय जमलं तर आपल्या चावडीवर आणि देवळावर परवाच्या दिवशीं विजेची रोषनाई करायची म्हणाले आहेत. त्यासाठीं मुद्दाम छोटासा डायनामो आणि दिवे घेऊन येणारा एखादा कंत्राटदार शहरांत मिळतो का पाहाणार आहेत.”

तापलेले हात आपल्या पीळदार दंडावर आणि पोटऱ्यांवर चोळीत दादांनीं विचारलं, “ कशाबद्दल व्हायची आहे एवढी धांदल ? ”

“ म्हणजे काय भाऊजी ? तुम्हांला माहीत नाहीं ? आपल्या देशाचं स्वातंत्र्य पंधरा ऑगस्टला जाहीर व्हायचं आहे ना ? देशाच्या साऱ्या कानाकोपऱ्यांतून लोक उत्सव करणार आहेत. ”

“ असं का ? देश स्वतंत्र झाला म्हणतेस ? स्वराज्य मिळालं ? मला माहीतच नव्हतं ! ”

दादा कोणत्या अर्थानं हें सारं बोलत होते तें उषाला कळत होतं. त्यांचीं मतं तिला माहीत होतीं. प्रभाकरच्या कॉंग्रेसनिष्ठेबद्दल त्याची ते नेहमीं कशी थट्टा करीत व दोघां भावांचे वाद घरांत वरचेवर कसे होत तें तिला माहीत झालं होतं. हे वाद बहुधा जेवणाच्या पंक्तींत होत, व त्या वेळेस ती वाढण्याच्या कामांत गुंतलेली असल्यामुळें, आणि तिच्या सासूबाई जवळच असल्यामुळें तिला त्यांत भाग घेतां येत नसे. पण कधीं ती एकटी एकीकडे सांपडली, कीं दादा तिची कॉंग्रेसवाल्याची बायको म्हणून चेष्टा करीत; व अशा वेळीं त्यांना गमतीचं उलट उत्तर देतांना तिला भीति वाटत नसे. कारण थोरला दीर, नामांकित वैद्य, या नात्यांनीं त्यांचा आदर ठेवला पाहिजे हें जरी ती जाणून होती, तरी ते शरीरानं जसे तालीमबाज आणि धिप्पाड होते तसेच मनानं विनोदप्रिय आणि खेळकर होते हें तिला माहीत झालं होतं. प्रभाकरशीं लग्न करण्याचं ठरविण्याच्या वेळीं तिला भीति

वाटली होती, कीं सासू, सासरा, दीर अशा समायिक कुटुंबांत—आणि तें सुद्धां एका इनामदारांच्या कुटुंबांत—साऱ्यांशीं नीट वागणं आपल्याला कसं काय जमेल कुणास ठाऊक. पण इथें नंदगढला आल्यावर तिच्या या भीतीवर पहिला उतारा दादांनीं दिला होता. ते चांगले चाळिशीच्या घरांत होते. ती अवघी तेवीस वर्षांची होती. पण त्यांची तिची मैत्री चटकन् जंमली होती. आजूबाजूला कोणी वडीलधारं माणूस नाहीं असं पाहून ते जशी तिची थट्टा करीत त्याप्रमाणेंच तिनं त्यांची केलेलीहि त्यांना आवडे. त्यामुळें त्यांचं आतांचं खवचट बोलणं ऐकून ती म्हणाली,

"तुम्हांला कशाला माहिती असेल भाऊजी ! तुम्हीं डोळ्यांवर पट्ट्या चढविल्या आहेत, तेव्हां चांगलं स्वातंत्र्य उजाडलं तरी तुम्हांला दिसायचं नाहीं."

जाळापुढें दोन्ही हात पसरून धरून हंसून दादा म्हणाले, "अग, तुम्ही उजाडलं म्हणतां, पण सूर्य कुठें आहे ?"

"तुम्हांला नाहीं दिसणार !"

"तसं नाहीं. तुम्हांला दिसतोय तो सूर्य नाहीं. भ्रम झालाय तुम्हां लोकांना सूर्य म्हणून. अखंड हिंदुस्थानचीं छकलं उडालीं, मुसलमान पाकिस्तान घेऊन बसले, आणखी आनंदोत्सव कसला करतां डोंबलाचा ? या असल्या स्वातंत्र्यांतून चांगल्या गोष्टी निर्माण व्हायच्या नाहींत. असं बघ—"

उषा म्हणाली, "हें पहा भाऊजी, तुम्हांला आपलं नेहमींचं व्याख्यान द्यायची लहर आली असली तर हे घरीं परत आले, कीं त्यांच्यापुढें होऊन जाऊं द्या. मी आहें साधीसुधी इनामदारांची सून. मला राजकारणांतलं काय कळतंय ?"

"साधीसुधी काय ? चांगली बी. ए. झाली आहेस कीं."

"ती आपली नोकरी करण्यापुरती हो."

"म्हणजे काय ? उषा, तूं नोकरी करीत होतीस ? प्रभाकर कधीं बोलला नाहीं माझ्याजवळ. कुठें करीत होतीस नोकरी ? मास्तरीण होतीस कीं कारकून होतीस ? सांग तरी."

पण तितक्यांत आक्कासाहेब सैंपाकघरांत आल्या, आणि दीर–भावजयीचं संभाषण बंद झालं. थोड्या वेळानं दादा उठूनहि गेले. सकाळ झाली, कीं पुढच्या ओसरीच्या डाव्या बाजूस एका पाख्याखालीं असलेल्या त्यांच्या औषधी कारखान्यांत काढ्याचं सामान कुटायसाठीं आणि चूर्णे खलायसाठीं मोलकरणी येऊं लागत, आणि त्या येण्याच्या आंत स्नानबीन आटोपून दादांची स्वारी तयार होऊन तिथें जाऊन बसत असे.

आक्कासाहेबांनीं दूध पातेल्यांत ओतलं, दही घुसळण्यासाठीं उंच रवीभोंवतालची दोरी वेढे घालून तयार केली, व तिचीं टोकं हातांत धरीत त्या उषाला म्हणाल्या, "तुझा चहा टाकलास का? टाक ना. मलाहि थोडा टाक. तुझ्या नादानं अलीकडे मीसुद्धां घ्यायला लागलें बघ. मात्र माझ्या चहांत थोडी सुंठ टाक हं."

उषानं वयलावर एका लहानशा पातेलींत आधण ठेवलं आणि धाकट्या कपाटांतून ती चहासाखरेचे डबे काढूं लागली. ताक घुसळतां घुसळतां आक्कासाहेबांनीं तिला विचारलं, "दादा तुला कसल्या नोकरीचं विचारीत होता?"

"माझ्या नोकरीचं नव्हे, माझ्या एका मैत्रिणीच्या."

तिच्या सासूबाई एवढ्यावर गप्प झाल्या तेव्हां उषाला बरं वाटलं. आपल्या नोकरीचा विषय इकडे सासरीं तिनं कधीं कुणाजवळ काढला नव्हता. आतां दादांशीं बोलतांना तिच्या तोंडून नोकरीचा उल्लेख गेल्याबरोबर तिनं आपली जीभ चावली होती. नोकरी केल्याबद्दल तिला लाज वाटत होती म्हणून नव्हे; पण या घरांतलं तिचं विवाहित आयुष्य, आणि प्रभाकराची भेट होण्याच्या आधीं तिनं नोकरींत घालविलेले दिवस हे दोन भिन्न विषय होते म्हणून. एकाचा दुसऱ्याला संपर्क व्हावा अशी तिची इच्छा नव्हती. तिनं ती नोकरी कां पत्करली होती, आणि पुढें काय काय घडलं होतं या साऱ्या गोष्टी जणूं तिच्या निराळ्या आयुष्यांतल्या होत्या... केवळ जगन्नाथाचा सहवास अधिक मिळावा यासाठीं ती मुंबईस गेली होती...तिचा तो हेतु साध्य झालाहि होता...पण तो पूर्ण होतो न होतो तोंच दैवाचं चक्कर भलत्याच दिशेनं फिरलं होतं...

उषा चुलीपुढच्या पाटावर बसली होती. तिनं चहाची पूड काढून एका बशींत ठेवली होती. त्या पुडीवर ती आपल्या बोटाच्या टोकानं वर्तुळ काढीत होती. तपेल्यांत घुसळल्या जाणाऱ्या दह्याचा आवाज होत होता. बाहेर परसांत पक्ष्यांची किलबिल वाढली होती. गोठयांतल्या गुरांचं हंबरणं मधूनच ऐकूं येत होतं. न्हाणीघरांत मोलकरणीनं उपसून दिलेलं पाणी डोक्यावर घेतांना ' हर गंगे ' अशी ललकारी दादा मारीत होते...पण या साऱ्या गोष्टी दूर कुठें तरी घडत आहेत असं उषाला वाटत होतं. तिच्या अंतःचक्षूंपुढें निराळ्याच गोष्टी उभ्या राहात होत्या...

जगन्नाथाची व तिची पहिल्यांदां ओळख झाली तेव्हां बेचाळीसच्या चळवळींत तुरुंगांत गेलेल्या इतर लोकांबरोबर तो नुकताच सुटून आला होता. देश अजून स्वतंत्र झाला नव्हता. पण महायुद्ध संपलं होतं. मध्यवर्ति आणि प्रांतिक कायदे मंडळांच्या नव्या निवडणुका झाल्या होत्या. इतर प्रांतांबरोबर मुंबई प्रांताचाहि कारभार कॉंग्रेसच्या मंत्रिमंडळाकडे आला होता. अजूनहि कॉंग्रेस आणि मुस्लिम लीग यांच्यांत समझोता झाला नव्हता. उलट जिनांचा पाकिस्तानाबद्दलचा हट्ट वाढतच चालला होता. बेचाळीसच्या धामधुमींत ज्यांनीं घातपाताचीं कृत्यं केलीं त्यांच्याविषयीं दोन भिन्न मतं निर्माण झालीं होतीं. त्यांच्या साहसी कृत्यांमुळेंच हिंदुस्थानांतील लोकांच्या संमतीवांचून राज्यकारभार चालविणं अशक्य आहे ही गोष्ट इंग्रज सरकारच्या मनावर पुरती बिंबली अशी सामान्य लोकांची समजूत होती; व म्हणून अडीच वर्षांच्या अज्ञातवासानंतर प्रगट झालेल्या चळवळीच्या पुढाऱ्यांचा सत्कार करण्यासाठीं प्रचंड सभा होत होत्या, मिरवणुकी निघत होत्या. परंतु हिंसात्मक कृत्यं व्हायला नको होतीं असं कांहीं पुढाऱ्यांना वाटत होतं आणि बेचाळीसच्या चळवळींतील पुढाऱ्यांना शाबास म्हणायला ते तयार नव्हते. गांधींनीं तर असं मत प्रदर्शित केलं होतं, कीं भूमिगत असलेल्या लोकांनीं आपण होऊन प्रगट व्हावं, व सरकार देईल ती शिक्षा आनंदानं पत्करावी. या मतभिन्नतेमुळें मुंबई प्रांतांत कॉंग्रेसचा कारभार सुरू झाला व चळवळींतले लोक मुक्त होऊन बाहेर आले, तेव्हां त्यांच्यांत दोन पक्ष निर्माण झाले. एका पक्षाचं म्हणणं होतं कीं आम्हीं घातपात केला तो स्वातंत्र्य जवळ आणण्यासाठींच, आणि सामान्य जनतेला तो

मंजूरही आहे, तेव्हां आम्हीं जें केलं तें बरोबरच होतं. गांधींनीं वास्तविक आमची पाठ थोपटायला हवी. तसं करायचं सोडून ते आमचा धिक्कार करीत असतील तर आम्हांलाहि त्यांच्या शाबासकीची गरज नाहीं. त्यांचे आमचे मार्ग निराळे राहतील. पण दुसऱ्या पक्षाचं म्हणणं असं होतं, कीं 'चले जाव' या गांधींच्या घोषणेचा आम्हीं केलेला अर्थ त्यांना संमत नव्हता, असं आतां दिसून आल्यावर गांधींपुढें उभं राहून क्षमस्व असं म्हणणं हेच आमचं कर्तव्य आहे. असं म्हणणारा पक्ष अर्थात् लहान होता. पण जगन्नाथ या पक्षांतला होता. चळवळींतल्या आपल्या मित्रांना तो म्हणे, "कांहीं झालं तरी गांधी आपले सेनापति आहेत. आपण आपल्या लढाईत मोठं शौर्य दाखविलं, हें त्यांनाहि कबूल आहे. पण ज्या वाटेनं आपण गेलों ती काँग्रेसची नाहीं व त्यांनीं जेव्हां 'चले जाव'ची घोषणा केली तेव्हां लोकांना या वाटेनं जायला सांगण्याचा त्यांचा हेतु नव्हता, असं ते आतां सांगतात, तें आपण मानलं पाहिजे. यापुढच्या दिवसांत आपल्याकडेच पुढारीपणा राहिला पाहिजे असा हट्ट आपण करण्यांत अर्थ नाहीं. अडीच वर्षं घातपाताची चळवळ करून आपण जें कांहीं मिळविलं, तें आपल्या पुढाऱ्यांच्या हवालीं करून ते सांगतील त्या मार्गानं जायची आपली तयारी असायला हवी. ज्यांची अशी तयारी नसेल त्यांनीं राजकारणांतून अंग काढून घ्यावं हें चांगलं."

आपल्या मित्रांशीं जगन्नाथानं काढलेले हे उद्‌गार उषानं वारंवार ऐकले होते. म्हणून एकदां तिनं त्याला विचारलं होतं, "तुम्हीं काय करायचं ठरविलं आहे?"

"मीं होय? बघूं या." असं म्हणून तो दर वेळेस फक्त हंसला होता.

त्याच्या त्या हंसण्याची आणि गप्प राहण्याची तऱ्हा पाहून उषाच्या मनांत येत असे, अजून माझ्याजवळ आपलं अंतःकरण उघडं करावंसं याला वाटत नाहीं. पण ती लगेच स्वतःशीं म्हणे, हरकत नाहीं, किती दिवस हा असा परकेपणानं माझ्याशीं वागेल? याचा विश्वास संपादन करणं माझ्याच हातीं आहे ना?...

पण एके दिवशीं जगन्नाथ एकदम निघून गेला होता...

" झाला का ग चहा ? " मान वळवून आक्कासाहेबांनीं विचारलं.

उषानं आधणाच्या पातेलीवरची चेळणी उचलून पाहिलं. पाण्याला केव्हांच उकळी आली होती. कदाचित् पाणी थोडं आटलंही असेल. उषानं चटकन् चहा पाण्यांत टाकला आणि पातेलं खालीं उतरलं.

चहा घेतल्यानंतर आक्कासाहेब ताकावरचं लोणी काढीत बसल्या. तितक्यांत बागेंतलीं फुलं घेऊन बंडू माळी आला. उषानं तीं घेऊन देवघरांत नेऊन ठेवलीं. " आज दत्तंभट एकादशणीला यायचे आहेत माहीत आहे ना ? " असं तिच्या सासूबाईनीं विचारलं तेव्हां ती म्हणाली, " होय. " आणि मग स्नान आटपून घेण्यासाठीं ती लगबगीनं मोरीकडे गेली...ज्या घरांत देवपूजा, एकादशण्या, नेमधर्म नित्य चालू आहेत अशा घरांत ती आपलं विवाहित आयुष्य घालवील असं भविष्य सात आठ महिन्यांपूर्वी उषाला कुणीं सांगितलं असतं, तर तिनं तें सांगणाऱ्याला वेड्यांत काढलं असतं. परंतु तसं प्रत्यक्ष घडलं होतं. या इनामदारांच्या घरांत नित्य कसल्या तरी धार्मिक कृत्यांची गडबड चालू असे. लोकोपयोगी सार्वजनिक कृत्यांत हौसेनं भाग घेणारे इनामदार म्हणून बाबासाहेबांचा लौकिक होता. थोड्या फटकळ तोंडाचे पण प्रेमळ अंत:करणाचे, विनोदी स्वभावाचे निष्णात वैद्य म्हणून दादांची प्रसिद्धी होती. आणि एक अतिशय कळ-कळीचा कॉंग्रेसकार्यकर्ता म्हणून प्रभाकरला जिल्ह्यांतले सारे लोक मानीत होते. तिघांचीं तीन भिन्न क्षेत्र होतीं. परंतु त्या तिन्हींचा संगम घरांत झाला असल्यामुळें कशाची ना कशाची धांदल घरांत सतत चाललेली असे. आणि या जुन्या कुटुंबांतलीं माणसं पुढारलेल्या मतांचीं असल्यामुळें व कर्तेपणाचे पुष्कळसे अधिकार आक्कासाहेबांनीं उषाकडे कौतुकानं आणि आनंदानं सोपविल्यामुळें घरांत जें कांहीं होणार असेल तें व्यवस्थित पार पाडण्याची धांदल उषाला करावी लागे. माजघरांत कांहीं निमित्तानं मोठी पंगत बसली कीं भारी किंमतीचा मुकटा नेसून आणि अंगांत उंची रेशमी खणाची चोळी घालून वाढप करतांना, किंवा घरांत कांहीं विशेष गोडधोड झालं कीं बलुत्यानं काम करणाऱ्या धोबी न्हावी वगैरे गांवकऱ्यांना वाटणी देतांना, किंवा एखाद्या नामांकित कथेकऱ्याची कथा गांवांत इनामदारांचं विष्णूचं देऊळ होतं तिथें बाबासाहेबांनीं मुद्दाम हौसेनं ठेवली असली कीं

तिची सर्व प्रकारची तयारी करतांना उषाच्या मनांत अनेक वेळां येई, कीं माझ्या पूर्वीच्या मैत्रिणींनीं मला या वेळेस पाहिलं, तर त्यांना हंसतां हंसतां पुरेवाट होईल. मुंबईतल्या मुक्कामांत आपल्या विशेष मैत्रीची झालेली तारा जर इथें येऊन आपलं इनामदाराच्या घरांतलं हें आयुष्य पाहील तर ती आश्चर्यानं थक्कच होऊन जाईल आणि म्हणेल, "इश्श, उषे, काय ग हें!"

आपलं विवाहित आयुष्य या तऱ्हेचं होईल अशी उषाला स्वतःला पूर्वी कल्पना नव्हती. तिचं तिलाच कधीं कधीं त्याचं आश्चर्य वाटत असे; परतु जसं आश्चर्य वाटे, तसाच आनंद आणि अभिमानही वाटे. केवळ मियाबिबीचा 'छोटासा संसार' थाटून नव्या फॅशननं चैन करीत संसार करण्याची कल्पना बहुधा सगळ्याच तरुण मुलींच्या मनांत लग्नापूर्वी कमी अधिक प्रमाणांत असते. तशी ती उषाच्याही मनांत केव्हां तरी होती. जगन्नाथाच्या प्रेमांत ती सांपडली, तेव्हां ती कल्पना जाऊन एका निराळ्याच आयुष्याची कल्पना तिनं केली होती. परंतु दुर्दैवानं ती कल्पना म्हणजे एक स्वप्नच ठरलं होतं. आणि एका मोठ्या इनामदारांच्या घरांतली जबाबदारी पार पाडणारी, सगळ्यांच्या प्रेमांतली सून म्हणून ती आतां या वाड्यांत वावरत होती. उषाला या आकस्मिक प्रकाराचं आश्चर्य वाटे; परंतु पश्चात्ताप होत नसे. जगन्नाथाची आठवण आपल्याला पूर्णतः विसरतां येईल काय, आणि प्रभाकरच्या मोठ्या कुटुंबांत आपल्याला नीट मिसळून जातां येईल काय, या दुहेरी शंकेनं प्रभाकरला किती दिवस तरी तिनं रुकार दिला नव्हता. तिला वाटे, प्रभाकरची बायको म्हणून नंदगडला जाण्याचा प्रयोग चुकीचा ठरला म्हणजे कसं होईल? पण तो चुकीचा ठरला नव्हता. जगन्नाथाबद्दलच्या तिच्या मनांतल्या आठवणी बुजल्या नव्हत्या. किंबहुना त्या कधीं बुजणार नाहींत असं तिला वाटूं लागलं होतं. परंतु त्या आठवणी तिच्या विवाहित आयुष्याशीं खटकत नव्हत्या. तिनं आपल्या आईबापांच्या सहवासांत लहानपण घालविलं होतं, त्याच्या आठवणी तिला हजारदां होत असत. परंतु त्या जशा तिच्या विवाहित आयुष्याशीं खटकत नसत, तशीच गोष्ट जगन्नाथाच्या आठवणींची होती. त्याच्या सहवासांत तिनं घालविलेले दिवस म्हणजे तिच्या वाढींतली एक महत्त्वाची अवस्था होती इतकंच. तिच्या आठवणी काढतांना तिला वाईट वाटत

असे. परंतु लहानपण आठवल्यावर ते बालपणाचे दिवस गेले ते गेलेच एवढ्याच अर्थानं जसं वाईट वाटतं, तसं तें वाईट वाटणं असे. त्यांत खेद असे; परंतु पश्चात्ताप नसे. प्रभाकराशीं लग्न करण्यांत आपलं चुकलं अशा विचाराची छटा त्यांत नसे. कारण इनामदारांच्या घरांतली कर्ती सून म्हणून तिला ज्या गोष्टी कराव्या लागत, त्या तिच्यासारख्या पदवीधर मुलीनं कराव्यात हें कांहींसं आश्चर्य होतं खरं; पण त्या गोष्टी करण्यांत ती रमली होती...

स्नान करतां करतां उषा मनाशीं हे विचार करीत होती, आणि म्हणत होती, इथें मी रमलें आहे. या घरांत मला जें जें करावं लागतं तें तें करण्यांत एक प्रकारची मौज आहे...आतांच पहा ना? अंग धुणं आटपलं, कीं मी देवघरांत जाईन, एकादशणीची सारी तयारी करीन, कोठीच्या खोलींत जाऊन तिजोरी उघडून दत्तभटांना लागणारी दक्षिणा काढून घेईन, तितक्यांत कदाचित् शेजारच्या गांवीं गेलेले बाबासाहेब परत येतील, आल्याबरोबर ते विचारतील 'सूनबाई कुठें आहे?', मग जरा वेळानं प्रभाकरही बहुतेक येईल, तो आला कीं गांवचे प्रमुख लोक जमा होतील, परवांचा स्वातंत्र्योत्सव गांवांत कसा करायचा त्याबद्दलची त्यांची चर्चा ओटीवर सुरू होईल, मी चहा घेऊन त्यांच्यापुढें जाईन, प्रभाकरचे मित्र म्हणतील 'उषाताईचा चहा आला बघा', प्रभाकर म्हणेल 'बैस जरा खुर्चीवर, या उत्सवांत तुझ्याकडे कोणती कामगिरी घेतेस? बोल'...

देवघरांत एकादशणीची तयारी करीत असतांना उषाचं अर्ध लक्ष बाहेर ओटीकडून ऐकूं येणाऱ्या चाहुलीकडे होतं. कामावर उशीरां आलेल्या बायकांवर दादा ओरडत होते : "तुम्हांला पैसे भरपूर मोजून हवेत, पण कामं मात्र करायला नकोत. मला हें खपायचं नाहीं. तुमच्यानं होत नसेल काम, तर कामावर येऊं नका. मी काय तुम्हांला बोलवायला आलोंय? तुम्ही नाहीं तर तुमच्या मावश्या वाटेल तेवढ्या मिळतील मला..." दादांच्या तोंडाचा पट्टा एकदां चालू झाला कीं कुणाची दया माया राहायची नाहीं. दोघां सख्ख्या भावांत स्वभावाचं केवढं अंतर? पण चमत्कार असा, कीं प्रभाकरच्या गोड सात्त्विक स्वभावाचं बक्षीस वरून साधेभोळे दिसणारे

गांवकरी त्याला फसवून देत असत, आणि कुणालाहि उगाच बिनहिशोबी माया न दाखविणाऱ्या दादांपुढें ते नरम असत...पूर्वी पुण्यामुंबईसारख्या शहरांतच केवळ राहिल्यामुळें उषाची अशी समजूत होती, कीं शेतकरी म्हटला, कीं तो कष्टाळूपणाचा, गरीब स्वभावाचा आणि प्रामाणिकपणाचा पुतळाच. शेतकरी-कामकऱ्यांचं जीवन रंगविण्याची फॅशन साहित्यिकांनीं उचलली होती व त्यांनीं लिहिलेल्या लघुकथा वाचून उषाची अशी समजूत झाली होती, कीं खेड्यांतील आयुष्यांत निर्भेळ मजा आहे, आणि शेतांत राबणारे शेतकरी म्हणजे साऱ्या सज्जनपणाचे नमुने आहेत. पण तिची ती समजूत किती चुकीची होती हें तिला आतां गेल्या चार महिन्यांच्या अनुभवानं कळूं लागलं होतं. इनामदारांचीं शेतं करणाऱ्या कुळांत, घरकामं करणाऱ्या नोकरांत, टेकडीवरच्या छोट्याशा नंदगढ गांवाची व्यवस्था पाहाणाऱ्या सरकारी व बिनसरकारी लोकांत चांगलीं माणसं होतीं तशींच वाईटहि होतीं. आणि जीं चांगलीं होतीं त्यांच्यांत देखील आळस, गलिच्छपणा, आणि कोणीं कांहीं नवं शिकविलं तरी तें न शिकण्याचा हट्ट हे दुर्गुण होतेच. बाबासाहेब म्हणत, "पिढ्यान् पिढ्या हेंच चाललं आहे अन् पुढेंहि हेंच चालणार." दादा म्हणत, "यांना प्रेमाचं गोड बोलणं कधीं कळायचं नाहीं, चांगल्या चरचरीत शिव्या त्यांना हसडल्या तरच त्यांच्या डोक्यांत उजेड पडतो. देशांत जेव्हां एखादा हिटलर निघेल आणि एकेकाला चाबूक मारून कामाला लावील तेव्हां हे सुतानं वागतील. यांना मताचा अधिकार द्यायचा आणि आपले राज्यकर्ते निवडा म्हणायचं हा सारा गाढवपणा आहे." प्रभाकर म्हणत असे, "कांहीं झालं तरी हीं आपलींच माणसं आहेत. हीं मूर्ख राहिलीं तीं आपण त्यांना मूर्ख ठेवलं म्हणून राहिलीं. त्यांना गोडीगुलाबीनं शिकवून शहाणं केलं पाहिजे. स्वातंत्र्य मिळालं कीं हळूं हळूं त्यांच्या हातीं राज्य द्यायला हवं ना?" यावर दादा आवाज उंच करून म्हणत, "द्या बरं, द्या या लोकांकडे राज्य! अन् मग तुम्ही बघा देशाचे कसे तीन तेरा होतात ते!"...घरांतल्या तीन पुरुषांच्या भिन्न भिन्न विचारसरणींचे हे प्रवाह पाहातांना उषाला नेहमीं गंमत वाटत असे... ती एकीकडे सहाणेवर चंदनाचं खोड घाशीत होती आणि दुसरीकडे बाहेरच्या ओटीवर पुन्हां पुन्हां होणारा दादांच्या बोलण्याचा स्फोट ऐकत

होती. “ चूर्ण खलायचं म्हणजे काय जात्यावरचं पीठ दळायचं समजलीस होय भागे ? असा चुकारपणा मला पुन्हां चालायचा नाहीं. ”

दत्तंभटांच्या एकादशणीची सगळी तयारी तिनं पूर्ण केली. इतक्यांत ते येऊन दाखल झालेच. त्यांचा तो लांडा पंचा, अंगावरची धाबळी, दंडावरचे, पोटावरचे, कपाळावरचे भस्माचे पट्टे, झुपकेदार मिशा, थोडी वाढलेली दाढी, मानेपर्यंत लोंबणारी शेंडी, हा सारा अवतार उषाला नेहमीं मोठा नमुनेदार वाटे. दत्तंभटांच्या तीन पिढ्यांनीं इनामदारांच्या घराचं उपाध्येपण सांभाळलं होतं. आणि विशेष गोष्ट ही, कीं विद्वत्तेचा लौकिक दत्तंभटांच्या आजोबांनीं आणि वडिलांनीं मिळविला होता तो दत्तंभटांनीं अजून सांभाळला होता. नुसतं वैदिक धर्मकर्म करणारं नव्हे, तर विद्वान् शास्त्र्यांचं घराणं म्हणून त्यांच्या घराचा तीन पिढ्यांपासून लौकिक होता. लोकमान्य टिळकांनीं सांगलीस ज्योतिष–परिषद भरविली तींत त्यांनीं दत्तंभटांच्या वडिलांच्या मताला मान दिला होता. ज्योतिषशास्त्राचा अभ्यास दत्तंभटांनीं देखील ताजा ठेवला होता...बाबासाहेब उषाला एकदोनदां म्हणाले होते, “ सूनबाई, तुला सवड झाली तर दत्तंभटांकडे जुन्या संस्कृत विद्येचा थोडा अभ्यास तूं करावास अशी माझी इच्छा आहे. ” उषाची देखील इच्छा होती, पण तें अजून जमलं नव्हतं. तथापि दत्तंभटांविषयीं तिच्या मनांत गाढ आदर उत्पन्न झाला होता. आपली विद्या बरी आपण बरें अशा वृत्तीनं नंदगढच्या एकंदर गांवकारणापासून अलिप्त राहाणारे दत्तंभट म्हणजे एक मोठी नमुनेदार व्यक्ति तिला वाटत असे... ते देवघरांत आले तेव्हां तिनं त्यांना नमस्कार केला, सारी तयारी करून ठेवल्याचं सांगितलं, आणि मग कोठीच्या खोलींत जाऊन तिनं नेसणं बदललं.

ती बाहेर गेली तेव्हां दादा तक्क्याला टेकून बसले होते. त्यांच्यापुढं औषधासाठीं येणाऱ्या माणसांचं छोटंसं कोंडाळं जमलं होतं. तिला पाहतांच त्यांनीं सांगितलं, “ बाबांचा निरोप आलाय ग आत्तां येत नाहीं, संध्याकाळपर्यंत येतों म्हणून. ”

ती आंत जायसाठीं वळली तेव्हां ते म्हणाले, “ आणखी प्रभाकरसुद्धां अजून आलेला नाहीं, त्या अर्थी तो शहरांतच राहिला असं दिसतंय. ”

तिला चिडविण्यासाठीं ते असं म्हणाले होते. 'बरं बरं, समजलं हो' अशा अर्थानं इतर कुणाच्या लक्षांत येऊं नये अशा बेतानं, उषानं त्यांच्याकडे कटाक्ष टाकला, आणि ती ओटीच्या पायऱ्या उतरून चौक ओलांडून बाहेर मोठ्या दारांत जाऊन उभी राहिली. तिनं वर पाहिलं तों एवढी मोठी सकाळ झाली तरी आभाळ ढगांनीं गच्च भरलं होतं. पावसाचे थेंब पडत नव्हते. परंतु साऱ्या दिशा अंधारल्या होत्या. प्रकाश अगदीं नव्हता. समोर घरांचीं कौलारं दिसत होतीं. त्यांपलीकडे टेकडीचा उतार होता; व टेकडीला लागून गेलेला मोठा रस्ता होता, त्याची नागमोडी रेषा कांहीं अंतरावर दिसत होती, व नंतर गर्द झाडींत नाहींशी झाली होती. खोऱ्यांतल्या मोठमोठ्या झाडांच्या माथ्यांचा रंग आभाळांतल्या ढगांमुळे आणखीच काळवंडला होता. खूप अंतरावर दिसणाऱ्या क्षितिजाच्या रेषेपाशीं काळे निळे ढग व्यायला झालेल्या म्हशींच्या पोटाप्रमाणें लोंबले होते. वेळ सकाळची आहे कीं तिन्हीसांजांची आहे तें कळत नव्हतं. त्या सबंध दोन अडीच मैल विस्ताराच्या देखाव्यांत झगझगीत प्रकाश कुठेहिं नव्हता... त्याकडे पाहतां पाहतां पहांटे दादांनीं जे उद्गार काढले होते ते उषाला एकदम आठवले, "उजाडलं! पण सूर्य कुठे आहे?"

उषा दारांत आली होती, ती कदाचित् प्रभाकर येईल अशा आशेनं. पण अर्धा तास दारांत उभं राहून काढल्यावर तिला वाटलं, उगीच वेड्यासारखं इथे किती वेळ उभं राहायचं? ती घरांत परत जाण्यासाठीं वळली. तितक्यांत, टपालवाला आला व त्यानं एक लांबट बुकपोस्ट आणि एक पत्र तिच्या हातीं दिलं. बुकपोस्ट दादाच्या नांवचं होतं. आयुर्वेद रसशाळेकडून आलं होतं. बहुधा औषधांचा कॅटलॉग असावा. पत्र तिच्या नांवचं होतं. ती चौक ओलांडून ओटीवर गेली, व बुकपोस्ट दादांकडे टाकून वर आपल्या माडीवर गेली. तिनं पत्र फोडून पाहिलं. तिच्या धाकट्या भावाचं होतं तें. तिच्या या भावाचं जगन्नाथ नेहमीं फार कौतुक करीत असे. मुद्दाम तिच्या देखत जगन्नाथ तिला म्हणे, "तुझ्यापेक्षां तुझा हा अजय जास्त हुषार आहे." ती हंसून म्हणे, "असं तुम्ही म्हणालांत म्हणजे मी चिडेन असं वाटलं कीं काय तुम्हांला? माझ्या हुषारीचा अभिमान मला मुळीं नाहींच हें लक्षांत ठेवा."

जगन्नाथ म्हणे, “ पण माणसाला कशाचा तरी अभिमान असायला हवा बुवा. ”

ती म्हणे, “ मलाहि आहे कीं. ”

“ कसला ? ”

मनांतलं खरं उत्तर अजयच्या देखत उघड देण्यासारखं नाहीं असं पाहून उषा म्हणे, “ कशाचा नाहीं, कुणाचा म्हणून विचारा. ”

“ कुणाचा ? ”

ती म्हणे, “ आहा, एवढंहि कळत नाहीं एका माणसाला ? ”

हें बोलतांना तिनं मान वेळावलेली पाहून जगन्नाथाला हंसू येई, व तो तिच्याकडे पाहात राही. त्याची ती बघण्याची ल्कब तिला फार आवडे. अगदीं पहिल्यांदा तो तिच्या दृष्टीस पडला तेव्हां दारापलीकडे उभं राहून त्यानं तिच्याकडे असंच बघितलं होतं...तिला तें अगदीं स्पष्ट आठवत होतं.



# प्रकरण दुसरं

" सर आहेत कां ? " असं बाहेरच्या दाराशीं कुणी तरी विचारीत आहे असं उषाला वाटलं म्हणून मधल्या दालनालगतच्या आपल्या खोलींतून ती लगबगीनं बाहेर आली. बाहेरच्या खोलींत पाऊल टाकतां टाकतांच तिनं विचारलं " कोण आहे ? ", परंतु दारापलीकडे गॅलरींत जी व्यक्ति उभी होती ती दृष्टीस पडतांच तिचा तो प्रश्न तोंडांतच राहिला. तीन चार दिवसांपूर्वीच्या मोठ्या जाहीर सभेंत जे व्यासपीठावर बसलेले तिला दिसले होते, ज्यांच्या गळ्यांत हार पडले होते, व ज्यांचं व्याख्यान अगदीं मुद्यापुरतं आणि थोडं होतं म्हणूनच इतर भूमिगत पुढाऱ्यांच्या व्याख्यानांहून तिला अधिक आवडलं होतं तेच गृहस्थ तिला दारासमोर उभे राहिलेले दिसले. " सर आहेत कां ? " असा त्यांचाच आवाज तिला ऐकूं आला होता. आपल्या भाऊंच्या भेटीला हे गृहस्थ आले असतील हें तिला क्षणभर खरंच वाटेना. अज्ञातवासांतून प्रगट झालेल्या बेचाळीसच्या चळवळीच्या पुढाऱ्यांपैकीं कुणाशीं आपली विशेष ओळख आहे असं भाऊंच्या बोलण्यांत आलेलं तिला कधीं स्मरत नव्हतं. चार दिवसांपूर्वी झालेल्या सभेला तिच्याबरोबर भाऊ आले होते. नव्हे, त्या सत्कारसभेला जाण्याची कल्पना त्यांनींच काढली होती. सभेहून परत आल्यावर त्यांनीं तिला विचारलं होतं, " सगळ्यांत कुणाचं भाषण चांगलं वाटलं तुला ? " तिचं उत्तर ऐकून ते म्हणाले होते, " पण त्याचं भाषण तर सगळ्यांत लहान होतं, आणखी त्याच्या भाषणाला सगळ्यांत कमी टाळ्या पडल्या. " ती म्हणाली होती, " म्हणूनच म्हणतें तें भाषण सगळ्यांत चांगलं होतं." तिचे भाऊ तिच्याकडे पाहून हंसले होते. तिला कांहीं न बोलतां शाबासकी द्यायची असली, कीं ते असं हंसून तिच्याकडे पहात... पण त्या व्याख्यात्यांशीं आपला कांहीं विशेष परिचय आहे असं भाऊंनीं

सांगितलं नव्हतं... आणि आतां उषा पाहते तों ज्यांचं व्याख्यान तिला आवडलं होतं, ते दारापलीकडे उभे होते. "सर आहेत कां?" म्हणून विचारीत होते.

बाहेर येतांना आपण आरशांत डोकावून तोंड आणि केस नीटनेटके करायला हवे होते असं उषाला वाटलं. आपली साडीहि ठाकठीक नाहीं हें तिच्या लक्षांत आलं. पण आतां या गोष्टींना इलाज नव्हता. तिनं हंसून म्हटलं, "भाऊ घरांत नाहींत."

"असं? मग—" ते गृहस्थ बोलतां बोलतां रेंगाळले व जाण्यासाठीं त्यांच्या पावलांची हालचाल झाली. "मग सरना सांगा मी येऊन गेलों म्हणून. माझं नांव जगन्नाथ पंडित. मी पुन्हां बहुतेक येईन. पण न आलों तर सांगा येऊन गेलों म्हणून. माझं नांव राहील ना लक्षांत? कां लिहून ठेवूं?"

त्याच्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजीं उषा म्हणाली, "पण भाऊ घरांत नसले तरी जायचं कारण नाहीं. ते कुठे गेले आहेत मला माहीत आहे. मी त्यांना बोलावून आणतें. म्हणजे तंवर बसायला तुम्हांला वेळ असेल तर."

"असं म्हणतां?" थांबण्याची तिची सूचना पटल्याप्रमाणें चर्या करून जगन्नाथ म्हणाला, "मला वेळ आहे. मी बसतों."

"मी दहा मिनिटांत घेऊन येतें भाऊंना" उषा म्हणाली. "या ना, आंत या."

जगन्नाथ खोलींत शिरला. छोट्या आकाराच्या कोचावर बसला. उषानं चटकन् दोन ताजीं मासिकं रॅकवरून काढून घेऊन कोचापुढच्या बैठ्या टेबलावर ठेवलीं, भाऊंच्या टेबलावरचं एक इंग्रजी पुस्तकही काढून ठेवलं. कोपऱ्यांतल्या एका खुर्चीत ताजं वर्तमानपत्र पडलं होतं तेहि नीट घडी करून टेबलावर मांडलं. आणि मग 'जाऊं मी?' अशा अर्थानं जगन्नाथकडे पाहून ती आंतल्या खोलीकडे गेली.

टेबलावरची वर्तमानपत्राची घडी जगन्नाथानं उगीच उघडल्यासारखी केली आणि टाकली. सत्काराची एक मोठी सभा कालहि झाली होती. तिची हकीकत त्या वर्तमानपत्राच्या पहिल्याच पानावर होती. त्या हकीकतीवर

पांच कॉलमी आडवा मोठा मथळा होता: ‘क्रांतिसिंहाची गर्जना.’ मथळ्याचीं तीं जाड ठशांतलीं अक्षरं वाचून जगन्नाथला हंसू आलं आणि वाईटहि वाटलं. हंसू अशासाठीं आलं, कीं बेचाळीसच्या लढ्यांत ‘क्रांतिसिंह’ ही किताबत ज्या गृहस्थांनीं आपल्या नांवामागं लावायला सुरुवात केली होती त्यांची “ आतां आमचं राज्य सुरू झालं आहे. आम्ही म्हणूं तो कायदा ठरणार आहे...” इत्यादि गर्जना शुद्ध मूर्खपणाची होती; आणि वाईट अशासाठीं वाटलं, कीं “ आतां आमच्या मताला जो कोणी विरोध करील त्याला आम्ही काड्यासारखा काढून टाकूं. पत्री सरकारचा इंगा आतां माहित झालाय ना...” इत्यादि जी बडबड हा क्रांतिसिंह दरएक व्याख्यानांत अलीकडे करीत होता तिच्यांत एक घातुक रोगाचे जंतू जगन्नाथाला दिसत होते. त्याला पुष्कळदां भय वाटे कीं उच्च जातींचं वैमनस्य आणि द्वेष यांचा उदय तर या चळवळींतून होणार नाहीं ना?...त्यानं तें वर्तमानपत्र टाकून दिलं. उपानं मुद्दाम टेबलावर ठेवलेलीं दोन मासिकंहि उघडलीं नाहींत. पुस्तक उचलून उघडलं. पुस्तकाच्या पहिल्या पानावर भाऊंची सही होती व सहीखालीं पुस्तक ज्या तारखेला विकत घेतलं त्या तारखेचे आंकडे होते. त्या वळणदार सहीकडे जगन्नाथ पहात राहिला. ही सही त्याच्या अभ्यासाच्या वहींत कित्येक पानांवर केली गेली होती. तो भाऊंच्या हाताखालीं शिकत होता त्या वेळेस त्यांनीं त्याला अभ्यासांत खूप मार्क क्वचितच दिले होते, पण इतर उद्योगांबद्दल त्याची नेहमीं पाठ थोपली होती. आट्यापाट्या, खोखो, हुतूतू, अशा सर्व खेळांच्या संघाचा तो नायक होता. पोहण्याचेहि विक्रम त्यानं केले होते. फोटो काढण्याचा छंद केला होता व एका मोठ्या प्रदर्शनांत बक्षीस मिळविण्याइतपत प्राविण्य संपादन केलं होतं. या साऱ्या गोष्टींच कौतुक सरनीं केलं होतं. त्यांचीं ती सुबक सही ज्या वहींतल्या कित्येक पानांवर झाली होती ती वही अजूनहि त्याच्या घरीं कुठें तरी असेल...

जगन्नाथनं त्या पुस्तकाचीं पानं चाळल्यासारखं केलं. पण कोणत्याच पानावर त्याची दृष्टि स्थिर झाली नाहीं. मग त्यानं पुस्तक दूर ठेवलं, आणि स्वस्थ बसून तो खोलीचं निरीक्षण करूं लागला. सर फारसे श्रीमंत नव्हते हें त्याला माहीत होतं. पण युनिव्हर्सिटींत परीक्षक म्हणून काम

करून व विद्यार्थ्यांना उपयुक्त अशीं अभ्यास-पुस्तकं प्रसिद्ध करून त्यांनीं स्वतःच्या कुटुंबाला बरीचशी सुस्थिति आणली होती. त्यांनीं बांधलेल्या लहानशा टुमदार बंगल्याकडे पाहणाऱ्याला चांगल्या सुखवस्तु रसिक माणसाचा हा बंगला आहे असं चटकन् वाटत असे. ज्या खोलींत जगन्नाथ बसला होता ती खोली सुबक फर्निचर, टेबलावरचीं सुंदर कव्हरं, खिडक्यांना वरखालीं बसविलेल्या चकचकीत पितळी दांड्यांवर अर्धे सरकविलेले चिटाचे सुंदर पडदे व त्यांच्या झालरी, यामुळें विशेष आकर्षक झाली होती. भिंतीवर काळ्याभोर नाजूक फ्रेममध्यें बसविलेलीं चार चित्रं होतीं. एकच फोटो होता. तो घरांतल्या कुणाहि माणसाचा नव्हे, तर ज्यांच्या हाताखालीं सर शिकले होते त्या प्रोफेसरांचा होता...पण या सर्व गोष्टी पाहून जगन्नाथला आश्चर्य वाटलं नाहीं. सर साधे शाळेंतले मास्तर होते ते कॉलेजांतले प्रोफेसर झाले तेव्हांपासून म्हणजे जवळ जवळ गेल्या आठ दहा वर्षांत जगन्नाथ त्यांच्या घरीं आला नव्हता. पण त्यांनीं बांधलेला नवा बंगला बाहेरून कसा असेल, आणि आंतली बसायची खोली कशी असेल याची कल्पना त्याला सहज करतां आली असती. जें दृश्य तो प्रत्यक्ष पहात होता त्याप्रमाणेंच त्यानं कल्पना केली असती....पण एका गोष्टीची मात्र त्याला कल्पना नव्हती. सरना अशी सुंदर देखणी मोठी मुलगी आहे हें त्याला माहीत नव्हतं. आणि नुसती देखणी नव्हे तर शहाणीदेखील ! एखादी मुलगी भाऊ घरांत नाहींत असं सांगून आंत पळाली असती, पण हिनं तसं केलं नव्हतं...

" पण भाऊ घरांत नसले तरी जायचं कारण नाहीं. " असं ती हंसत म्हणाली होती !...

सरना हिचा फार अभिमान असेल...

इतक्यांत बाहेर पावलांची चाहूल झाली. दुसऱ्याच क्षणीं उषाचे वडील दाराच्या चौकटींत आले. जगन्नाथ कोचावरून चटकन् उठला, पुढें झाला आणि भाऊसाहेबांच्या पुढें वाकला. त्याच्या खांद्यावर हात थोपटीत भाऊ म्हणाले, " आलास, मला फार बरं वाटलं. आठवण ठेवलीस म्हणायची माझी. "

जगन्नाथ म्हणाला, " सर, तुमची आठवण नाहीं ठेवायची तर कुणाची ठेवायची ? "

" असले विचार फार दुर्मिळ झाले आहेत, जगन्नाथ. " भाऊसाहेब म्हणाले, " माझ्या डोळ्यांदेखत माझ्या ओळखीचं जुनं जग किती वेगानं नाहींसं होत आहे तें मी पाहतों ना ? जग फार कर्कश व्हायला लागलं आहे. पैशासाठीं, सत्तेसाठीं, कीर्तीसाठीं वाटेल तें करावं असं सामान्य लोकांचं तत्त्वज्ञान तयार व्हायला लागलं आहे. " त्यांचं त्यांनाच वाटलं, कीं आपण एकदम फार गंभीर विषय काढला. म्हणून ते एकदम म्हणाले, " पण तें जाऊं दे. बैस. "

त्यांनीं असं म्हणायला आणि आंतल्या दारांत येऊन उभं राहून " भाऊ " असं उषानं म्हणावयास एकच गांठ पडली. भाऊंनीं तिच्याकडे वळून पाहिलं, तेव्हां तिनं विचारलं, " काय आणूं ? चहा कीं कॉफी ? "

जगन्नाथानं पाहिलं, तों उषा आतां लाल फुलांची परीटघडीची पांढरी साडी नेसली होती आणि तिच्या गोऱ्यापान अंगाला शोभा देणारं तंग बाह्यांचं लाल चोळीवजा पोलकं तिनं घातलं होतं. पण मघाशीं जेव्हां ती घाईघाईनं दारांत येऊन उभी राहिली तेव्हां ती अधिक आकर्षक दिसत होती कीं आत्तां, याचा निर्णय त्याला आपल्या मनाशीं चटकन् करतां आला नाहीं. त्याच्या मनांत एवढंच आलं, सरना अशी सुंदर चुणचुणीत मोठी मुलगी असेल अशी कल्पना नव्हती.

यानंतरच्या पांच सहा दिवसांत तों भाऊसाहेबांच्या घरीं पुन्हां दोनदां आला. भाऊसाहेबांच्याबरोबर घटका दोन घटका गप्पा मारल्या कीं मनाला बरं वाटतं, नवी हुषारी येते, असं आपल्या येण्याचं स्वतःशीं समर्थन करून तो आला होता. पण केवळ बौद्धिक समाधानासाठींच आपण भाऊसाहेबांच्या घरीं मुद्दाम येत नसून उषा दृष्टीस पडावी, तिचं बोलणं ऐकायला मिळावं अशी ओढ आपल्याला वाटते ही गोष्ट त्याला स्वतःशीं नाकबूल करतां येईना. शेवटीं उषाकडे जावंसं वाटतं म्हणून आपण भाऊसाहेबांच्या बंगल्यावर जातों अशी स्वच्छ कबुली त्यानं स्वतःच्या मनाजवळ देऊन टाकली, आणि मग त्याच्या मनाची उलटसुलट उत्तरं संपलीं. घरांत उषा

एकटी असली तरी तो बसूं लागला. चळवळीच्या दिवसांत त्यानं व त्याच्या सहकाऱ्यांनीं केलेल्या साहसांचीं वर्णनं उषाला रोमांचकारक वाटत, आणि तीं सांगण्याचा आग्रह ती त्याला करी.

एकदां ती त्याला म्हणाली, "त्या धामधुमींत ज्या तऱ्हेचं आयुष्य तुम्हीं घालविलंत त्यानंतर आतांचे हे दिवस तुम्हांला अगदीं सामान्य आणि कंटाळवाणे वाटत असतील ?"

तो म्हणाला, "फार. मनाचा कंटाळा जावा म्हणून गेल्या दहा दिवसांत मीं रोज संध्याकाळीं काय केलं सांगूं तुम्हांला ?"

"हं."

"रोज कुठल्या तरी सिनेमाला जाऊन बसलों" तो म्हणाला, "पण सिनेमा पाहण्यांत फार तर दोन तास जातात. बाकीच्या वेळांत काय करूं ? माझ्यासारखीं ज्यांचीं मतं आहेत, त्यांची मोठी कुचंबणा होणार आहे. आम्हीं घातपात केले म्हणून शुद्ध गांधीवाद्यांचा आमच्यावर रोष, त्यांच्या राजकारणांत आम्हांला स्थान नाहीं; आमच्यापैकीं इतर लोकांनीं कॉंग्रेसविरोधी नवा पक्ष बनवायला हळू हळू सुरुवात केली आहे, त्यांतही मला स्थान नाहीं. कारण कॉंग्रेसविरुद्ध उठावणी करणं मला पसंत नाहीं. सारांश, राजकारणांत यापुढें राहायचं असलं तरी धड कोणत्याच पक्षांत नाहीं अशा अवस्थेंत मला राहिलं पाहिजे."

तिनं एकदां विचारलं, "मग तुम्ही करणार आहांत तरी काय ?"

"त्याचासुद्धां विचार करीत नाहीं मी सध्यां. कदाचित्–कदाचित्–" तें वाक्य त्यानं पुरं केलं नाहीं. उषा मनाशीं आश्चर्य करूं लागली, कीं कदाचित् काय म्हणणार होता तो ? तिला कांहीं तर्क करतां येईना. त्याबद्दल पुन्हां प्रश्न विचारणं तिला प्रशस्त वाटेना. परंतु मग तो केव्हांही आला आणि बोलत बसला कीं त्याच्या चर्येकडे निरखून पाहातांना तिला वाटे, खरंच, हे वरकरणी हंसतमुखानं ठीक बोलताहेत खरे, पण आंत यांच्या मनांत कसली तरी अस्वस्थता आहे. कसली कोणं जाणे ! त्याला विचारण्याचा धीर तिला होत नसे...ती निराळ्याच गोष्टींबद्दल त्याच्याशीं बोलत राही.

एकदां तो रस्त्यांत तिला भेटला. तिनं विचारलं, "दोन दिवसांत आलां नाहीं ? भाऊंनीं तुम्हांला एकदां जेवायला बोलावलं आहे, माहीत आहे ना ? केव्हां येणार ? दोन दिवसांत अगदींच कसे आलां नाहीं ?

तो म्हणाला, "मित्रांशीं भांडण्यांत गुंतलों होतों."

"म्हणजे काय ?"

"आमच्या पूर्वीच्या कांहीं मित्रांनीं कॉंग्रेसविरुद्ध जो नवा पक्ष काढला आहे, त्यांत मीं सामील झालंच पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. माझ्या खोलीवर येऊन ते रोज माझ्याशीं वाद घालीत बसत. आतांसुद्धां ते खोली-वर आलेले असतील, आणि माझी वाट पहात असतील. तुम्हांला वेळ असेल तर चला आम्ही कसे भांडतों तें पाहायला."

ती म्हणाली, "एका अटीवर येईन. तुमचं भांडण आटपलं कीं तुम्हीं आमच्याकडे जेवायला आलं पाहिजे."

"वा, फारच अवघड अट आहे म्हणायची !" असं म्हणून तो हंसला. ती त्याच्याबरोबर चालूं लागली. वाटेनं बोलतांना आपल्या कांहीं मित्रांचीं नांवं त्यानं सांगितलीं; व ते दिसायला कसे आहेत त्याचं वर्णन करून तो म्हणाला, "हीं माणसं मुद्दाम नीट बघून ठेवा तुम्ही. बेचाळी-सच्या धामधुमींत जेवढ्या लुटी झाल्या, त्यापैकीं बरेचसे पैसे बळकावून बसले आहेत हे लोक; आणि गप्पा सांगताहेत देशाच्या उद्धाराच्या व त्यासाठीं कॉंग्रेसला हाणून पाडण्याच्या ! त्यांचं म्हणणं मीं त्यांच्या नव्या विरोधी पक्षांत जावं. आहे कीं नाहीं गंमत ? साऱ्याच राजकीय पक्षांत लबाड संधिसाधूंचा बुजबुजाट झालाय बघा. राजकारण म्हणजे धंदा झालाय. आणि हा धंदा प्रामाणिक माणसाला साधण्यासारखा नाहीं. स्वातंत्र्य मिळाल्यावर तरी काय व्हायचं आहे कोण जाणे..."

उषाच्या मनांत आलं, भाऊदेखील असलेच उद्‌गार काढतात. ते म्हणतात, जीवनाच्या साऱ्या अंगांना व्यापाराचं रूप आलं आहे. स्वार्थां-साठीं वाटेल ती लबाडी करावी हें पहिलं नीतितत्त्व ठरूं पाहातंय. जग कर्कश व्हायला लागलंय....

जगन्नाथाच्या खोलीवर गेल्यानंतर त्यानं तिच्याजवळ आधीं ज्यांचीं वर्णनं केलीं होतीं त्या व्यक्ती तिनं मुद्दाम पाहिल्या. तीं माणसं तिला कांहीं आजच प्रथम दिसत नव्हतीं. ज्या सभेला ती भाऊबरोबर गेली होती, त्या सभेंत या माणसांच्या गळ्यांतहि हार पडले होते व यांनीं राणा भीमदेवी भाषणं केलीं होतीं. त्या भाषणांतल्या त्यांच्या गर्जना ऐकणाऱ्या हजारों लोकांना वाटलं असेल, बघा, बघा, यांचीं अंतःकरणं देशासाठीं कशीं तळमळताहेत ! आणि अंदरकी बात तिला आतां कळली होती, कीं हीं माणसं लुटीचा पैसा खाऊन ढेकर देऊन स्वार्थत्यागी पुढारी म्हणून मिरवायला तयार आहेत !...तिच्या मनांत आलं, यांचं आणि जगन्नाथचं पटायचं कसं ? ...

जगन्नाथनं त्या मंडळींना वाईट बोलून दुखविलं नाहीं. त्यांना त्यानं वारंवार सांगितलं होतं तेंच पुन्हां सांगितलं, "पुढारीपणाचा हट्ट धरून आपण वागावं यांत अर्थ नाहीं. आपण घातपाताची चळवळ केली, सामान्य लोकांनीं आपलं कौतुक केलं, इंग्रज सरकारचं राज्ययंत्र आपण खिळखिळं करून दाखविलं या बहादुरीबद्दल जनतेनं आपला गौरव केला, एवढ्यांतच आपण संतोष मानला पाहिजे. राजकारणांत यापुढें राहायचं असेल तर मानाचं पानच पाहिजे म्हणून हट्ट धरून चालायचं नाहीं. आणखी आपलीं स्वतंत्र मानाचीं पानं निर्माण करण्यासाठीं काँग्रेसला हाणून पाडण्यासाठीं नवा पक्ष उभारण्यांत तर देशद्रोह आहे. साधे शिपाई म्हणून आपण राजकारणांत राहायला तयार झालं पाहिजे. मनाची ही तयारी होत नसेल तर राजकारण सोडून द्यावं आणखी आपला पोटापाण्याचा उद्योग करावा हें उत्तम..."

त्याच्या खोलीवरून त्याला घेऊन आपल्या बंगल्यावर आल्यानंतर जेवणापूर्वी बाहेरच्या खोलींत बसून गप्पा मारतांना तिनं त्याला विचारलं, "तुम्हीं काय करायचं ठरवलं आहे ?"

तो म्हणाला, "म्हणजे काय ? कशाबद्दल विचारतां ?"

"नाहीं, इतरांना तुम्ही सांगतां राजकारणांत साधे शिपाई म्हणून रहा किंवा राजकारण सोडून द्या, म्हणून विचारतें, तुम्हीं स्वतः काय करायचं ठरवलंय ?"

"मीं होय ? बघूं या." एवढाच उद्गार काढून तो हंसला.

उषाच्या मनांत आलं, अजून माझ्याजवळ आपलं मन उघडं करावंसं यांना वाटत नाहीं. पण हरकत नाहीं. किती दिवस हे असं माझ्याशीं परकेपणानं वागतील पाहूंच या कीं. जसजसा त्याचा व आपला सहवास वाढेल तसतसा त्याला वाटणारा परकेपणा आपण घालवूं अशी उषाची खात्री होती. ती थांबायला तयार होती. त्याच्या सहवासांत राहायला मिळालं म्हणजे झालं, असं तिला वाटत होतं.

पण मग एके दिवशीं अकस्मात् तिला किंवा भाऊंना कांहीं न कळवितां तो निघून गेला! कुठें कुणास ठाऊक? त्याचा जो सहवास तिला अधिक हवासा वाटूं लागला होता तो अकस्मात् संपला! ती मनांतून फार कष्टी झाली. परंतु जें झालं त्याच्यावर तिला कोणता उपाय करतां येण्यासारखा होता? जगन्नाथाचा परिचय झाला, वाढला, तो आपल्याला आवडूं लागला पण तो अल्पकालिक ठरला--एवढीच या प्रकरणाची छोटीशी लघुकथा दैवानं ठरविली होती! ती संपली! त्याला कांहीं इलाज नाहीं. एखाद्या लघुकथेच्या प्रारंभींचा मजकूर वाचतांना वाटावं कीं ही चांगली मोठी कादंबरी होणार, पण आपली कल्पना चुकीची ठरावी, चार सहा पानांत सारी गोष्ट आटपावी, 'हें काय, संपलं?' म्हणून आपण मनाशीं आश्चर्य करावं, पण लेखकानं गोष्ट संपविली त्याला आपला इलाज नसावा— तसा हा एकंदर अनुभव उषाच्या वाट्याला आला होता!... जगन्नाथ निघून गेला होता. ती कांहीं करूं शकत नव्हती! तो कुठें गेला, कशासाठीं गेला त्याचीदेखील तिला कल्पना नव्हती!...

आठदहा दिवसांनंतर उषा भाऊंच्याबरोबर मुंबईला गेली. अलीकडे त्यांच्या पोटांत वरचेवर दुखत असे. मुंबईच्या नामांकित डॉक्टर मोदींची व त्यांची फार वर्षांची मैत्री होती, व डॉक्टर मोदी जेव्हां जेव्हां पुण्यास येत तेव्हां त्यांना म्हणत असत, एकदां चार आठ दिवसांची सवड काढून मुंबईला या म्हणजे तुमचं हें दुखणं निकालांत काढून टाकूं. पण हातांतलीं कामं आणि उठून कुठें बाहेरगांवीं जाण्याच्या बाबतींतला आळस या दोन गोष्टींमुळें भाऊंचं जाणं लांबणीवर पडत गेलं होतं. उषा तर एकदां थट्टेनं

डॉक्टर मोदींना म्हणाली होती, " डॉक्टरकाका, तुम्हीच आतां एक दिवस तुमच्या साऱ्या हत्यारांनिशीं इकडे या. त्याशिवाय कांहीं भाऊंच्या दुखण्यावर इलाज होईल अस मला वाटत नाहीं. " डॉक्टर मोदी म्हणाले होते, " माझीं हत्यारं घेऊन मी आलोंही असतों ग, पण त्याचं असं आहे, मुंबईला माझ्यासारखेच आणखी दहा पांच चांगले डॉक्टर आहेत. तुझ्या वडिलांची प्रकृति त्यांनाही दाखवावी अन् त्यांचं मत घ्यावं असं मीं ठरविलं आहे. यांना मुंबईला यायला सवड होत नाहीं म्हणजे काय ? केवळ आळसानं हे चालढकल करताहेत. तूंच आतां एक दिवस यांना ओढून आण मुंबईला. त्याशिवाय जमायचं नाहीं. खरं कीं नाहीं हो, भाऊसाहेब ?" त्यावर भाऊसाहेब म्हणाले होते, " डॉक्टर, आतां सवड झाल्याबरोबर येतों मुंबईला. खरंच येतों. माझं वचन समजा. " आणि हें वचन लक्षांत ठेवून भाऊ प्रकृति दाखवायला म्हणून मुंबईला गेले, त्यांच्याबरोबर उषा गेली. भाऊंची तब्येत इतर तीन चार निष्णात डॉक्टरांना दाखवावी अशी डॉक्टर मोदींची कल्पना होती. त्याप्रमाणें त्या डॉक्टरांना विचारून त्यांनीं वेळा ठरवून घेतल्या होत्या. कोणत्या तरी एका डॉक्टरकडे सकाळीं जायचं असे. बाकीच्या वेळांत डॉक्टर मोदी आपल्या कामांत गुंतलेले असत. भाऊसाहेब आणि उषा यांना तो वेळ इकडे तिकडे हिंडण्यांत, कुणाला तरी भेटायला जाण्यांत, किंवा सिनेमा पाहण्यांत घालवावा लागत असे.

एकदां मेट्रो थिएटरवरून जातांना तिथल्या चालू चित्रपटाच्या नांवाची पाटी पाहून उषा आपल्या वडिलांना म्हणाली, " भाऊ, हा फार गाजलेला चित्रपट आहे. याचा आजचा शेवटचा दिवस आहे."

भाऊ म्हणाले, " मग, आतांच जाऊन बघायचा म्हणतेस ? "

" हं. "

आंत जाऊन तिकिट काढण्याच्या खिडकीपाशीं गेल्यावर तिथल्या पाट्या पाहून भाऊ तिला म्हणाले, " शो सुरू होऊन अर्धा तास होऊन गेला. "

उषा म्हणाली, " होय ? मग ? "

थिएटरच्या व्यवस्थापकांपैकीं एकानं त्यांचं हें भाषण ऐकल्यावरून त्यांना म्हटलं, " मुख्य चित्रपट अजून सुरू व्हायचा आहे. आधीं फक्त बातम्या वगैरे आटपल्या आहेत."

उषा आनंदानं बापाला म्हणाली, " बातम्या गेल्या तर गेल्या. काढा तिकिटं."

तिकिटं काढून जिना चढून तीं दोघं गेलीं आणि द्वारपालानं दाखविलेल्या बत्तीच्या उजेडांत आपल्या जागीं जाऊन बसलीं. पडद्यावर एक रंगीत कार्टून चालू होतं. एक भयानक राक्षस एका सुंदर मुलीचा पाठलाग करीत होता व ती त्याला कांहीं केल्या सांपडत नव्हती. त्या धांवपळींत राक्षसाची होणारी दैना पाहून लोक हंसत होते.

कार्टून संपलं. विश्रांतीसाठीं दिवे लागले. उषानं आजूबाजूला पाहिलं. उजव्या बाजूच्या एका खुर्चीकडे तिनं पुन्हां पुन्हां पाहिलं. भाऊंच्या कानांत ती म्हणाली, " भाऊ ! " भाऊंनीं मान वळविली. ती हळूंच म्हणाली, " आपल्याच रांगेंत तीन खुर्च्या सोडून कोण बसलंय पाहिलंत का ? " भाऊंनीं पाहिलं, व ते म्हणाले, " जगन्नाथ ! " त्यांनीं जरा मोठ्यांदांच तें नांव उच्चारलं असावं. कारण तें ऐकतांच जगन्नाथनं मान वळवून त्या दोघांकडे पाहिलं, व नुसतं पाहूनच तो राहिला नाहीं, आपल्या जागेवरून उठून तो त्यांच्याजवळ आला.

तो अकस्मात् दिसल्यामुळें उषाला इतका आनंद झाला होता, कीं तिच्या तोंडून शब्दच बाहेर पडेना. ती फक्त हंसली, आणि तिनं नमस्कार केला. भाऊ त्याला म्हणाले, " अरे गृहस्था, आम्हांला कांहीं न कळवितां एकदम नाहींसा झालास. तुला कांहीं वाटलं नाहीं ? "

तो हंसून म्हणाला, " सर, पळून नाहींसं होण्याची अन् कुठें तरी लपून राहण्याची संवय गेल्या तीन वर्षांत अंगांत मुरली आहे ती जात नाहीं बघा ! "

थिएटरांत जेवढ्या मोठ्यांदा हंसणं शोभण्यासारखं होतं तेवढ्या मोठ्यांदा भाऊ हंसले व म्हणाले, " असं होय ? पण आम्ही आतां वॉरंट घेऊन आलों आहोंत. "

तो म्हणाला, "फार आनंदाची गोष्ट आहे. आपण सांगाल त्या ठिकाणीं अन् म्हणाल त्या वेळेस हजर होण्याची हमी देतों."

"ठीक आहे. पण तोंपर्यंत तूं जामिनावर खुला आहेस एवढं लक्षांत ठेव."

"जरूर. आपण पत्ता सांगून ठेवा. मी आपल्याकडे अवश्य येईन."

भाऊ उषाला म्हणाले, "आपला पत्ता लिहून दे पाहूं याच्याजवळ."

उषानं पोलक्याला खोचलेलं फौंटनपेन काढलं, चित्रपटाच्या जाहिरातीवर पत्ता लिहिला, व तो कागद त्याच्यापुढें केला.

डाव्या हातानं तो कागद हातीं घेतांना जगन्नाथनं उजव्या हातांतली कागदी पिशवी तिच्यापुढें धरून म्हटलं, "घ्या." तिनं विचारलं, "काय आहे ?" तो म्हणाला, "खारे काजू ! सिनेमाला यायचं म्हणजे फॅशनप्रमाणें सार्‍या गोष्टी केल्या पाहिजेत ना ? घ्या." पिशवीच्या उघड्या तोंडांत उषा हात घालूं लागली तेव्हां तो म्हणाला, "अंहं, असं नाहीं. सबंध पिशवी घ्यायची !" उषा म्हणाली, "असं होय ? अशी फॅशन आहे काय ?" तीं तिघंजणंही हंसलीं. तितक्यांत विश्रांति संपल्याची पहिली घंटा झाली. भाऊ जगन्नाथला म्हणाले, "जा तूं. आपल्या जागेवर जाऊन बैस. एकटाच आला आहेस कीं बरोबर कुणी आहे ?" खुर्च्यांपुढच्या अरुंद वाटेनं पावलं टाकीत जातां जातां मान वळवून तो म्हणाला, "एकटाच आहें, सर. माझ्याबरोबर कोण असणार ?" त्यानं हें बोलतांना हंसून आपल्याकडे पाहिलं असं उषाला वाटलं. तिनं त्याच्या नजरेला उलट नजरेनं जबाब दिला. घंटा झाली. दिवे गेले. चित्रपट सुरू झाला. विश्रांतीच्या वेळेंत बाहेर गेलेल्या प्रेक्षकांना त्यांच्या जागा दाखविण्यासाठीं द्वारपालांच्या बत्त्यांच्या उजेडाचे झोत कांहीं वेळ इकडे तिकडे पडून हालले. मग सारं स्थिरस्थावर झालं. सारे प्रेक्षक अगदीं स्तब्ध झाले व एकाग्रतेनं चित्रपट पाहूं लागले. उषाही चित्रपट पहात होती, परंतु तिचं चित्त कांहीं एकाग्र नव्हतं.

तीन चार दिवस झाले तरी जगन्नाथ आला नाहीं. तेव्हां उषाला वाटूं लागलं, तो येईल अशी आशा आपण ठेवली हेंच चुकलं. पूर्वी तिच्या

मनांत कधीं कधीं आलं होतं, तेंच आतां पुन्हां आलं. तिला वाटलं, चळवळींत अडीच तीन वर्षे काढावीं लागल्यामुळें असो किंवा मूळच्या प्रकृतिधर्मामुळे असो, जगन्नाथच्या स्वभावांत तऱ्हेवाईकपणा आहे. सामान्य माणसाच्या वागण्याबद्दल आपण जसा निश्चित अंदाज करूं शकतों तसा याच्या वागण्याविषयीं करण्याची सोय नाहीं...ती आपल्या मनाशीं म्हणाली, कदाचित् तो आपल्याला भेटायला कधींच येणार नाहीं. तो आला नाहीं तरी वाईट वाटून न घेण्याची आपल्या मनाची तयारी तिनं केली...

पण एके दिवशीं तो आला!

बसल्यावर त्यानं उषाला विचारलं, "भाऊ आहेत ना?"

ती म्हणाली, "भाऊंच्या पोटाचं सकाळीं ऑपरेशन झालं—"

त्यानं एकदम विचारलं, "म्हणजे काय? परवां तर सिनेमाच्या थिएटरांत—"

"होय ना, ते माझ्याबरोबर होते." मग तिनं भाऊ व आपण मुंबईस कां आलों, चार निरनिराळ्या डॉक्टरांनीं त्यांची तपासणी कशी केली, शेवटीं ॲपेंडिक्सचं ऑपरेशन करायचं कसं ठरलं, इत्यादि सारी हकीगत सांगितली.

तो म्हणाला, "असं काय? मला कांहींच कल्पना नाहीं."

"कल्पना कशी असेल? कबूल केलंत त्याप्रमाणें आलां असतां—"

तिच्या बोलण्यांतला राग ओळखून तो म्हणाला, "तुम्हीं माझ्यावर रागावावं हें योग्य आहे. भाऊ भेटले असते तर त्यांच्याजवळ पहिलं वाक्य मी बोलणार होतों तें माफी मागण्यासाठींच."

"म्हणजे भाऊंनींच तेवढी तुमची वाट पाहिली अशी तुमची कल्पना दिसते! किंवा माफी मागण्याइतकी मी मोठी नाहीं असं तरी तुम्हांला वाटतं!"

तिच्या पहिल्या वाक्यांत रुष्टता होती. दुसऱ्यांत खेळकरपणा होता. तिचं तें बोलणं ऐकून जगन्नाथ हंसला व म्हणाला, "तें का? तुम्ही सुद्धां माझी वाट पाहिली असेल हें माहीत आहे मला. अन् लहान

आहांत तेव्हां तुमची काय माफी मागायची असंहि माझं म्हणणं नाहीं. अगदीं आनंदानं माफी मागतों तुमची. पण खुल्या दिल्यानं मागितली तशी तुम्हीं ती द्यायला हवी."

उषाला एकदम हंसू आलं. ती म्हणाली, "याच्या आधीं कां आलां नाहींत सांगा."

"वेळच झाला नाहीं. फार कामांत होतों. खरंच."

"एवढ्या कसल्या कामांत होतां? तुम्ही कसला पत्ताच लागूं देत नाहीं आम्हांला."

तिला कांहीं न कळवितां तो एकाएकीं इकडे निघून आला होता त्याबद्दलचा राग तिच्या बोलण्यांत होता, ही गोष्ट जगन्नाथनं ओळखली. तो म्हणाला, "ज्या कामासाठीं इकडे आलों तें जुळेल अशी खात्री नव्हती अन् जुळलं नसतं तर परत येणारच होतों हें एक, आणि काम मनाप्रमाणें जुळल्यावर पत्र लिहिणारच होतों हें दुसरं. म्हणून कांहीं न सांगतां एकदम इकडे आलों."

"मग जुळलं का काम?"

"हो जुळलं. आतां मी परत येणार नाहीं."

हें ऐकून आपल्या मनांत उत्पन्न झालेली निराशा त्याला दिसूं नये म्हणून तिनं मान खालीं घातली. पण तिची चर्या जरी त्याला दिसली नाहीं तरी ती एकदम गप्प झाली त्यावरून तिच्या मनाची नाराजी त्याला समजली. ती थोडीशी घालविण्यासाठीं तो म्हणाला, "तिकडे परत येऊन मी काय करूं? प्रत्यक्ष राजकारणांत भाग घेण्याचा उल्हास मला राहिलेला नाहीं. निदान कांहीं दिवस तरी नको राजकारण असं वाटतं. पण उद्योगावांचून किती दिवस तसेच काढायचे? म्हणून इकडे आलों."

"मग आतां इकडेच राहाणार? मुंबईतच?"

"नेहमीं मुंबईतच असेन असं नाहीं. उद्योगाचं मुख्य ठिकाण मुंबईच, पण पाठवितील तिथें बाहेरच्या गांवींही जावं लागेल."

ती म्हणाली, "तुमचं हें सारं बोलणं उखाण्यासारखं वाटतं. जरा स्पष्ट सांगा कीं! कसला उद्योग पत्करला आहांत? राजकारण अजिबात सोडलंत?"

तो म्हणाला, " अजिबात सोडलं नाहीं. जो उद्योग पत्करला आहे त्याचा संबंध राजकारणाशींच आहे. "

ती हंसली व म्हणाली, " हाहि पुन्हां उखाणाच झाला. "

तो हंसला व हातांतली इंग्रजी वर्तमानपत्राची घडी पुढें करून म्हणाला, " हें बघा. म्हणजे कदाचित् उखाण्याचा उलगडा होईल. "

तिनं वर्तमानपत्र हातीं घेतलं आणि पाहिलं. ' थंडर ' असं त्या वर्तमानपत्राचं नांव होतं. पांच सहा दिवसांच्या मुंबईतल्या मुक्कामांत हें इंग्रजी वृत्तपत्र कांहीं लोकांच्या हातांत तिनं पाहिलं होतं, आणि ती दोनतीनदां फोर्टमध्यें गेली तेव्हां तें विकणाऱ्या पोरांच्या आरोळ्याहि तिनं ऐकल्या होत्या. तिनं पहिल्या पानावरून दृष्टि फिरविली, तेव्हां उजव्या हाताच्या शेवटच्या कॉलमांत जाड ठशांतल्या मथळ्याखालीं ' जगन्नाथ ' अशा वळणार उभट सहीचा ब्लॉक होता. तिनं कॉलमांतल्या मजकुराचा पहिला परिच्छेद वाचला, व मग जगन्नाथकडे पाहून म्हटलं, " थोडासा उलगडा झाला. पण पुरता नाहीं झाला. "

मग त्यानं सारी हकीगत सांगितली. या वृत्तपत्राचा संपादक मूर्ति नांवाचा एक तरुण मद्रासी होता. बेचाळीसच्या चळवळीच्या पूर्वी त्याची व जगन्नाथची मैत्री झाली होती. चारपांच वर्षांत त्यानं आपलं हें वृत्तपत्र चांगलं नांवारूपाला आणलं होतं. जगन्नाथ भूमिगत असतांना देखील त्याचे व मूर्तीचे संबंध राहिले होते. भूमिगतांनीं जेव्हां स्वतंत्र सरकार स्थापण्याचा उद्योग केला तेव्हां त्याबद्दलची रोमांचकारक सविस्तर आणि सचित्र हकीगत प्रथम ' थंडर 'च्या रविवारच्या साप्ताहिक अंकांतच प्रसिद्ध झाली होती. भूमिगतांच्या या स्वतंत्र सरकारला ' पत्री सरकार ' असं नांव देऊन लोकांच्या दृष्टीनं तें बदनाम ठरावं म्हणून पत्री सरकारवाल्यांच्या अत्याचारांचं कपोलकल्पित वर्णन करणारं खोटं पत्रक सरकारनं काढलं, तेव्हां त्या पत्रकाचा खरपूस समाचार ' थंडर 'मधून प्रथम घेतला गेला होता. जगन्नाथ प्रगट झाल्याचं कळलं तेव्हां मूर्तीनं त्याला लिहिलं होतं, ' तूं इकडे ये. मला तुझ्या सहकार्याची गरज आहे. ' त्याच्याकडे जावं कीं नाहीं म्हणून जगन्नाथानं कांहीं दिवस विचार केला होता. पण अखेर तो

आला होता. निदान वर्षभर तरी या वर्तमानपत्रांत काम करायचं त्यानं ठरविलं होतं.

जिची कांहींच कल्पना नव्हती अशी गोष्ट कळल्याप्रमाणें उषाची चर्या प्रफुल्लित झाली. तिनं विचारलं, " म्हणजे तुम्ही लेखक म्हणून या पत्रांत राहिलांत होय ? "

" नुसता लेखक नाहीं, फोटोग्राफरसुद्धां. आंतल्या पानावर दोन फोटो आहेत ते पहा ना. "

उषानं वृत्तपत्राचीं पानं उलटून आंत पाहिलं. दोन्ही फोटोखालीं ' फोटो बाय जे. पी. ' अशी ओळ तिला दिसली. त्यापैकीं एका फोटोंत दिल्ली येथील भंगी कॉलनींत लोकांच्या गर्दीपुढें गांधींची संध्याकाळची प्रार्थना चालली होती, आणि दुसऱ्यांत जीना आणि लियाकतअलीखान एका टेबलापुढें बसून कसली तरी गंभीर चर्चा करीत होते.

ती म्हणाली, " फारच चांगले झाले आहेत. इतके चांगले फोटो तुम्ही काढतां ? " त्यानं किंचित् हंसून मान हालविली तेव्हां तिनं म्हटलं, " मला माहीत नव्हतं. "

तो म्हणाला, " मी चांगले फोटो काढतों हें भाऊंना माहीत आहे. फार जुना नाद आहे हा माझा. "

अर्धवट स्वतःशीं बोलल्याप्रमाणें उषा म्हणाली, " किती थोडी तुमची माहिती आहे मला. "

" थोडी आहे तेंच बरं आहे ! "

" पण आणखी व्हावी असं मला वाटत असलं तर ? "

त्यानं तिच्या प्रश्नाचं उत्तर टाळलं. तो म्हणाला, " पण पूर्वीं नाद होता म्हणजे काय, पांच रुपयांच्या बेत्री कॅमेऱ्यानं फोटो काढायचे आम्हीं. शटर उघडायचा आणि मिटायचा एवढंच माहिती. फोटो येणं न येणं सूर्याच्या आधीन. निष्काम कर्मयोग. फोटो चांगला आला वाहवा, न आला वाहवा. "

उषाला खूपच हंसू आलं. " आतां नाहीं का निष्काम कर्मयोग ? "

" आतां काय म्हणून असेल ? " तो म्हणाला, " आतां माझ्या खास कामासाठीं म्हणून मूर्तीनं चांगला कोरा करकरीत बाराशें रुपयांचा कॅमेरा दिलाय मला. अर्धं कसब माझं, पण अर्धं यंत्राचं. फोटो चांगले आले आहेत कीं नाहीं ? "

ती म्हणाली, " चांगले म्हणजे ? फारच चांगले आहेत. पण तुम्हीं हे काढलेत केव्हां ? फोटो तर दिल्लीचे आहेत. "

तो म्हणाला, " होय. दिल्लीस जाऊनच मीं काढले. "

" म्हणजे ? तुम्ही दिल्लीस गेलां होतां ? "

" होय, परवांच परत आलों. दिल्लीस सध्यां राजकारणाच्या दृष्टीनं फार महत्त्वाच्या गोष्टी घडताहेत. मार्च महिन्याच्या सत्तावीस तारखेला कॅबिनेट मिशन इकडे आलं तें दिल्लीला तळ देऊन बसलं आहे. मिशनच्या आणि पुढाऱ्यांच्या मुलाखती चालल्या आहेत. हिंदुस्थान केव्हांहि अखंडच राहिला पाहिजे असा आग्रह धरणारे गांधी, आणि स्वयंपूर्ण स्वतंत्र पाकिस्तान मिळालंच पाहिजे म्हणून हट्ट धरणारे जिना, या दोन टोकांची मिळवणी करून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा आराखडा तयार करायचा आहे या कॅबिनेट मिशनला. पुढचे तीन चार महिने फार महत्त्वाचे ठरणार आहेत."

सामान्य राजकारणाबद्दलच्या त्याच्या त्या बोलण्याकडे उषा लक्ष देत होती. परंतु मनानं ती एका निराळ्याच प्रश्नाचा विचार करीत होती. म्हणून तिनं मधेंच विचारलं, " म्हणजे तुम्ही वरचेवर दिल्लीला जाणार म्हणायचे ? मला वाटलं तुम्ही मुंबईत बरेचसे राहाणार. "

तो म्हणाला, " मग राहाणारच कीं. नाहीं कोण म्हणतो ? माझा खरा मुक्काम येथें मुंबईतच असणार. फक्त ज्या ज्या ठिकाणीं महत्त्वाची राजकीय घटना घडत असेल तिथें तिथें मूर्ति मला जा म्हणणार. अन् मी कॅमेरा आणखी अक्कल घेऊन जाणार. सध्यां दिल्लीला मोठ्या घडामोडी चालू आहेत म्हणून दिल्लीला जाणार. "

" पण गेलांत तरी लगेच परत येणार ना ? "

" तर ! "

तितक्यांत घड्याळांत ठोके पडले व उषा म्हणाली, " हॉस्पिटलमध्यें जायला पाहिजे भाऊंकडे. "

त्यानं विचारलं, " मी येऊं का भाऊंच्या समाचाराला ? "

" अवश्य. भाऊंना बरं वाटेल. "

" मग येतोंच तर. आणि रोजसुद्धां येत जाईन. "

" तुमच्या शब्दांवर विश्वास कोण ठेवील ? "

" हळू हळू तुम्हीसुद्धां ठेवाल. "

" अं हं ! " असं म्हणून तिनं हंसून मान वेळावली, व म्हटलं, " पांच मिनिटं बसतां ? मी जरा आंत जाऊन येतें. " ती गेली.

बाहेर आल्यावर ती म्हणाली, " चला. "

ती कसल्या तरी विचारानं स्वतःशींच हंसत आहे असं जगन्नाथला वाटलं. तिला कांहीं तरी बोलायचं होतं, पण ती तें मनांतल्या मनांत ठेवीत होती. आणि कदाचित् स्वतःच्या त्या प्रयत्नाचंच तिला हंसूं येत होतं. जिना उतरून खालीं गेल्यावर तिचा चेहरा त्यानं पुन्हां समोरून पाहिला तेव्हां त्याला पुन्हां तेंच वाटलं. त्याला कळेना ही काय भानगड आहे. काय असावी म्हणून तो मनाशीं आश्चर्य करूं लागला.

शेवटीं तीं दोघं गाडींत बसलीं व गाडी चालू झाली तेव्हां तिनं एकदम त्याला विचारलं, " मी येऊं का मुंबईत राहायला ? "

" तुम्ही ? कां ? एम. ए. साठीं तर तुम्हीं आपल्या कॉलेजांत नांव घातलं आहे ना ? इथलीं मुंबईचीं कॉलेजं कांहीं जास्त चांगलीं नाहींत. "

ती म्हणाली, " आलें तर अभ्यासासाठीं नाहीं येणार. "

" मग ? "

" एखादी नोकरी द्या कीं मला मिळवून. "

तो मोठ्यांदा हंसला. " कां ? सरनीं तुम्हांला सांगितलंय कीं काय आपल्या पोटापाण्याचा उद्योग पहा म्हणून ? "

" वडिलांनीं तसं सांगितलं तरच नोकरी करावी होय ? इतर कांहीं कारणं असूंच शकत नाहींत ? "

" इतर ? तीं कोणतीं बुवा ? उदाहरणार्थ—"

पण उषा एकदम गप्प झाली. मुंबईस येण्याचा विचार तिच्या मनांत ज्या कारणानं एकदम जोरानं आला होता, तें कारण ती त्याला सांगूं शकत नव्हती. त्याच्या सहवासांत अंतर पडूं नये म्हणून मुंबईला येऊन राहावं असं तिला वाटूं लागलं होतं. कांहीं वेळ आपल्या या बेताचा विचार मनाशीं करीत स्वतःशींच थोडीशी हंसत ती स्तब्ध राहिली. मग त्याच्याकडे पाहून ती म्हणाली, " पण मी मुंबईस आलें तर मला नोकरी द्याल कीं नाहीं बघून ? तुमचा हा संपादक मित्र कोण मूर्ति का फूर्ति आहे त्याला विचारा कीं."

जगन्नाथ हंसला व तिच्याकडे बघत राहिला.



# प्रकरण तिसरं

" मॅडम ! गेटपा प्लीस ! इट्सा मॉर्निंगा युसी ! " एखाद्या सनई-सारख्या आवाजांतले ते खणखणीत शब्द कानीं पडतांच उषानं डोक्यावर ओढून घेतलेलं पांघरूण बाजूला केलं. आपल्यापुढें कोण उभं राहिलेलं आपल्याला दिसणार याचा तिनं बरोबर तर्क केला होता. बटुमूर्ति स्वामी-खेरीज अशा आवाजांत आणि वाकड्या तिकड्या मद्रासी हेलांनीं उच्चारलेल्या इंग्रजी भाषेंत दुसरं कोण बोलणार ? बिनछताच्या, बोडक्या, फळ्यांच्या पार्टिशननं बनविलेल्या उपसंपादकांच्या त्या खोलींत दोन डिक्शनऱ्या उशाला घेऊन व बरोबर आणलेली पातळ शालजोडी अंगावरून व डोक्यावरून लपेटून घेऊन झोपीं गेलेल्या उषाला साडेसहा वाजले कीं रोज हांक मारण्याचं काम आणि ती उठली कीं खालच्या उडुपी भुवनांतून पावडरच्या दुधाचा काळा कुळकुळीत पण गरम चहा आणून देण्याचं काम स्वामीकडे होतं...

उषानं डोळे उघडून पाहिलं. होय, लुंगी लावलेली, दहा ठिकाणीं फाटलेला गंजीफ्रॉक घातलेली, काळ्या कुळकुळीत अंगाची, त्याहूनही काळ्या व तेल चोपडून तकतकीत केलेल्या केसांची, गोबऱ्या नाकाची, स्फटिका-सारख्या पांढऱ्या दांतांची स्वामीची ठेंगणी ठुसकी मूर्तिच तिच्यापुढें उभी होती ! " गेटपा प्लीस ! इट्सा मॉर्निंगा ! " त्या मूर्तीच्या तोंडून सनईच्या आवाजांतले खणखणीत शब्द पुन्हां बाहेर पडले. ती हंसली. पण खरं म्हणजे त्यानं उठविल्याबद्दल मनांतून तिला त्याचा राग आला होता. ती अगदीं थकून गेली होती. 'थंडर'च्या अखेरच्या फॉर्मांचीं प्रुफं तपासून तिनं दिलीं, फॉर्म मशीनवर गेलेला पाहिला, व ती या खोलींत येऊन बाकावर आडवी झाली, त्या वेळेस पहाटेचे जवळजवळ तीन वाजले होते. पुरती साडे तीन तासांचीदेखील झोंप तिला मिळाली नव्हती. तिचे डोळे अजून सुस्तीनं मिटत होते. या खडबडीत, अंगाला बोचणाऱ्या, अरुंद बाकावरच

का होईना, पण आणखी चार घटका निजायला मिळालं असतं तर तिला हवं होतं...

तिच्या मनांतली ही इच्छा स्वामीनं ओळखली असावी. रोजच त्यानं हांका मारल्यावर ती जेव्हां पांघरूण दूर करून त्याच्याकडे बघे, तेव्हां तिच्या चर्येवर ती इच्छा त्याला दिसत असे. तिची ती थकलेली मुद्रा व झांपडलेले डोळे पाहून त्याच्या मनांत येई, ही तरुण मुलगी कशासाठीं इथें नोकरी करून हें कष्टाचं आयुष्य काढते आहे ? या कामावांचून हिचं काय अडलं आहे ? हें सोडून ही जात कां नाहीं ? त्याला वाटे हिला म्हणावं, 'बाई, तूं कशासाटीं हे हाल काढतेस ? माझी गोष्ट निराळी. मला अशा नोकरीचे कष्ट कुठें तरी उपसायलाच हवेत. माझ्या जन्मगांवीं श्रीरंगपट्टमला राहून काय करणार होतों मी ? इथें सारभात खाऊन, एखादे-वेळीं इडली दोशाची चैन करून, महिन्याकांठीं आठदहा रुपये मी शिल्लक तरी टाकूं शकतों आहे. चार वर्षे अशी शिल्लक टाकली, तर लग्नसुद्धां करीन ! पण माझ्यासारखी कांहीं तुझी गोष्ट नाहीं. तुझं घर आहे, आईबाप आहेत म्हणून ऐकतों. मग त्यांच्याकडे सुखानं राहायचं सोडून इथली हमाली कशासाठीं करते आहेस ?'...पण स्वामी आपले हे विचार मनांतच ठेवीत असे. तिची ती चर्या पाहिली व तिनं जांभई देत, 'गुड मार्निंग, स्वामी' असं म्हटलेलं ऐकलं, कीं तो फक्त आपल्या विचित्र हेलांच्या इंग्रजींत विचारी, "टायर्डा ?" त्याच्या त्या उच्चारांचं उषाला इतकं हंसू येत असे कीं क्षणभर तिच्या शरीराचा थकवा नाहींसा होत असे. मग ती त्याला इंग्रजींत म्हणे, "स्वामी, चहा". "यस मॅडम" म्हणून तो धावे, आणि ती उठून चूळ भरते न भरते तोंच एका हातांत केटली धरीत व दुसऱ्या हातांतल्या कपबश्यांचा खळ्खळ् असा आवाज करीत तो परत येऊन दाखल होई. त्यानं फक्त तिच्यापुरता नव्हे तर तिला स्वत:ला व त्याला, दोघांना मिळून पुरेल असा चहा आणावा अशी त्याला उषाची ताकीद होती. त्याप्रमाणें स्वामीच्या स्वारीनं आजही चहा आणला, व तिचा कप भरून तिच्यापुढें केला. दुसऱ्या कपांत चहा ओतून तिच्यादेखत तो कधीं घेत नसे. चहा प्याल्यावर तोंड आणि केस नीट करून, नेसणं व्यवस्थित करून, शालजोडीची घडी करून घेऊन ती बाहेर

पडली कीं मग स्वामी चहा पीत असे, व तो प्याल्यावर उषाला आशीर्वाद देण्यासाठीं आपल्या श्रीरंगपट्टमच्या श्रीरंगाचं स्मरण करीत असे.

उषा खोलींतून बाहेर पडली, व उजव्या हाताला वळून जिना उतरूं लागली. इमारतींत कागदाचा आणि छापायच्या शाईचा वास सुटला होता. मोठं मशीन बाहेरगांवीं जाणाऱ्या प्रती अजून छापीतच होतं, त्यामुळें त्याचा आवाज ऐकूं येत होता, आणि पायांखालची लांकडी भुई किंचित् हादरत होती. सकाळच्या पहिल्या प्रहरचा उजेड इमारतींत शिरला होता, परंतु जागोजागचे दिवे अजून कुणीं मालविले नव्हते. मेहेतर खराटा घेऊन जिन्याच्या पायऱ्यांवरचा केरकचरा लोटूं लागला होता. ती खालीं तळ-मजल्यावर जाऊन पोंचली, तिथें जिन्यालगतच्या लहानशा बोळकांडींत एका जुनाट टेबलावर 'थंडर'च्या आजच्या अंकांच्या प्रतींचा भारा रचलेला होता, व टेबलामागच्या स्टुलावर बसलेला एक माणूस वर्तमानपत्र विकणाऱ्या पोरांना व भय्यांना ते मागतील तेवढे अंक देऊन पैसे घेत होता. अंक मिळाल्याबरोबर ते काखोटीला मारून पोरं रस्त्यावर धावत होतीं व आरोळी ठोकूं लागत होतीं.

उषा रस्त्याला लागली, कोपऱ्यापर्यंत गली आणि बसची वाट पहात उभी राहिली. तिचे पाय शिणले होते. डोळे जड झाले होते. केव्हां एकदां आपल्या खोलीवर पोंचूं आणि गरम गरम दुधाचा चहा घेऊं असं तिला झालं होतं. सकाळच्या या पहिल्या प्रहरीं बसमध्यें जागा वाटेल तेवढी मिळत असे, पण तिची वाट फार वेळ पहावी लागत असे. एखादे वेळेस बस लवकर येई. पण कधीं कधीं दहा पंधरा मिनिटं उषाला वाट पहावी लागे. आज वाट पाहण्याचा दिवस होता. ती उभी राहिली. पुन्हां पुन्हां मान उंच करून दूरच्या वळणापर्यंत ती नजर टाकी, आणि बसच्या धुडाचा पुढला भाग वळण घेऊन दिसूं लागला कीं काय तें पाही. बस दिसली नाहीं कीं ती पुन्हां उभी राही.

त्या लहानशा चौकाच्या चारी कोपऱ्यांवर इराणी हॉटेलं होतीं. त्यांच्या पाट्यावरचीं इंग्रजी नांवं पहावीं, तों 'पॅराडाईज' 'लाइट ऑफ एशिया' अशीं होतीं. पण या 'नंदनवनां'त आणि 'आशियाच्या दीपां'त

शिरणारे लोक खात पीत होते काय, तर बाजरीचा पाव आणि भुकटीच्या दुधाचा चहा !...परंतु या हालांचीहि लोकांना आतां संवय झाली होती. तांदूळ मिळत नव्हते, गहूं नव्हता, दूध नव्हतं, साखऱ्या नव्हता, जी ती वस्तु दुकानदार लोक एकदम भूमिगत करीत होते ! हिंदु-मुसलमानांचा दंगा कोणत्या भागांत कसा पेटेल याचा नियम नव्हता. संचारबंदीचा हुकूम केव्हां लागू होईल हें सांगतां येत नव्हतं ! तरी लाखों लोक या मुंबईत राहातच होते...उषाच्या मनांत येई, कशाच्या आशेवर हे लोक इतके हाल सोसताहेत ? आतां लवकरच स्वातंत्र्य मिळेल आणि मग जिकडे तिकडे सुबत्ता होईल, भरपूर अन्न मिळेल, कपडा मिळेल या आशेवरच स्वातंत्र्यापूर्वी इतक्या वेदना सोसाव्या लागतात ? आणि स्वातंत्र्य ! मिळाल्यावर या वेदना जादूची कांडी फिरल्याप्रमाणें थांबणार आहेत ?...

ज्यांना मुंबईत राहाण्यावांचून गत्यंतर नाहीं त्या लोकांचं असो, पण आपण स्वतः मुंबईतल्या जीवनाचे हे हाल कशासाठीं सोशीत आहोंत, हा प्रश्न उषाच्या मनांत आल्यावांचून राहात नसे. परंतु त्या प्रश्नाचं तिचं उत्तर तयार होतं. छापखान्यांतल्या छोट्या स्वामीच्या मनांत तिच्याबद्दलचे जे विचार येत असत ते तिला माहीत नव्हते. पण इथें मुंबईस आल्यानंतर नव्यानं ओळखीची झालेली तिची मैत्रीण तारा तिला वरचेवर विचारीत असे, "सोन्यासारखं घर सोडून इथें कशासाठीं येऊन राहिली आहेस तूं ? अन् नोकरी करायचीच, तर एखादी चांगली कर कीं. वाटेल तेवढ्या मिळतील तुला सुखाच्या नोकऱ्या. वर्तमानपत्राच्या रामरगाड्यांत पिचायची कुठली बुद्धि झाली आहे तुला ?" उषा तिच्या प्रश्नाला उत्तर द्यायचं टाळीत असे. पण तिचं तिला तें उत्तर पक्कं माहीत होतं...जगन्नाथाचा सहवास मिळावा म्हणून 'थंडर'च्या कचेरींतच काम मिळविण्याचा हट्ट तिनं केला होता आणि कितीहि कष्ट सोसावे लागले तरी हें काम शिकायचं, हौसेनं करायचं, त्यांत प्रगति करून दाखवायची, मूर्तीची आणि जगन्नाथाची शाबासकी मिळवायची, अशी महत्त्वाकांक्षा तिनं धरली होती. वाटेल तितक्या अडचणी सोसायची तिची तयारी होती...

मूर्तीनं तिची मुलाखत घ्यावी अशी व्यवस्था केल्याचं तिला सांगतांना जगन्नाथ म्हणाला होता, "मात्र हें बघा, मीं मूर्तीला स्पष्ट सांगितलं

आहे, कीं तुम्ही माझ्या शिफारशीनं त्याच्याकडे जातां असं त्यानं मुळींच मानायचं नाहीं. कामावर ठेवून घ्यायला तुम्ही योग्य आहांत कीं नाहीं तें त्यानं ठरवायचं आहे!" उषा म्हणाली होती, "हरकत नाहीं"... ती जेव्हां मूर्तीच्या मुलाखतीला गेली तेव्हां तिला बरेच प्रश्न विचारल्या-नंतर तो म्हणाला होता, "तुम्हांला कामावर घ्यावं असं मला वाटतं; पण घेण्यापूर्वी एका गोष्टीची तुमची तयारी आहे काय, याबद्दलचं उत्तर मला हवं."

"कोणत्या गोष्टीची?" तिनं विचारलं होतं.

"सांगतों. ऐका." मूर्ति म्हणाला होता. "तुम्हांला कामावर या म्हणतांना तुमचा स्त्रीपणा माझ्या लक्षांत नाहीं. आणि इथें काम करतांना तुम्हींदेखील तो लक्षांत ठेवतां कामा नये. याचा अर्थ असा, कीं तुम्ही स्त्री आहांत म्हणून कोणतीहि खास सवलत तुम्हांला मिळायची नाहीं. सांगतील तें काम तुम्हांला करावं लागेल. रिपोर्टिंग, न्यूज एडिटिंग, प्रूफ करेक्शन, रात्रपाळी—जें वाट्याला येईल तें काम करावं लागेल! आणि हौसेनं! बिनतक्रार! जमेल तुम्हांला?"

"जमेल." तिनं दृढ स्वरांत उत्तर दिलं होतं. जगन्नाथाच्या सहवासाला मुकण्याची तिची इच्छा नव्हती. शक्य तितकं त्याच्या जवळ राहतां यावं, आणि त्याच्या आवडीच्या उद्योगांत निपुणता मिळवून त्याला खुष करावं म्हणून भाऊंची परवानगी मिळवून ती इथें आली होती. त्यासाठीं वाटेल तितक्या अवघड परीक्षा द्यावयाची तिची तयारी होती. डॉ. मोदींच्या घरींच कांहीं दिवस रहा असं भाऊंनीं तिला सुचविलं होतं. पण तसं न करतां ती कुठें तरी एक खोली पाहणार होती. स्वतंत्रपणें राहणार होती. आपल्या ठिकाणीं कांहीं तरी कर्तृत्व आहे असं जगन्नाथाला दाखविणार होती...ती म्हणाली, "जमेल; माझी परीक्षा आपण पहाच."

तें ऐकल्याबरोबर आपल्या वागण्यांतला आतांपर्यंतचा दूरपणा आणि ताठरपणा मूर्तीनं एकदम टाकला होता. 'थंडर'चा मुख्य संपादक या नात्यानं तो आतांपर्यंत तिच्याशीं बोलला होता, पण तिचं तें उत्तर ऐक-तांच ती संपादकाची भूमिका त्यानं टाकली होती. एकदम हंसून त्यानं

आपला हात तिच्यापुढें धरला होता, व तिनं हात देतांच त्यानं तो दाबला होता. “मी तुमच्याशीं इतकं बोललों अन् तुम्हांला इशारा दिला याचं कारण सांगतों.” तो म्हणाला होता. “खेळ म्हणून, मनाची एक नवी करमणूक म्हणून एखादं काम पत्करणारीं माणसं मला आवडत नाहींत. अशीं माणसं दुसऱ्याच्याही उपयोगाला येत नाहींत, व स्वतःचंही हित साधूं शकत नाहींत. निष्ठा, कळकळ, अडचणी सोसण्याची तयारी, त्यांतून वाट काढण्याची जबरदस्त इच्छा, या गुणांचा मी फार चाहता आहे. कारण या गुणांनींच माझा फायदा झाला. मी आपला देश सोडून आठ वर्षांपूर्वी प्रथम मुंबईत आलों तेव्हां माझ्या-जवळ काय होतं सांगूं? अंगावरचे कपडे, हातांत एक बॅग आणि खिशांत दहा रुपयांच्या दोन नोटा, यापलीकडे माझ्याजवळ कांहीं नव्हतं. वर्तमानपत्रांच्या धंद्यांत नांव काढण्याची तीव्र इच्छा एवढंच माझं सारं भांडवल होतं. त्या वेळीं मोठ्या लोकाचे उंबरठे मीं कसे झिजविले, त्यांचीं कोणतीं उत्तरं ऐकून घेतलीं, कसा निराश झालों, आणि तरी चिकाटीनं कोणते कष्ट करीत राहिलों, हें सारं एखाद्या वेळेस सांगेन तुम्हांला. किंवा जगन्नाथला सारं माहीत आहे, तो सांगेल तुम्हांला. ऐकण्यासारखी हकीकत आहे. तें जाऊं द्या. तुम्ही माझ्याकडे येतां याबद्दल मला आनंद होतो. उद्यांपासून तुम्ही यायला लागा. सकाळीं नऊ वाजतां या. तुम्हांला कोणतं काम द्यायचं तें मी तोंपर्यंत ठरवीन, आणि ज्यांच्या हाताखालीं तुम्हांला काम करायचंय त्यांची ओळख करून देईन. गुड बाय. जगन्नाथ दिल्लीला गेला आहे तो उद्यां परत येणार आहे, तुम्हांला माहीत आहे?”

तिला माहीत होतं. दिल्लीला जाण्यापूर्वी मुद्दाम तिला भेटून जगन्नाथनं तिला सांगितलं होतं. पण ही गोष्ट मूर्तीला सांगायची नव्हती, किंबहुना जगन्नाथचे व आपले विशेष मैत्रीचे संबंध आहेत ही गोष्ट ‘थंडर’च्या कचेरींत कुणाच्याही लक्षांत येतां कामा नये अशा धोरणानं तिला वागायचं होतं. एकाच ठिकाणीं काम करणारीं दोन माणसं एवढाच आपला व जगन्नाथचा संबंध आहे हें कचेरींतल्या कामाच्या वेळेस ती लक्षांत ठेवणार होती...म्हणून मूर्तीच्या प्रश्नाचं उत्तर तिनं दिलं नाहीं. जगन्नाथ उद्यां

दिल्लीहून परत येणार या बातमीचं आपल्याला कांहींच महत्त्व नाहीं असं दाखविल्यासारख्या चर्येनं मूर्तीचा तो प्रश्न तिनं ऐकला होता, व " गुड बाय " म्हणून ती त्याच्या पुढ्न उठून खोलीबाहेर पडली होती... इत्रं तें खायला मिळत नाहीं, प्यायला मिळत नाहीं, ट्रॅममध्यें, बसमध्यें जागा मिळत नाहीं, अशा मुंबई शहरांतल्या चमत्कारिक आयुष्याच्या लोंढ्यांत तिनं जाणूनबुजून उडी घेतली होती...कोपऱ्यावरच्या इराणी हॉटेलांत बाजरीच्या काळ्या पावाचे तुकडे उग्र वासाच्या काळ्या चहांत बुचकळून कसेबसे गिळून बाहेर पडणाऱ्या लोकांकडे पहात, सकाळच्या पहिल्या प्रहरीं बसची वाट बघत ती या कोपऱ्यावर रोज उभी राहूं लागली होती. कधीं बस लवकर येई, कधीं तिला खूप उशीर लागे...

आज तिला फार उशीर लागला नाहीं. ती येऊन उभी राहिली. उषा आंत चढली; तिच्या मागोमाग दोन ख्रिश्चन गोंवेकर चढले. ती वरच्या मजल्यावर जाऊन खिडकीपाशीं एका बाकावर बसली. ते दोघे तिच्या पुढच्या बाकावर येऊन बसले. बस वेगांत सुरू झाली, तेव्हां त्या दोघांपैकीं एकानं सिगरेटचं पाकीट काढलं; दोघांनीं सिगरेट्स तोंडांत खोंचल्या, ज्याचं पाकीट होतं त्यानं काड्याची पेटी काढली व काडी ओढली. पण खिडकीवाटे वाऱ्याचा झोत आल्यामुळें ती विझली. पेटींतल्या काड्या संपल्या होत्या. त्यानं पेटीला एक शिवी हांसडली, व आपल्या दोस्ताला विचारलं, " तुझ्याजवळ पेटी आहे ? " त्यानं मान आणि हात नकारार्थी हालविला. त्या दोघांनीं तिच्याकडे पाहिलं. तुझ्याजवळ कुठली काड्याची पेटी असायला बाई, अशा अर्थाच्या त्यांच्या चर्या झाल्या. वरच्या मजल्यावर आणखी दोघेच पुरुष होते. त्यांच्याजवळ काड्याच्या पेटीची याचना त्यांनीं केली. पण त्या दोघांजवळहि काड्याची पेटी नव्हती. दोन दिवसांपूर्वीपासून मुंबईत काड्याची पेटी मिळेनाशी झाली होती ! त्या दोघां गोंवेकरांनीं तोंडांत खोंचलेल्या सिगरेट्स रागानं बाहेर उपसल्या आणि काळा बाजार करणाऱ्या व्यापाऱ्यांना व त्यांचा चावटपणा चालू देणाऱ्या सरकारला शिव्या द्यायला आरंभ केला...कंडक्टर त्यांच्याजवळ तिकिट देण्यासाठीं आला. " दोन दादर " असं इंग्रजींत सांगून एकानं दहा रुपयांची नोट कंडक्टरपुढं केली. पण कंडक्टरनं ती घेतली नाहीं. " सुटे पैसे असले तर

द्या," असं म्हणून बसमध्यें लावलेल्या एका छोट्या सूचनाफलकाकडे त्यानं बोट दाखविलं. त्या फलकावर लिहिलं होतं, "तुमच्या तिकिटाचे सुटे पैसे मोजून कंडक्टरला द्या." असल्याच पाट्या उषाला मुंबईत जिकडच्या तिकडच्या दुकानांत दिसल्या होत्या. 'मोड नाहीं' अशी रंगीत पेन्सिलीनं किंवा शाईनं लिहिलेली ठळक अक्षरांतली पाटी हॉटेलांच्या दारादारावर टांगलेली तिला दिसली होती. मुंबईत साखऱ्या नव्हता, रॉकेल नव्हतं, काड्याच्या पेट्या नव्हत्या, सुटे पैसे नव्हते! देशाला लवकरच मिळणाऱ्या स्वातंत्र्याची लोक वाट पहात होते. मधल्या काळांत जगांत जिकडे तिकडेच पसरलेल्या टंचाई-च्या काळ्या बाजाराच्या भोंवऱ्यांत गटंगळ्या खात होते...ते दोघे ख्रिश्चन गोंवेकर शिव्या पुटपुटत उठले व पुढच्या टप्प्यावर बस थांबली तेव्हां जिना उतरून रस्त्यावर गेले. एक नवा उतारू चढून वरच्या मजल्यावर आला. कंडक्टरनं त्याला विचारलं, "सुटे पैसे आहेत ना?". तो हंसला, आरामशीर बसला, आणि ऐटींत सिगरेट् काढून ती पेटवून त्यानं खिशां-तली दोन आणेली बाहेर काढली व कंडक्टरपुढें धरली. त्याच्याकडे पाहून उषाला हंसू आलं. तिच्या मनांत आलं, या माणसाजवळ काड्याची पेटी आहे, दोन आणेली आहे! हा सुखांत आहे. या चमत्कारिक कठीण काळांत सुखदु:खाचीं साधनं आणि कारणं किती विकृत झालीं होतीं... डाव्या अंगच्या समुद्राकडच्या वाऱ्याची झुळूक उषाच्या अंगावरून गेली तेव्हां तिला बरं वाटलं. तिनं आपले थकलेले डोळे मिटले... तिनं ते पुन्हां उघडले तेव्हां गांवाच्या गजबजलेल्या भागांतून बस चालली होती. धान्याच्या आणि रॉकेलच्या सरकारी दुकानांपुढें लोकांच्या रांगा उभ्या राहिल्या होत्या; त्या रांगांत पुरुष क्वचित् होते. त्यांना रोजगारावर जायचं असल्यामुळें रांगेत घटकान् घटका तिष्ठत उभं राहायला त्यांना वेळ नव्हता. तें काम लाजलज्जा, मानसन्मान, संकोच सारं सोडून बायकांनीं करणं भाग होतं. पिशव्या हातांत घेऊन उच्चकुलीन मध्यम वर्गांतील स्त्रिया त्या दाटीमध्यें मोलकरणींसारख्या उभ्या होत्या! रॉकेलच्या रिकाम्या बाटल्या हातांत धरणाऱ्या सात सात आठ आठ वर्षांच्या मुली दिसत होत्या. दुकानांच्या दारांच्या फळ्या अजून उघडायच्या होत्या!...उषानं डोळे

मिटून घेतले. महायुद्धाचा हा वारसा होता! स्वातंत्र्यापूर्वीच्या या प्रसूतिवेदना होत्या!...

उषा आपल्या खोलीवर पोचली ती मनाशीं चहा चहा असं घोकीतच. दुधाचा गरम चहा केव्हां एकदां मिळेल असं तिला झालं होतं. खोलींत गेल्याबरोबर तिनं आधीं तोंड खसखसून धुतलं, अर्धवट वाळलेला टॉवेल दोरीवरून ओढून घेऊन पुसलं, चहाच्या दोन कपांपुरतं दूध आहे असं पाहिलं, आणि मग स्टोव्ह पेटविला. ती स्वतःशींच हंसली. तिच्याकडे चहापुरतं दूध होतं, स्टोव्ह पेटवायसाठीं काड्याची पेटी होती! आणखी काय पाहिजे? इतर किती तरी लोकांपेक्षां ती अधिक सुखी होती! तिनं पाण्याचं आधण ठेवलं. आतां ती भरपूर चहा पिणार होती.

पण तितक्यांत शेजारच्या ब्लॉकमधील बाई तिच्याकडे आली व म्हणाली, " थोडं दूध मिळेल का तुमच्याकडे? माझ्या तान्ह्या मुलाला द्यायसाठीं हवंय. दूध घालणारा भैय्या येईल म्हणून वाट पाहिली. पण आतां कळलं कीं भय्ये लोक आज दूध घालणारच नाहींत. "

उषानं विचारलं, " कां ? "

" ते आज संप करणार आहेत म्हणे. मोर्चा नेणार आहेत. दुधानं भरलेले हंडे खुशाल रस्त्यावर ओतून देणार आहेत ! "

उषा गप्प राहिली.

ती बाई म्हणाली, " आम्हीं कुणीं आज चहा घेतलाच नाहीं, पण तान्ह्या मुलाला तर दूध घातलं पाहिजे ना ? म्हणून म्हणतें देतां का ? आहे का थोडं तुमच्याजवळ ? "

उषानं मुकाट्यानं दुधाची पातेली त्या बाईच्या हातीं दिली. ती बाई हंसत निघून गेली. उषानं चहा तयार केला व दूध न घालतांच तो पिऊन टाकला. तो कांहीं फारसा वाईट लागला नाहीं. तिच्या मनांत आलं, साहेब लोक दुधावांचूनच चहा पितात म्हणे. चहा पिण्याची खरी पद्धति हीच आहे. दूध नाहीं म्हणून अडून बसायचं काय कारण? दूध मिळत नाहीं ना? सोडून द्यावं!...वेळ आली कीं किती गोष्टी सोडायला माणूस तयार होतो! ... मनाशीं असे विचार करीत उषानं चहाची

भांडीं आवरून ठेवलीं, आणि ती अंथरुणावर पडली. आतां ती दोन तीन घटका छानपैकीं ताणून देणार होती. कशाची पर्वा करणार नव्हती. तिनं डोक्यावरून पांघरूण ओढून घेतांच एक गोड विचार तिच्या सोबतीला आला. उद्यां जगन्नाथ दिल्लीहून परत येईल! दिल्लीस चालू असलेल्या कॅबिनेट मिशनची ताजी हकीकत तो सांगेल. तुझं कसं काय चाललंय म्हणून चवकशी करील. त्याच्याबरोबर निवांतपणें चार घटका घालवतां येतील!...हा गोड विचार करतां करतांच तिचे शिणलेले डोळे झोपेच्या स्वाधीन झाले...

दारावर कुणी तरी टकटक करीत आहे असं वाटल्यामुळें ती उठली. तिनं दार उघडलं. आणि पहाते तों समोर तारा उभी असलेली तिला दिसली. ती हंसून म्हणाली, "ये कीं."

आंत येतां येतां तारा म्हणाली, "म्हटलं सांपडते आहेस कीं नाहींस कुणास ठाऊक?"

"म्हणजे काय? मी काय कुठें पळून गेलें होतें कीं काय?"

"पळून गेलेलं माणूस एक वेळ सांपडेल ग. पण तूं हमखास खोलीवर सांपडशील अशी खात्री नाहीं वाटत. तुझ्या कामाच्या वेळांना कांहीं नियम आहे का? दुपारीं, संध्याकाळीं, रात्रीं, पहांटे केव्हांहि तूं कामावर जाणार. मला खरंच कळत नाहीं हें तूं कशासाठीं चालवलं आहेस?"

तिच्या दोन्ही खांद्यावर हात दाबून तिला कॉटवर बसवीत उषा म्हणाली, "तुझ्या-माझ्यांतला हा नेहमींचा वाद आत्तां कशाला हवाय्? दुसऱ्या गप्पा मारूं आपण. बैस. तारे, दुधावांचूनचा चहा फार सुंदर लागतो असा शोध मीं नुकताच लावलाय. पिऊं या काय आपण चहा? स्टोव्हमध्यें रॉकेल आहे, काड्याच्या पेटींत काडया आहेत, डब्यांत चार चमचे साखऱ्या आहे, चहा आहे. करूं का चहा? बोल."

तारा म्हणाली, "दुधाशिवाय चहा प्यायचा? ईः!" तिनं अंगाला शहारे दिले.

तिच्या त्या अभिनयाचं उषाला हंसू आलं. तिच्या अंगावर चापटी मारल्याप्रमाणें करून ती म्हणाली, "तूं श्रीमंताची मुलगी! तूं ईः

करणारच. पण हजारों लोक आज कशा प्रकारचा चहा पिऊन राहिले आहेत त्याची चव तर बघशील ? ”

तारा म्हणाली, “ मला नको ती चव अन् तूंहि घेऊं नकोस. तुला मी आमच्याकडे घेऊन जायसाठीं आलें आहे जेवायला. आज घरांत बाजार आणला आहे. ”

“ हं ? ”

“ आईला म्हटलं, मी उषाला घेऊन येतें. आई म्हणाली घेऊन ये, म्हणून आलें. मनांत मात्र शंका होती खोलीवर सांपडतेस कीं नाहीं. मीं तुला न्यायसाठीं यावं अन् तूं मूर्तिपूजेसाठीं गेलेली असावीस ! ”

तिच्या गालावर हळूंच चापटी मारून उषा हंसली. ‘ थंडर ’चा संपादक मूर्ति होता म्हणून तिच्या आफिसांतल्या कामाला ‘ मूर्तिपूजा ’ असं चेष्टेचं नांव तारानं ठेवलं होतं. तिचा तो विनोद उषाला फार आवडत असे. ती म्हणाली, “ मूर्तिपूजा आटपूनच सकाळीं परत आलें ग. अन् पहाटे साडे तीनपर्यंत जाग्रण झालं होतं म्हणून झोपलें होतें. ”

“ आतां पुन्हां केव्हां जायचंय् तुला ? ”

“ संध्याकाळीं सहा वाजतां. ”

“ तंवर अगदीं मोकळी आहेस ना ? ”

“ अगदीं. ”

“ मग चल तर माझ्याबरोबर. आटप. ”

उषा साडी बदलीत होती तेव्हां तारानं विचारलं, “ जगन्नाथ इथें नाहींत वाटतं ? ”

“ कशावरनं म्हणतेस ? ”

“ तूं आपला सवडीचा वेळ माझ्या घरीं घालवायला इतक्या तत्परतेनं तयार झालीस यावरून. ”

साडीच्या निऱ्या खोवतां खोवतां टेबलावरचा कंगवा उचलून घेऊन उषानं तो ताराच्या अंगावर फेकला.

"कां ग ? चिडायला काय झालं ?" असं म्हणून तारा मोठ्यांदा हंसली, व मग एकदम उषाजवळ जाऊन तिनं तिला घट्ट मिठी मारली. उषा ओरडली, "अग, अग !" त्या दोघीही हंसत सुटल्या.

ताराच्या घरीं केव्हांहि गेलं कीं उषाच्या मनांत येई, हें घर आहे कीं खाणावळ आहे ? घर म्हणावं तर इथें सतत सतरा माणसांचा अन् अठरा पोरांचा राबता आणि गलका चालू आहे ! खाणावळ म्हणावी तर या साऱ्या माणसांचं एकमेकांवरचं प्रेम ओसंडून वहात आहे. ताराच्या त्या घराला एकंदर दालनं किती होतीं त्याचा उषाला अजूनही पत्ता लागला नव्हता. एका खोलींत फोनोग्राफ लागलेला असावा, एकींत पत्त्यांचा नाहीं तर कॅरमचा डाव पडलेला असावा, एका ठिकाणीं क्रिकेट टेनिस-सारख्या खेळांतल्या ताज्या बातम्यांची चर्चा हातघाईला आली असावी, अशा प्रकारें मधल्या किंचित् अंधाऱ्या बोळकंडीच्या दुतर्फाच्या खोल्यांतून नाना उद्योग सदा चाललेले असत. आडव्या माजघरांत तरण्या, म्हाताऱ्या बायकांचीं घरकामं सुरू असत, आणि रांगणारीं मुलं रांगत असत, धाकटीं आपापल्या आयांच्या मांडीवर पीत असत. आणि पलीकडच्या मोठ्या सैपाकघरांत दोन तीन चुलाणे सदा पेटलेले असत, व त्यांवर सैपाक शिजत असे. चहाला तर कधीं खंडच नसे. ताराचे आजोबा, आजी, आई, वडील, तीन चुलते, तीन चुलत्या, त्यांचीं मुलं, भाई, वसंत, बाबू, अबू, कुमार असे पांच भाऊ, थोरल्या तिघांच्या बायका—अशा तीन पिढ्यांनीं भरगच्च भरलेलं असं हें घर होतं. या घरांतल्या साऱ्या माणसांचीं नातीं आणि नांवं हमखास ओळखण्याचा प्रयत्न कांहीं दिवस केल्यानंतर उषानं आतां सोडूनच दिला होता. ओटीवरच्या आराम खुर्चीत पांढऱ्या स्वच्छ गिर्द्यांना टेकून बिनदातांच्या तोंडाचा जबडा सारखा हालवीत, कधीं चिरूट ओढीत, जाड काचांच्या चष्म्याला अगदीं टेकून धरून टाइम्स वाचीत पडलेले ताराचे आजोबा तेवढे तिला प्रतिज्ञेनं ओळखतां येत असत. या गृहस्थांनीं पहिल्या महायुद्धांत अमाप पैसा मिळविला होता. कांहीं वर्षे ते मुंबईचे जे. पी. होते. आपल्या मुलांना त्यांनीं मोठमोठ्या नोकऱ्या लावून दिल्या होत्या, उद्योग उभारून दिले होते. त्यांचीं श्रीमंत घरांतल्या मुलींशीं लग्नं लावून दिलीं होतीं. घरांतील माणसं वाढत होतीं. श्रीमंती वाढत होती.

आणि वंशवृक्षाचा हा सारा विस्तार समाधानानं बघत ताराचे ऐंशीच्या घरांत पोचलेले आजोबा एखाद्या अध्यक्षाप्रमाणें नेहमीं आराम खुर्चीत पडलेले उषाला दिसत. डॉ. मोदी या कुटुंबाचे फॅमिली डॉक्टर होते, व त्यांच्याकडेच ताराची व उषाची प्रथम ओळख झाली होती. डॉ. मोदी चेष्टेनं म्हणत, "येवढ्या एका कुटुंबांतली रोगराई निस्तरतां निस्तरतां एका नव्या डॉक्टरचा चरितार्थ चालेल. या कुटुंबासाठीं लागणारी कोयनेल सल्फासारखीं औषधं, मलमं, इंजेक्शनं यांसाठीं कपाटांतला एक निराळा कप्पाच मीं राखून ठेवला आहे."... उषाला एका गोष्टीचं कौतुक वाटे ती ही कीं या घरांतले लहानमोठे सारे कर्ते पुरुष आणखी आणखी श्रीमंत होण्यासाठीं धडपडत होते. श्रीमंत होण्याचे सगळ्यांचेच मार्ग सोज्वळ नव्हते, काळ्या बाजाराचं पापहि कांहीं जण करीत होते, हें तिच्या हळूं-हळूं लक्षांत आलं तेव्हां मात्र तिला वाईट वाटलं. पण ती मनाशीं विचार करी, यांच्या पापपुण्याकडे मी कशाला लक्ष देऊं ? मी ताराकडे घटकाभर येणार, बसणार, एखादे वेळेस जेवणार!...पांच भावांची तारा एकुलती एक बहीण तेव्हां ती सगळ्यांची लाडकी असावी हें ठीकच होतं, आणि तिनं एखादी मैत्रीण घरीं आणली कीं तिचंही साऱ्यांनीं कोडकौतुक करावं हेंहि क्रमप्राप्तच होतं.

नेहमींप्रमाणें आजही ताराच्या घरीं गेल्याबरोबर उषाच्या भोंवतीं लहान मोठ्या मुलांचा घोळका जमा झाला. जो तो आपल्या एकट्याचं म्हणणं तिनं ऐकावं म्हणून प्रयत्न करूं लागला. अबू आणि कुमार तिला म्हणाले "आमच्याबरोबर तुम्ही कॅरम खेळलं पाहिजे". थोरला बाबू म्हणाला, "अंगणांत येतां का बॅडमिंटन खेळायला ?". ती जेवण्या-साठीं राहणार आहे असं कळल्यावर साऱ्यांनींच आनंदानं उड्या मारल्या. जेवणाच्या वेळेस भरलेलं ताट आणि ताटाभोंवतालच्या अर्धा डझन वाट्या पाहून उषाच्या मनांत आलं, हें कुटुंब म्हणजे बाहेर जिकडे तिकडे पसर-लेल्या दुर्भिक्षाच्या आणि हलाखीच्या समुद्रांत सुरक्षित कोरडं राहिलेलं एक बेटच आहे. इथें खाण्यापिण्याची कधीं ददात होती का ?... पण या चैनीच्या पृष्ठभागाखालीं पुरुषांच्या काळ्या बाजारांतल्या किती पापांचे थापुद्रे होते कोण जाणे ! ...

पण या विचारानं उषानं जेवणाची चव बिघडूं दिली नाहीं. यथेच्छ जेवण झाल्यावर गप्पासप्पांत आणि खेळण्यांत पांच तास केव्हां निघून गेले हें तिला कळलंदेखील नाहीं. मग तिला एकदम आठवलं, कीं सहा वाजतां आपल्याला कामावर जायचं आहे. ती उठली व म्हणाली, " तारे, आतां मला गेलं पाहिजे. "

तारा हंसून म्हणाली, " मूर्तिपूजेची वेळ झाली वाटतं तुझी ? "

" हं. "

तितक्यांत ताराचा सगळ्यांत मोठा भाऊ भाई खोलींत आला व म्हणाला, " क्रॉफर्ड मार्केटजवळ हिंदुमुसलमानांचा दंगा सुरू झाला आहे म्हणे. "

" आं ? " तारा आणि उषा दोघी एकदम उद्‌गारल्या.

" होय, अशी दाट बातमी आहे. कर्फ्यू जाहीर होणार म्हणतात. "

तारा उषाला म्हणाली, " आतां कसं ग करतेस ? कर्फ्यू जाहीर झाली तर तूं फोर्टमधल्या आपल्या ऑफिसांत जाणार कशी ? " भाईकडे वळून तिनं सांगितलं, " हिला आत्तां जायचं आहे. जाऊं द्यायची का ? "

उषा म्हणाली, " मला गेलंच पाहिजे. कर्फ्यूची नुसती अफवाच आहे ना ? "

भाई म्हणाला, " अफवाच आहे, पण ती खोटी असेल असं नाहीं मला वाटत. "

उषा म्हणाली, " कर्फ्यू जाहीर झालेली नाहीं ना ? "

" जाहीर नाहीं झाली. पण—"

" मग मला जायलाच हवं. "

तारा तिचा दंड धरून म्हणाली, " मी नाहीं तुला जाऊं देणार. "

" वा ! म्हणजे काय झालं ? "

भाई म्हणाला, " हें पहा उषाताई, आपण असं करूं. कर्फ्यू जाहीर झाली नसली तरी केव्हां होईल त्याचा नियम नाहीं. तुम्हांला जायलाच हवं असेल तर जा. पण तुम्हांला एकटं जाऊं देणार नाहीं मी. मी पोंचवतों तुम्हांला तुमच्या ऑफिसपर्यंत. गाडी करून जाऊं. चला. "

उषा ऑफिसांत जाऊन पोंचली. टेलिप्रिंटरवर आलेल्या साऱ्या बातम्या तिनं पाहिल्या. मुंबईत कुठें सुरामारी झाल्याची बातमी नव्हती. पण कलकत्त्यांत मात्र एकदम दंगा उसळला होता. दिल्लींतही थोडी धमाधम झाली होती. या आकस्मिक दंग्यांचं कारण तिला कळेना. मनाशीं आश्चर्य करीत ती कांहीं वेळ बसली, आणि मग तिच्या टेबलावर ताजीं प्रुफं येऊन पडलीं तेव्हां तीं तपासण्याचं काम तिनं सुरू केलं...वरचेवर तिच्या मनांत येत होतं, दिल्लींतही थोडी धमाधम झालेली आहे...जगन्नाथ दिल्लीहून निघाला असेल. आतां गाडींत असेल. उद्यां त्याची व आपली भेट होईल. या आकस्मिक दंग्यांचं कारण तो आपल्याला सांगेल...

दुसऱ्या दिवशीं तिला भेटल्यावर जगन्नाथानं जें कारण सांगितलं तें ऐकल्यावर तिला भलतंच आश्चर्य वाटलं. " जीनांच्या राजकारणांतला हा एक नवा डाव आहे " तो तिला म्हणाला, " कॅबिनेट मिशनचे लोक गांधींची आणि कॉंग्रेसची मनधरणी करताहेत, आणि आपली पाकिस्तानची मागणी धुडकावून द्यायच्या विचारांत आहेत अशी शंका जीनांना आलेली आहे. पाकिस्तानची मागणी पूर्ण केल्यावांचून इंग्रजांची सत्ता हिंदुस्थानांतून काढून घेण्याचा प्रश्न नीट मिटवितां येणार नाहीं, असं आव्हान देण्याचा जीनांचा निश्चय आहे. हिंदुस्थानांत हिंदु आणि मुस्लिम अशीं दोन राष्ट्रं आहेत, तीं गुण्यागोविंदानं एकत्र नांदू शकणार नाहींत, स्वतंत्र पाकिस्तान मिळाल्याखेरीज मुसलमानांना समाधान वाटायचं नाहीं, हें सारं कॅबिनेट मिशनच्या नजरेला त्यांना आणायचं आहे. यासाठी या दंग्यांची ठिकठिकाणीं उठावणी करण्याचा आदेश जीनांनीं आपल्या लीग-वाल्या लोकांना दिला आहे, अशी दिल्लीस दाट वदंता आहे. "

उषा उद्गारली, " खरं म्हणतां ? "

जगन्नाथनं मान हालविली.

ती म्हणाली, " पण गांधी तर प्राण गेला तरी फाळणीला तयार होणार नाहींत ! "

" दिल्लीच्या भंगी कॉलनींत संध्याकाळच्या प्रार्थनेच्या वेळचीं त्यांचीं भाषणं ऐकायला हवीस तूं. "

ती एकदम म्हणाली, " मला कधीं नेतां तुम्ही आपल्याबरोबर ? चल-तेस का म्हणून विचारतां तरी का ? उठतां अन् निघून जातां ! मला डांबून ठेवली आहे या कचेरींत ! माझं कांहीं कां होईना. तुम्हांला कुठं आहे फिकीर ?"

तिच्या या उपरोधिक लाडिक बोलण्यामुळें त्यांच्या संभाषणांतला गंभीरपणा एकदम नाहींसा झाला. राजकारणाचा विषय जगन्नाथ एकदम विसरला. तो हंसून तिला म्हणाला, " फिकीर नाहीं असं कसं म्हणतेस ? मूर्तीजवळ मी नेहमीं चौकशी करीत असतों. एखादे वेळेस तो आपण होऊन मला सांगतो. तो अगदीं खुष आहे तुझ्यावर-म्हणजे तुझ्या कामावर !"

त्यानं अखेरचे ते शब्द खोडून बदलले या गोष्टीचं उषाला हंसू आलं, आणि ती हंसल्यामुळें त्याच्याहि लक्षांत स्वतःच्या बोलण्यांतली गंमत आली व तोहि हंसला. ती म्हणाली, " उद्यां कोण वार आहे ?"

" रविवार !"

" म्हणजे माझ्या हक्काच्या सुटीचा दिवस, माहीत आहे का ?"

" हो."

" आपली स्वारी उद्यां इथें आहे का ? का लगेच जायची आहे दिल्लीला ?"

" नाहीं."

" मग तो कागद घ्या पाहूं, आणि त्याच्यावर तुमचा माझा उद्यांचा प्रोग्रॅम लिहा. हं लिहा. सकाळीं नऊ वाजतां—"

" काय करायचं ?"

" विचारायचं नाहीं. मी सांगतें तें सरळ उतरून घ्यायचं."

" ऑल रॉइट्. नऊ वाजतां, सांगा."

तिनं सबंध बारा तासांचा प्रोग्रॅम सांगितला व म्हटलं, " याबरहुकूम उद्यां वागायचं बरं का. नाहीं तर कांहीं तरी सबब काढाल. संध्याकाळीं साडेसहा वाजतां सिनेमा शो, एवढंच मीं सांगितलं आहे. कोणतं पिक्चर तें उद्यां ठरवूं आपण."

दुसऱ्या दिवशीं सगळ्यांत पाहाण्यासारखा चित्रपट मेट्रोमधें आहे असं दोघांचंही एकमत पडलं, आणि तीं तोच पहावयास गेलीं. खुर्च्यांवर जाऊन बसल्यावर उषाच्या मनांत आलं, आपण भाऊंबरोबर आलों होतों

व जगन्नाथ एकदम आपल्या दृष्टीस पडला, तेव्हां तो याच रांगेंत याच खुर्चीवर बसला होता काय? तिला वाटलं, त्याला विचारावं. पण तिनं विचारलं नाहीं. त्यानं काजूंची कागदी पिशवी खिशांतून काढून तिच्यांपुढें धरली, तेव्हां ती म्हणाली, "अरे खरंच! ही फॅशन आहे नाहीं का?" आणि तिचा तो प्रश्न ऐकून तो ज्या तऱ्हेनं हंसला तें पाहून तिची खात्री झाली, कीं पूर्वींच्या त्या दिवसाची त्यालाहि आज आठवण येत होती. मनांतल्या मनांत तिला फार आनंद झाला. तिनं विचारलं, "काजू घेतले केव्हां? मला कसे दिसले नाहींत?"

तो म्हणाला, "तूं क्लोकरूममधें गेली होतीस."

घंटा वाजली. जाहिराती येऊन गेल्या. बातम्यांचा चित्रपट संपला. कार्टुन झालं. मधल्या विश्रांतीसाठीं दिवे लागले. आणखी काजू घेऊन यायसाठीं म्हणून जगन्नाथ बाहेर गेला. उषा एकटीच आपल्या खुर्चीवर बसून राहिली. थिएटरांतल्या त्या दिव्यांपेक्षांहि अधिक झळझळीत असे समाधानाचे दिवे तिच्या अंतःकरणांत लागले होते. आजूबाजूच्या खुर्च्यांवरचीं माणसं एकमेकांत आनंदानं कुजबुजत होतीं. त्यांच्याकडे पहात त्यांना उद्देशून ती मनांतल्या मनांत म्हणाली, माझ्या आनंदाची तुम्हांला काय कल्पना आहे?...ती अगदीं फार सुखांत होती.

जगन्नाथ परत येऊन तिच्याजवळ बसला, अंधार झाला. तिनं हळूच दोनचार काजू काढून आपला हात त्याच्या तळहातावर टेकला...दोनचार जाहिराती पुन्हां पडद्यावर आल्या आणि त्यानंतर पडद्यावर जें दिसलं तें पाहातांच थिएटरमधल्या साऱ्या प्रेक्षकांनीं, 'आः!' असा उद्गार काढला तो ऐकूं आला.

पोलीस कमिशनरच्या सहीची ती एक तांतडीची नोटीस होती!

शहरांत दंगा सुरू झाला होता!

कांहीं विवक्षित भागांत कर्फ्यू लागूं करण्यांत आली होती!

सिनेमा पाहाण्यासाठीं होम–गार्ड्समधले व पोलीस–फोर्समधले जे लोक आलेले असतील त्यांनीं ताबडतोब थिएटर सोडून आपापल्या मुख्य चौकीवर हजर झालं पाहिजे होतं!

—✱—

# प्रकरण चवथं

मूर्ति खोलींत आला व तिच्या टेबलापुढें उभा राहून म्हणाला, "हें पत्र वाचा, तुम्हांला गमतीदार वाटेल."

उषानं त्याच्याकडे आश्चर्यानं पाहिलं. ती आणि इतर चार पांच सह-संपादक ज्या खोलींत काम करीत बसत असत तिथे तो कधीं कधीं एकदम येत असे, परंतु त्याचं काम बहुधा इतर कोणाशीं तरी असे. तिच्याशीं तो बोलत नसे. त्यामुळें आज तो येऊन आपल्याशीं बोलला याचं उषाला थोडंसं आश्चर्य वाटलं. तिनं पत्र उघडलं व त्यावरून नजर फिरविली. पत्र 'थंडर'च्या संपादकांना उद्देशून लिहिलेलं होतं. मजकूर मोजकाच होता.

"आपल्या पत्राच्या गेल्या रविवारच्या ताज्या साप्ताहिक अंकांत नुकत्याच झालेल्या अखिल भारतीय महिला परिषदेच्या अधिवेशनाचें जें समालोचन आलेलें आहे तें फारच मार्मिक आणि खुसखुशीत आहे. आपल्या खास प्रतिनिधीनें तें लिहिलेलें आहे. प्रतिनिधीचें नांव छापलेलें नाहीं. समालोचन मला इतकें आवडलें कीं तें लिहिणाऱ्या व्यक्तीला पारितोषिक देण्याची माझी इच्छा आहे. सोबत चेक धाडीत आहे. त्यावर ज्या कोणीं तें समालोचन लिहिलें असेल त्या व्यक्तीचें नांव लिहून तिला पोंचता करावा. मी आपला फार आभारी होईन. समालोचन लिहि-णाऱ्या व्यक्तीचें नांव आपली हरकत नसेल तर मला कळावें अशी माझी इच्छा आहे."

उषानं पत्र संपवून मान वर केली तेव्हां मूर्ति तिच्याकडेच पाहून हंसत होता. तो तिला म्हणाला, "परिषदेबद्दलचा तुमचा रिपोर्ट वाचल्याबरोबर मीं तुम्हांला म्हटलं नव्हतं काय, कीं तुम्हीं फार चांगला लिहिला आहे? परंतु परिषदेवर तुम्हीं केलेली टीका अध्यक्षीणबाईना अगदीं नापसंत होईल

याबद्दलहि माझी खात्री होती. पण आतां पाहतों तों खुद्द अध्यक्षीणबाईंच्या पतिराजांनाच ही तुमची टीका फार आवडलेली दिसते. तुमच्या समालोच-नाच्या चाहत्यांत हे गृहस्थ असतील अशी अगदीं कल्पना नव्हती."

उषानं त्याचं तें बोलणं ऐकतां ऐकतां पुन्हां एकदां त्या पत्रावरून नजर फिरविली. जाड नोट-पेपरच्या वरच्या डाव्या कोपऱ्यांत 'शांति कुंज, वॉर्डन रोड' असा पत्ता होता. आणि पत्राखालीं उजव्या कोपऱ्यांत 'नंदलाल सुरैया' अशी सही होती. तिनं मान वर करून मूर्तीला विचारलं, "म्हणजे महिला परिषदेच्या अध्यक्षीणबाई यांच्या पत्नी म्हणतां ?"

"हो ना" मूर्ति म्हणाला, "तुमची खरमरीत टीका वाचून श्रीमती ताराबेन सुरैया चांगल्याच गरम झाल्या असतील याबद्दल मला शंका नाहीं. पण त्यांचे पतिराज तुमच्यावर खुष झालेले दिसतात. हा तुमचा विक्रम खरोखर नोंदून ठेवण्यासारखा आहे. मी तुमचं अभिनंदन करतों. हा तुमचा चेक सांभाळा. यावर मीं तुमचं नांव लिहिलं आहे. आणि नंदलाल सुरैयांनाहि तुमचं नांव—"

एकदम तोंडावर बोटं ठेवून उषानं विचारलं, "कळविलं कीं काय ?" मूर्तीनं मान हलविली तेव्हां ती पुढें म्हणाली, "मला विचारायचं तरी होतंत आधीं."

"कां ? तुमचं नांव सुरैयांना कळूं नये अशी तुमची इच्छा होती कीं काय ?"

उषानं मान हलविली आणि म्हटलं, "हं. बऱ्या लोकांना कशाला आपलं नांव कळवायचं ?"

"हा तुमचा विचार मात्र वेडेपणाचा आहे हं. एखादी चांगली गोष्ट केली तर तिचं बक्षीस घेतांना माणसानं मागं रेंगाळूं नये. समजा उद्यां कदाचित् नंदलाल सुरैयांनीं तुम्हांला चहाला बोलावलं तर—"

"शीः ! ते कशाला मला बोलावतात ?" उषा म्हणाली, "आणखी बोलावलं तरी मी नाहीं ग बाई जायची."

मूर्ति हंसला. "पण त्यांनीं तुम्हांला चहाला बोलावलं तर त्यांत आपल्या पत्राला मोठेपणा मिळणार आहे. आणि हा मोठेपणा घालविण्याची

परवानगी मी नाहीं तुम्हांला देणार. तुम्ही जायला पाहिजे असा हुकूम मीं केला तर ? ”

उषाला योग्य असं विनोदाचं उत्तर सुचलं नाहीं. तिचा चेहरा गोरा-मोरा झाला. मूर्ति हंसत दूर झाला व खोलींतून निघून गेला. ती गेल्याबरोबर खोलींतल्या बाकीच्या टेबलांपाशीं बसलेले सारे सहसंपादक आपापल्या जागांवरून उठून उषाच्या भोंवतीं गोळा झाले, व नंदलाल सुरैयांचं पत्र वाचण्यासाठीं एकमेकाच्या हातांतून ओढून घेऊं लागले. सगळ्यांनीं तिचा हात धरधरून हालविला, आणि तिच्यापाशीं फीस्ट मागितली. दोघांतिघांनीं तर ‘ स्वामी ’ ‘ स्वामी ’ म्हणून आरोळ्या देखील ठोकल्या; व स्वामीची बटु मूर्ति आंत आल्यावर खालच्या हॉटेलांतून काय काय आणायचं त्याची त्याला ऑर्डरदेखील दिली.

उषाला जगन्नाथची आठवण झाली, आणि तो आज इथें नसावा याचं वाईट वाटलं. पण तिनं मनाशीं बेत केला, कीं आज रात्रीं घरीं गेल्यावर त्याला ही सगळीच हकीगत कळवायची. मूर्ति एकदम खोलींत येऊन आपल्यापुढें कसा उभा राहिला, नंदलाल सुरैयांचं पत्र पाहून आपण कशा आश्चर्यचकित झालों, मूर्तीचं आणि आपलं काय काय बोलणं झालं, मूर्ति गेल्यानंतर मंडळींनीं आपल्याभोंवतीं कसा गिल्ला केला, आणि हॉटेलांतून खायचे जिन्नस आणायसाठीं स्वामी कसा धांवत गेला, तें सगळं जगन्नाथला लिहून कळवायचं तिनं मनाशीं ठरविलं. स्वामीबरोबर आलेल्या हॉटेलांतल्या नोकरानं एका टेबलावर खाद्यपदार्थांच्या बशा मांडल्या तेव्हां सारी मंडळी भोंवतीं उभी राहिली व खातां खातां बोलूं लागली. त्यांच्याशीं एकीकडे बोलतां बोलतां जगन्नाथला लिहावयाच्या पत्राचा मजकूर उषा मनाशीं तयार करीत होती:—

‘ ...महिला परिषदेचं समालोचन मीं जेव्हां प्रथम लिहून काढलं तेव्हां मूर्तीलादेखील तें आवडेल कीं नाहीं मला शंका होती. कारण माझं लिहिणं फार कडक होतं. मात्र तसं कडक लिहिलंच पाहिजे असं मला मनःपूर्वक वाटत होतं. बायकांच्या या प्रांतिक आणि अखिल भारतीय परिषदा म्हणजे निव्वळ डझन दोन डझन ठराविक श्रीमंतांच्या बायकांचे

मिरविण्याचे आणि व्यासपीठावरून बोलण्याचे समारंभ ठरूं लागलेले आहेत. मोटारगाड्यांतून हिंडणाऱ्या, पांचपांचशे रुपयांचे शालू नेसणाऱ्या, सोन्यामोत्यांच्या दागिन्यांनीं मढविलेल्या या बायकांनीं चार दिवस पंच-पक्वान्नांचे पुरवे झोडायचे आणि समान हक्कांची भाषा बोलायची ! देशांत जिकडेतिकडे दारिद्र्यांत पिचत पडलेल्या बायकांचीं दुःखं यांना जन्मांत कधीं कळलेलीं असतील काय ? दारिद्र्याच्या आणि अन्यायाच्या ओझ्याखालीं कुंथ-णाऱ्या लाखों बायकांपैकीं एक तरी यांच्या परिषदांतून चुकून दिसते काय ? असल्या परिषदांचे फार्स पुरे झाले, असं मला खरोखरच वाटतं. जवळ जवळ सत्तर वर्षांपूर्वी आपली इंडियन नॅशनल कॉंग्रेस ज्या अवस्थेंत होती तीच अवस्था या महिला परिषदांची आहे, नव्हे काय ? असल्या परिषदांच्या ठरावांना काय किंमत आहे ? श्रीमंतांच्या बायका ज्या ठिकाणीं चार दिवस नाचूं शकतात अशी एक फॅशनेबल मजलिस, यापलीकडे या महिला परिषदेचं कांहीं तरी महत्त्व आहे काय ?...मला असं मनापासून वाटत होतं आणि मीं तें लिहिलं. माझी कल्पना होती, कीं मूर्ति तें वाचून पाहील आणि केराच्या टोपलींत टाकून देईल. पण त्याला माझं लिहिणं फार पसंत पडलं. तें वाचल्यावर तो मला काय म्हणाला तुम्हांला माहीत आहे ? तो म्हणाला, ‘ जगन्नाथनं तुमची शिफारस केली ती बरोबर होती. ’ तुम्ही तर म्हणाला होतांत, ‘ मी शिफारस मुळींच करणार नाहीं. तूं मूर्तीला भेट. तूं त्याला पसंत पडलीस तर तो तुला ठेवून घेईल. ’ अन् आतां मूर्ति सांगतो, कीं तुम्हीं शिफारस केली होती. तुमचीं एक एक गुप्त कारस्थानं मला कशीं कळतात बघा...स्वामीनं खालच्या हॉटेलांतून काय काय आणलं होतं. चिवडा, गरम भजीं, उप्पेट्टू, दोशा, केक, शिरापुरी, अरे बापरे ! आमच्या खोलींतले सारे सहसंपादक या पदार्थांवर नुसते तुटून पडले. मला मात्र कांहींच खावंसं वाटत नव्हतं. तुमची सारखी आठवण होत होती...सुरैयांकडून आलेला चेक मीं तसाच ठेवून देणार आहे. तुम्ही आलां कीं तो मोडून मी तुम्हांला जंगी फीस्ट देणार आहे...पण मूर्तीनं मला एक निराळीच काळजी लावून ठेविली आहे. त्यानं माझं नांव सुरैयांना कळवून टाकलं आहे. आणि तो म्हणतो, ते मला कदाचित्

चहाला बोलावतील. त्यांनीं खरोखरच बोलावलं आणि मला जावं लागलं तर ? एवढ्या मोठ्या गृहस्थांशीं मी बोलूं तरी काय ?...'

नंतर पांच सहा दिवसांनीं वॉर्डन रोडच्या कोपऱ्यावर बसमधून ती उतरली, तेव्हांहि तिच्या मनांत हेंच येत होतं, कीं नंदलाल सुरैया एवढे मोठे गृहस्थ, त्यांच्याशीं मी बोलूं तरी काय ?...त्यांच्याकडून आलेलं चहाच्या आमंत्रणाचं पत्र ती टोपलींत टाकून देणार होती; व मी आजारी असल्यामुळें मला येतां येत नाहीं, असं उत्तर लिहिणार होती. पण तिच्या लक्षांत आलं होतं कीं तें पत्र आधीं मूर्तीच्या हातीं गेलं होतं व त्यानं तें उघडून पाहून स्वामीबरोबर तिच्याकडे लावून दिलं होतं. सुरैयांच्या आमंत्रणाचा स्वीकार करणं तिला भागच होतं. त्याप्रमाणें तिनं त्यांना आभारप्रदर्शक पत्र लिहिलं होतं, आणि वॉर्डन रोडवर जायचं म्हणजे कोणत्या बसनं जायला हवं त्याची चौकशी करून ती निघाली होती. परंतु तिला सारखं वाटतच राहिलं होतं, कीं हा प्रसंग आपल्यावर आला नसता तर बर झालं असतं. तिच्या मनांत वरचेवर येत होतं, हे एवढे मोठे गृहस्थ, यांच्याशीं मी बोलूं तरी काय ?...

बस पुढें निघून गेली, आणि रस्त्यावर उभं राहून तिनं आजूबाजूस नजर टाकली तेव्हां तिच्यापुढें एक नवीनच प्रश्न उभा राहिला. वॉर्डन रोडवर ती आली होती, परंतु 'शांति-कुंज' बंगला कोणत्या बाजूस होता तें कुठें तिला माहीत होतं ? सांगेल कुणी तरी, असं मनाशीं म्हणून ती सावकाश पावलं टाकूं लागली. आणि वीस पंचवीस कदम गेल्यावर नक्की पत्ता सांगणारं माणूस तिला भेटलंहि. त्याच्या सांगण्याप्रमाणें ती पुढें गेली, डाव्या हाताला बंगला दिसल्यावर आंत शिरली. बंगल्यापुढच्या विस्तीर्ण बागेंत कोणीहि नव्हतं. छोटीं छोटीं झाडं वाऱ्यावर झुलत होतीं. वाफ्या-वाफ्यामधल्या हिरवळीवर चिमण्यांसारखीं लहान पांखरं उड्या मारीत होतीं. कोरड्या कारंजाच्या डाव्या बाजूकडल्या एका संगमरवरी पुतळ्या-वर एक कावळा बसून चोंचींत धरलेला एक तांबुस पदार्थ कोणाला दाख-वीत होता कोण जाणे ! उषा पोर्चमध्यें जाऊन उभी राहिली. व्हरांड्यांतहि तिला कोणी दिसेना. व्हरांड्यापलीकडच्या दिवाणखान्याचं दार सताड उघडं होतं, पण तिथेंहि कुणाचा वावर होत नव्हता. ती कांहीं वेळ जागच्या

जागीं उभी राहिली. तिच्या मनांत आलं, एखाद्या सामान्य माणसाला त्याच्या घरीं भेटायला जाणं किती सोपं आहे? सरळ दारांतून डोकावून पाहायचं, आणखी भाऊसाहेब आहेत काय म्हणून ओरडायचं. बहुधा अंगांत गंजिफ्रॉक अडकविलेले भाऊसाहेबच 'हां' म्हणण्याचा संभव, पण एखादे वेळेस ते नसले तर कुणी तरी बाबालोक कोण पाहिजे म्हणून विचारीत पुढें येण्याबद्दल अगदीं खात्री बाळगावी...इथें काय नंदलाल सुरैया आहेत का घरांत म्हणून ती विचारूं शकत होती?...ती पायऱ्या चढून वर गेली व घंटेचं बटन कुठें आहे का म्हणून पाहूं लागली. पण तेंही कुठें तिला दिसेना. या गोष्टीचा तिला चमत्कार वाटला. हे लक्षाधीश गुजराथी लोक धड जुन्या पद्धतीनं रहात नाहींत, धड साहेबासारखं रहात नाहींत! आपल्या आगमनाची वार्ता द्यायची तरी कशी तिला कळेना. आंत दिवाणखान्यांत जायचाहि तिला धीर होईना. तिच्या मनांत अशीदेखील विचित्र कल्पना आली, कीं नंदलाल घरांत नसले, आणि त्यांची बायको ताराबेनच आपल्यापुढें येऊन उभी राहिली तर? महिला परिषदेवर खरमरीत टीका करणारी 'थंडर'च्या कचेरींतली एक मुलगी आपल्या नवऱ्याच्या अमंत्रणावरून चहाला आली आहे हें तिला समजलं तर मोठा पहाण्यासारखा फार्स होईल...

हॉलच्या पलीकडे दोन्ही बाजूंनीं वर जाणारे प्रशस्त जिने व्हरांड्यांतून तिला दिसत होते. तिला एकदां वाटलं, वर जावं आणि तिथें तरी कोणी आहे का पहावं. तिच्या पावलांची हालचालसुद्धां झाली. पण पुन्हां तिच्या मनांत आलं, नको. नंदलाल सुरैयांनीं पत्रांत एक वेळ लिहिली आणि आपण दुसऱ्याच वेळीं आलों असं तर झालं नाहीं अशी शंका तिला आली. पत्र काढून पाहाण्यासाठीं तिनं पर्स उघडली, पण मग तिच्या लक्षांत आलं, तें पत्र तिनं कचेरींतल्या आपल्या टेबलाच्या खणांत टाकून दिलं होतं. ती मनाशीं म्हणाली, तिसऱ्या प्रहरीं साडे चार वाजतां असंच लिहिलं होतं त्या पत्रांत, शंकाच नाहीं...काय करावं तिला कळेना. इतक्यांत व्हरांड्याच्या कडेला एका उंच घडवंचीवर ठेवलेला टेलिफोन घणघणून वाजला. तिला वाटलं बरं झालं. आतां तरी कोणी येईल. पण कोणी आलं नाहीं. टेलिफोन वाजला वाजला, आणि अखेर दमून बंद झाला. उषा मनाशीं

म्हणाली, या श्रीमंतांच्या या राहणीचा मोठा चमत्कार आहे. कोणी आलं आणि खुशाल चोरी करून गेलं, तरी इथें कांहीं पत्ता लागायचा नाहीं. कांहीं वेळानं तिनं ठरविलं, कीं आतां इथें अधिक राहाण्यांत काय अर्थ नाहीं. एकाद्या सामान्य माणसाच्या घरीं येऊन गेल्याचा निरोप ठेवतां येतो. पण इथें ती कोणाजवळ निरोप ठेवणार होती ? खरोखरच, हा प्रश्न महिला परिषदेंत विचारांत घेण्यासारखा आहे असा विनोद तिनं स्वतःशीं केला, व ती हंसली. एकदां कोपऱ्यांतल्या टेलिफोनकडे आणि एकदां हॉलमधल्या दोन जिन्यांच्या प्रशस्त गुळगुळीत लांकडी पायऱ्यांकडे अखेरची नजर टाकून ती पोर्चकडे वळली.

तितक्यांत रस्त्यालगतच्या मोठ्या फाटकांतून एक मोटार आंत शिरली. आणि मोठ्या डौलदार गतीनं बागेला वळसा घालून पोर्चखालीं येऊन थांबली ! उषाच्या मनाचा गोंधळ उडाला. आपण मनाशीं बेत केल्याप्रमाणें निघून जावं कीं मोटरमधून आलेल्या माणसांना आपण कां आलों होतों तें सांगावं, तें तिला ठरवितां येईना. तिच्या मनांत असंहि आलं कीं कदाचित् खुद्द सुरैयाच या मोटारींतून आले असतील...पण मोटारींत दोन पुरुष तिला दिसले. यांपैकीं सुरैया कोणते ?...

पण तितक्यांत मोटारींतल्या दोघां पुरुषांपैकीं एकच खालीं उतरले, व गाडीचं दार लोटीत दुसऱ्याला म्हणाले, "तुम्हाला कुठें पोंचवायचं तें ड्रायव्हरला सांगा. अच्छा, नमस्ते. रात्रीं क्लबावर भेटतोंच." गाडी सरकली व वेगानं निघाली, तेव्हां ते उतरलेले गृहस्थ पोर्चलगतच्या पायऱ्यांकडे वळले, व त्या क्षणीं त्यांची व उषाची दृष्टादृष्ट झाली. उषा अगदीं भांबावून गेली होती. तिच्या तोंडून शब्द निघाला नाहीं. पण ते गृहस्थच जागच्याजागीं किंचित् उभे राहिले व त्यांनीं हंसून विचारलं, "मिस् उषा सोहोनी काय ?" एकदम धीर आल्याप्रमाणें ती हंसली. ते आपल्या मनगटावरच्या घड्याळाकडे पाहून म्हणाले, "मला वाटलं होतं, मी साडे-चार वाजायच्या आंत परत येईन. म्हणून मोहिते बोलवायला आले त्यांच्याबरोबर मी कांहीं कामासाठीं मुख्य पोलीस ठाण्यावर गेलों. पण तिथल्या कामाला अपेक्षेपेक्षां जास्त वेळ लागला. मला उशीर झाला. इथें व्हरांड्यांत तुमची वाट पहात बसायचं ठरविलं होतं मीं. तुम्हीं मला

क्षमा केली पाहिजे. तुम्ही आलांत ही फार आनंदाची गोष्ट झाली. या, आतां आपण वर जाऊं, आणि चहा घेऊं."

पायऱ्यांवरून नंदलाल सुरैया झटकन् वर आले व दिवाणखान्यांत शिरले. उषा त्यांच्या मागोमाग पावलं टाकूं लागली. जिना चढल्यानंतर किती ठिकाणीं वळून आणि किती दालनं ओलांडून ती त्यांच्या मागोमाग गेली त्याचा तिला हिशोब ठेवतां आला नाहीं. अखेर एका प्रशस्त गॅलरींत जाऊन पोंचल्यावर सुरैया म्हणाले, "इथे बसूं आपण". आधुनिक तऱ्हेच्या बांबूच्या खुर्च्या त्या ठिकाणीं मांडलेल्या होत्या. त्यांवर निळ्या रंगाच्या जाडजाड गाद्या होत्या. पितळेच्या चकचकीत मोठमोठ्या भांड्यांत छोटीं छोटीं झाडं होतीं. भिंतीला तसबिरी लावल्या होत्या. एका तसबिरींत जमिनीवर आडव्या पडलेल्या एका मोठ्या वाघापुढे शिकारी पोशाखांतले सुरैया बंदुक घेऊन उभे होते. ती गॅलरी बंगल्याच्या अगदीं मागच्या टोकाला होती. आंगणांतली एखादी विहीर जवळच दिसावी त्याप्रमाणे समुद्र दिसत होता. त्याचा आवाज सारखा ऐकूं येत होता. स्वच्छ खारा वारा अंगावर येत होता. गॅलरीच्या कठड्यावर वाकून उषानं पाहिलं. एखाद्या किल्ल्यासारखी तटबंदी खालीं होती. ऐन भरतीच्या घटकेला समुद्राच्या लाटा तिच्यावर आपटत असतील खचित...

"मोहित्यांबरोबर मीं जायला नको होतं" सुरैया बसतां बसतां म्हणाले, "तुम्ही फार रागावलां असाल माझ्यावर, मला चमत्कारिक म्हणालां असाल. पण मोहिते ऐकेनातच—" ते हंसले व म्हणाले, "अरेच्या! पण मोहिते कोण हें मीं तुम्हांला सांगितलंच नाहीं! पोलीस खात्यांतले एक वरिष्ठ अंमलदार आहेत ते. चार दिवसांची रजा घेऊन गंमत करायसाठीं मुंबईस आले आहेत. बेचाळीसच्या धामधुमींत बजावलेल्या कामगिरीबद्दल रावसाहेब झाले आहेत. जाळपोळ करणाऱ्यांचा बंदोबस्त यांच्याइतका दुसऱ्या कुणीं केला नव्हता. त्यांचे हे पराक्रम मला पसंत आहेत असं समजूं नका. पण कांहीं गोष्टींकडे दुर्लक्ष करून दोस्ती ठेवायला काय हरकत आहे? या बाबतींत तुमचीं काय मतं आहेत, मला कल्पना नाहीं."

ते तिच्याकडे अशा चर्येनं पहात राहिले कीं जणुं तिनं आपलं मत सांगावं अशी त्यांची अपेक्षा होती. पण तिला कांहीं उत्तर सुचेना. किंबहुना

या गृहस्थांशीं कसं वागावं हें तिला चटकन् ठरवितां येईना. कारण त्यांच्याबद्दल तिनं ज्या आगाऊ कल्पना केल्या होत्या त्या सगळ्या उसकटल्या गेल्या होत्या. तिनं ताराबेन सुरैयाला पाहिलं होतं. ती मध्यम वयाची बाई दिसली होती. तिचे यजमान चांगले पन्नाशीच्या सुमाराचे असतील असं तिला वाटलं होतं. नंदलालांचं वय तितकं असेलहि, पण ते दिसण्यांत किती तरी तरुण दिसत होते. त्यांचे केस काळेभोर होते. अंग-काठी पातळ आणि तरतरीत होती. चालण्यांत घाई होती. बोलण्यांत चाल्हाळ होता. पोशाख उंची पण साधा होता. तिला वाटलं होतं, ते आपल्याशीं अगदीं तुटक वागतील आणि बोलतील. दोन गिरण्यांचा आणि एका मोठ्या पढीचा मालक होता हा गृहस्थ. ते चार पांच मामुली प्रश्न विचारतील. फार तर 'तुमचा लेख मला फार आवडला' असं पुन्हां एकदां सांगतील आणि चहा देऊन आपली बोळवण करतील. पण तिनं पाहिलं तों मोहित कोण तें सांगतांना ते किती तरी बोलत राहिले. मोहित्यांची पोलीस खात्यांतील बहादुरी पसंत नसतांनाहि त्यांच्याशीं त्यांनीं खेळीमेळीचा स्नेह ठेवावा कीं नाहीं हें ती काय सांगणार? असल्या प्रश्नांचा विचार तिनं कशाला कधीं केला होता? धड 'होय' नाहीं धड 'नाहीं' नाहीं अशा संदिग्ध रीतीन मान हालवून ती फक्त हंसली.

मग सुरैया एकदम म्हणाले, "माझी बायको इथें नाहीं. माथेरानला गेली आहे. ती कुठेंहि गेली कीं सारे नोकरचाकर बरोबर घेऊन जाते. मी एकटा राहतों." ते मोठ्यांदा हंसले.

बंगल्यांत सारी सामसूम कां होती त्याचा असा उलगडा कळल्यामुळ उषादेखील हंसली.

त्यांनीं तिला एकदम विचारलं, "माझ्या बायकोविषयीं माझं काय मत आहे, तुम्हांला सांगूं का?"

त्यांच्या त्या विचारण्याचा तिला मोठा अचंबा वाटला. त्यांचं पुढचं बोलणं ऐकावं कीं नाहीं असा संकोचहि वाटला. तिनं अस्वस्थपणानं इकडे तिकडे पाहिलं. तितक्यांत एक नोकर चहाचं आणि फराळाचं साहित्य भरलेली मोठी थाळी घेऊन आला. सुरैयांनीं त्या नोकराला गुपचुप केव्हां

सूचना दिली होती कोण जाणे, असं आश्चर्य तिनं मनाशीं केलं. तिला वाटलं या नोकराच्यादेखत आपल्या बायकोचा विषय सुरैया चालू ठेवणार नाहींत. पण तिची ती कल्पना खोटी ठरली. नोकरानं मांडलेलं साहित्य आपल्याला हवं त्या ठिकाणीं पुन्हां नीट मांडीत ते आपल्या बायकोविषयीं खुशाल बोलत राहिले. ते म्हणाले,

"तिची हौस खोटी नाहीं. पण जें काम तिनं अंगावर घेतलं आहे, तें तिच्या मनाचं फक्त एक खेळणं आहे हें तिचं तिलाच कळत नाहीं. स्त्रियांच्या वतीनं बोलण्याचा आपल्याला किती थोडा अधिकार आहे, आपण जग किती थोडं पाहिलं आहे, दुःखाची आपल्याला किती थोडी ओळख आहे, हें तिच्या लक्षांत येत नाहीं. तिचा वेळ जात नाहीं, म्हणून ती या महिला परिषदेच्या कामांत पडली आहे. तिला मूलबाळ नाहीं म्हणून या चळवळीवर प्रेम करावंसं तिला वाटतं. परिषदवाल्या बहुतेक श्रीमंत स्त्रियांची अशीच गोष्ट आहे. त्यांच्यावर तुम्हीं कोरडे ओढले आहेत ते बरोबरच आहेत. पण खरं म्हणजे त्यांच्या मनाचा तुम्ही अभ्यास कराल तर तुम्हांला गंमत वाटेल. मानसशास्त्रांत तुम्हांला गोडी आहे कीं नाहीं ? तुम्ही बी. ए. आहांत ना ? विषय कोणता घेतला होता तुम्हीं ?"

तिनं आपला विषय सांगितला तेव्हां ते हंसून म्हणाले, "असं कां ? पण तुम्हीं मानसशास्त्र वाचायला हवं, तुम्हांला आवडेल तो विषय. माझ्याकडे चांगलीं चांगलीं पुस्तकं आहेत. तुम्हांला देईन. एक नुकतंच परवांच्या मेलनं आलं आहे. दाखवतों हं." असं म्हणून ते उठले व आंतल्या दालनांत गेले. परत येतांना त्यांच्या हातांत दोन पुस्तकं होतीं, त्यांचीं नांवं आणि लेखकांचीं नांवं वाचीतच ते पावलं टाकीत होते. त्यांच्याकडे बघतां बघतां उषाच्या मनांत आलं, या श्रीमंत लोकांना पुस्तकांचा नाद असला कीं आपल्या नादाचं प्रदर्शन करण्याची त्यांना मोठी खोड असते. पण तिच्या मनांत असंहि आलं, कीं इतर व्यसनांपेक्षां हें फार बरं. सुरैया आपल्या जागीं बसले व हातांतल्या पुस्तकांची तारीफ करूं लागले, तेव्हां त्यांना उत्तेजन वाटावं असा चेहरा तिला ठेवतां आला. ते बोलतां बोलतां थोडे थांबले तेव्हां ती म्हणाली,

" आपण एवढी प्रशंसा करतांहां तेव्हां हीं पुस्तकं वाचनीय असणारच. हीं वाचण्याचा मला मोह होतो. पण केव्हां वाचूं ? निवांत वेळ कुठें होतो मला ? वर्तमानपत्राच्या कचेरींतल्या कामाची आपल्याला कल्पना नसेल–"

" फारशी नाहीं; पण जेवढी आहे तिच्यावरून काय वाटतं सांगूं का ? तुम्ही रागावतां कामा नये–"

" काय ?–"

" असलं कंटाळवाणं काम तुमच्यासारख्या मुलीनं करूं नये–"

" चुकतां आपण. " ती म्हणाली, " काम फार आहे, पण कंटाळवाणं नाहीं. डोळ्यांपुढें एक ध्येय ठेवलं आहे मी. अन् त्यासाठीं जें करावं लागतं तें करतांना कंटाळा नाहीं येत ! "

" कोणतं ध्येय ? "

" 'थंडर'मध्यें जगन्नाथ अशा सहीनं जे लेख येतात ते वाचले आहेत तुम्हीं कधीं ? कसे वाटतात ?–"

" फार सुंदर ! "

" तसं लिहायला यावं अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे. ती पूर्ण होईल त्या दिवशीं सोडीन हा उद्योग ! "

" पण मग हा उद्योग तुम्हांला सोडील का ? "

" हो, तेंहि खरंच. " असं म्हणतांना तिला थोडंसं हंसूं आलं.

सुरैया म्हणाले, "म्हणून म्हणतों, कीं हा उद्योग तुम्हीं आतांच सोडावा हें चांगलं. "

त्यांच्याशीं जरा मोकळेपणानं बोलण्याइतका धीर आतां उषाला आला होता. ती म्हणाली, " माझ्या या उद्योगावर आपला इतका कटाक्ष काय म्हणून ? "

ते चटकन् म्हणाले, " माझं मत चुकीचं असेल, पण या वर्तमान-पत्रांच्या उद्योगांत बायकांनीं पडावं असं मला वाटत नाहीं. हा धंदा बायकांसाठीं नाहीं. " उषा त्यांना प्रतिपादणार होती, जरूर तर त्यांच्याशीं वाद देखील घालणार होती. परंतु तितक्यांत ते पुढें म्हणाले, " तुमच्या-सारख्या मुलींनीं तर या कामांत मुळींच पडूं नये. "

त्यामुळें तात्त्विक वाद काढण्याऐवजीं तिनं विचारलं, “ माझ्यासारख्या ? म्हणजे माझ्या अंगीं स्पेशल नालायकी आहे कीं काय ?”

सुरैयानीं उत्तर न करतां तिच्याकडे हंसत पाहिलं. ते म्हणाले, “ होय, आहे. नालायकी नव्हे, खास लायकी आहे दुसऱ्या एका गोष्टीची. आणि म्हणून हें वर्तमानपत्रांतलं काम करण्यांत तुम्हीं आपलं आयुष्य घालवावं हें कांहीं आपल्याला पसंत नाहीं. कोणत्या गोष्टीची स्पेशल लायकी तुमच्या अंगीं आहे ते मीं तुम्हांला सांगितलं असतं, पण तुमची माझी ही पहिलीच मुलाखत आहे, तेव्हां आतां नाहीं सांगत. आपली अधिक ओळख झाली म्हणजे मी केव्हां तरी अवश्य सांगेन.” असं म्हणतां म्हणतां त्यांनीं तिच्या कपांत आणखी चहा ओतला, केकचा एक तुकडा सुरीनं कापला, व तो काट्यानं उचलून तिच्या बशींत ठेवून ते म्हणाले, “ मीं तुम्हांला चहासाठीं बोलावलं, आणि चहाऐवजीं माझी बडबडच सारखी पाजीत बसलों तुम्हांला. मी एक चमत्कारिक व्यक्ति आहे असा तुमचा ग्रह झाला असेल !”

उषानं कप उचलतां उचलतां हंसून मान हलविली. परंतु त्यांना शंका आली तसा त्यांच्याविषयीं तिचा थोडासा ग्रह झाला होता, हें तिला आपल्या मनाशीं कबूल करावं लागलं. सुरैया म्हणजे एक चमत्कारिक व्यक्ति आहे असंच ते भेटल्यापासून तिला सारखं वाटलं होतं.

तिनं त्यांचा निरोप घेतला तेव्हां ते तिच्याबरोबर खालीं आले. पोर्च-मध्यें गाडी उभी होती, परंतु गाडींत ड्रायव्हर नव्हता. सुरैयानीं दोन तीनदां हॉर्न वाजवून पाहिला, पण कोणी आलं नाहीं. मग ते उषाला म्हणाले, “ मीच पोंचवितों तुम्हांला. बसा !” त्यांनीं दार उघडून तिला बसायला लावलं, गाडीला वळसा घालून हांकण्याच्या सीटवर ते स्वतः बसले व गाडी सुरू करून त्यांनीं तिला हळूच विचारलं, “ कुठें पोंचवूं तुम्हांला ?”

खरं म्हणजे उषाला आपल्या खोलीवर परत जायचं होतं. पण तिच्या मनांत आलं, आपण किती साध्या वस्तींत राहतों तें यांना कळावं हें बरं नव्हे. इतकेंच नव्हे तर तिला असंहि वाटलं, कीं आपली राहण्याची

खोली यांना ठाऊक न झालेलीच बरी. सुरैयांविषयीं तिचं मत पुष्कळच अनुकूल झाल होतं. ते तिच्याशीं फारच चांगले वागले होते. परंतु त्यांनीं स्वतःच शंका प्रदर्शित केली त्याप्रमाणें ते एक चमत्कारिक व्यक्ति आहेत असा तिच्या मनाचा ग्रह झाला होता. ते जरा आपल्याशीं अधिक मोकळेपणानं वागले असं तिला वाटत होतं. आणि यानंतर तिच्या च त्यांच्या गांठीभेटी होत गेल्या तर कदाचित् ते सलगीनंहि वागूं लागतील अशी अंधुक शंका तिला आली होती. आपली राहण्याची खोली त्यांना माहीत न झालेली बरी असं तिला एकदम वाटलं. तिनं त्यांना सांगितलं, "मला आमच्या 'थंडर'च्या कचेरींत आपण सोडलंत तरी चालेल."

सुरैयांनीं आश्चर्य दाखवून विचारलं, "या वेळीं कचेरींत जाणार तुम्ही?"

"हं. थोडंसं काम आहे. ताज्या बातम्यांची जुळवाजुळव करून त्यांना योग्य ते मथळे द्यायची कामगिरी आज माझ्याकडे आहे." एकीकडे असं सांगतां सांगतां ती दुसरीकडे मनाशीं म्हणत होती, 'इतकं सफाईनं खोटं बोलून यांना फसविण्याचं कारण खरोखरच आहे का?'. तिच्या स्वभावांतल्या सौजन्याशीं आणि सरळपणाशीं सर्वस्वी विसंगत अशा तऱ्हेनं ती आज प्रथमच वागत होती, आणि त्याचा तिच्या मनाला त्रास होत होता.

तिचं तें उत्तर ऐकून सुरैयांनीं तिच्याकडे वळून पाहिलं, च् च् असा तोंडांतल्या तोंडांत आवाज केला, व ते म्हणाले, "तुमचं हें काम आपल्याला बिलकूल नापसंत आहे". मग गाडीचा वेग वाढवून ते हांकूं लागले, आणि समोर रस्त्याकडे पाहतां पाहतां बोलूं लागले, "संध्याकाळच्या या घटकेला, हवा अशी सुंदर पडलेली असतांना, गंमतीनं कुठें तरी जाण्याऐवजीं तुम्ही कचेरींत बसून टेलिप्रिंटरवर येणाऱ्या बातम्या लिहून काढणार आणि त्यांना मथळे देणार? छे छे! ही कल्पनाच मला असह्य वाटते."

त्यांच्या बोलण्याकडे उषाचं फारसं लक्ष नव्हतं. सुरैया या व्यक्तीचं स्वभावचित्र काढायचं झालं तर कोणत्या शब्दांनीं काढावं लागेल याचा ती मनाशीं विचार करीत होती. कारण जगन्नाथला लिहावयाच्या पत्रांत सुरैयांनीं आपल्याला चहाला कसं बोलावलं, आपण हो ना करतां करतां कशा गेलों, त्यांच्या बंगल्यावर सारी सामसूम कशी होती, आपण परत कशा निघालों होतों, तितक्यांत तेच स्वतः कसे आले होते, इत्यादि

साऱ्या गोष्टी लिहायचं तिनं ठरविलं होतं. जगन्नाथला लिहावयाचीं पत्रं म्हणजे तिचा एक मोठा आवडीचा उद्योग होऊन बसला होता....मात्र त्याला दर दोन तीन दिवसांनीं मोठं पत्र लिहितांना तिला जसा आनंद होत असे तसंच तिला असंहि वाटत असे, कीं माझ्यापासून वरचेवर किती दूर हा जातो ! कॅबिनेट मिशन दिल्लींत ठाणं देऊन बसलं होतं, आणि तिथें घडणाऱ्या राजकीय घडामोडींच्या ताज्या बातम्या मिळविणं हें काम जसं महत्त्वाचं होतं तसं जगन्नाथच्या फार आवडीचंहि होतं. पण प्रत्येक पत्र लिहितांना तिला वाटे, या कामासाठीं किती दिवस जगन्नाथला दूर राहावं लागणार ? दर वेळीं पत्राच्या शेवटीं ती लिहीत असे, "हे सारं झालं, पण तुम्ही तिकडे दिल्लींत किती दिवस रमणार ? या कॅबिनेट मिशनचा खरं म्हणाल तर मला फार राग येतो. हें मिशन केव्हां एकदां परत इंग्लंडला जाईल असं मला झालं आहे. आणि कधीं कधीं मला असं भय वाटतं, कीं हें मिशन परत जाईल तेव्हां तुम्हीदेखील त्याच्याबरोबर विलायतेस जाल कीं काय कुणास ठाऊक ? जाल ! तुमचा काय नियम सांगावा ? कामापुढें तुम्हांला माझी आठवण राहील, असा भरंवसा मला कांहीं वाटत नाहीं. तुम्ही मूर्तीला तार कराल, जाऊं काय ? मूर्ति तुम्हांला तार करील, अवश्य जा. आणि तुम्ही परस्पर दिल्लीहून विमानानं चालते व्हाल ! मी बसेन मग इथें एकटीच थंडरच्या कचेरींत शाईनं हात खराब करीत..."

"तुमची कचेरी कोणीकडे ? इकडे डाव्या गल्लींतच ना ?" असं सुरैयांनीं विचारलं, तेव्हां उषा आपल्या विचारांतून जागी झाली. तिनं इकडे तिकडे पाहिलं आणि त्यांच्याकडे बघून होय म्हणून मानेनं सांगितलं. गाडी गल्लींत वळली, दोन तीन इमारती मागं पडल्या, तेव्हां ती म्हणाली, "इथेंच इथेंच, ही टॅक्सी उभी आहे ना, हिच्या मागंच आपली गाडी उभी राहूं द्या". सुरैया कदाचित् आपल्याबरोबर वर कचेरींत येतील असं भय तिला वाटत होतं; म्हणून तिनं मनाशीं ठरविलं कीं गाडी उभी राहिल्याबरोबर उतरायचं, सुरैयांना नमस्कार ठोकून व त्यांचे आभार मानून इमारतींत शिरायचं आणि त्यांना वाटेला लावायचं. त्यांची गाडी निघून गेली अशी खात्री झाल्यावर ती इमारती-

बाहेर पडणार होती, चौकापर्यंत चालत जाणार होती, आणि घरीं जाण्यासाठीं बस गांठणार होती. थंडरच्या कचेरींत तिला थोडंच या वेळीं कांहीं काम होतं ?...सुरैयांनीं गाडीचा वेग अगदीं कमी केला. ती आपल्या जागेवरून उठायसाठीं अगदीं तयार राहिली. "बस बस इथेंच" असं सुरैयांना म्हणून तिनं दार उघडण्याच्या चापाला हात घातला—

पण तितक्यांत तिनं पाहिलं तों मूर्ति आणि जगन्नाथ जिना उतरून खालीं आले आणि इमारतीच्या दारांत उभे राहिले !

ती अगदीं चकित झाली. तिचीं चापावरचीं बोटं तशींच राहिलीं; जगन्नाथ इथें कसा ?—ती मनाशीं म्हणाली, तो दिल्लीहून आला केव्हां ?...सुरैयांकडे तिला चहाला जायचं होतं म्हणून मूर्तीनं तिला आपण होऊन रजाच दिली होती, व ती आज कचेरींत गेलीच नव्हती...तिच्या गैरहजेरींत तो दिल्लीहून एकाएकीं आला असला पाहिजे हें उघड होतं. तो आला त्या वेळेस आपण कचेरींत नव्हतों हें कांहीं बरं झालं नाहीं, असं तिच्या मनांत आलं. त्यानं कदाचित् आल्याबरोबर आपली चौकशी केली देखील असेल, आपण हजर नाहीं याचं त्याला कदाचित् वाईट वाटलं असेल. पण ती मनाशीं म्हणाली, 'माझ्याकडे तरी काय दोष ? जगन्नाथ आज येणार असं मला काय स्वप्न पडलं होतं ? आगाऊ न कळवितां तो एकाएकीं आला हा त्याचा दोष होता'. परंतु अशा विचारांनीं स्वतःला दोषमुक्त केल्यानंतर तिच्या मनांत आलं, परंतु कांहीं झालं तरी जगन्नाथ आला त्या वेळीं आपण कचेरींत नव्हतों, हें कांहीं बरं झालं नाहीं. असं पूर्वी कधींच झालं नव्हतं. तो ज्या ज्या वेळेस दिल्लीहून परत आला होता त्या त्या वेळेस...

तितक्यांत मूर्ति आणि जगन्नाथ दोघेहि प्रवेशद्वारापुढच्या दोन ठेंगण्या पायऱ्या उतरून खालीं रस्त्यावर आले, आणि उभ्या असलेल्या एका टॅक्सी-कडे जाऊं लागले. तिच्या आतां लक्षांत आलं कीं स्वामी टॅक्सीपाशीं उभा होता. या दोघांसाठींच त्यानं ती बोलावून आणली असावी. टॅक्सीकडे पावलं टाकतां टाकतां मूर्तीची नजर उषाकडे गेली व जगन्नाथच्या खांद्यावर थाप मारून तो म्हणाला, "ओ हो ! तें पाहिलंस का कोण आहे ?"

जगन्नाथनं नजर वळविली आणि तिच्याकडे पाहिलं. ती किंचित् हंसली, परंतु तो हंसला नाहीं. तिच्या उजव्या बाजूला बसलेल्या सुरैयांकडे त्याची नजर लागली होती. त्याच्या कपाळावर आठी उभी राहिली होती. जणुं एका ऐटबाज मोटारींत, तिच्या मालकाच्या शेजारीं ती बसलेली पाहून त्याला नुसतं आश्चर्यच वाटलं नव्हतं, तर तो नाराज झाला होता... मूर्ति आणि जगन्नाथ यांच्याशीं सुरैयांची ओळख करून द्यावी कीं न द्यावी याबद्दलचा निश्चय उषाला करतां आला नाहीं, आणि ती जराशी गोंधळली. परंतु ओळख करून द्यायला हा क्षण कांहीं अनुकूल नाहीं असंच तिनं अखेर ठरविलं, आणि चाप खालीं करून दार उघडून ती उतरली. सुरैयांना नमस्कार करून तिनं त्यांचे आभार मानले. मूर्ति आणि जगन्नाथ यांच्याकडे सुरैयांचं लक्ष गेलं होतं. हे दोघे गृहस्थ कोण असावेत असं आश्चर्य ते कदाचित् मनाशीं करीत होते. परंतु तें आश्चर्य दाखविणं अगर उषाजवळ त्या दोघांची चौकशी करणं शिष्टाचाराशीं विसंगत झालं असतं. सुरैयांसारखा गृहस्थ अशी कांहीं गोष्ट करील हें शक्यच नव्हतं. त्यांनीं उषाला उलट नमस्कार केला, ती चहासाठीं आल्यामुळें आपल्याला किती आनंद झाला होता तें त्यांनीं सांगितलं, व पुन्हां एकदां नमस्ते करून त्यांनीं डाव्या हातानं ब्रेक सोडविला. पेट्रोलवर पाय दाबून गाडी हलकेच उजवीकडे फिरवितांना ते जरा आवाज उंच करून म्हणाले, "तुमची भेट वरचेवर झाली तर मला आनंद होईल हें लक्षांत ठेवा. तुम्हांला कधीं मीं बोलाविलं तर यायला अनमान करूं नका. आणि मीं बोलावण्याची तुम्हीं वाटच पाहिली पाहिजे असंहि मानूं नका. उगीच घटकाभर गप्पा मारायसाठीं माझ्याकडे कधीं यावसं वाटलं तर बेशक या. मला आनंदच होईल. अच्छा; नमस्ते !" त्यांनीं डाव्या हाताचा पंजा उंच करून तिला दाखविला, व दुसऱ्या क्षणीं त्यांची ऐटबाज सुंदर गाडी रहदारीच्या रांकेंत मिसळून निघून गेली.

उषा वळली. तिनं पाहिलं तों जगन्नाथ सुरैयांच्या गाडीकडेच अजून पहात होता. त्याच्या भुवयांमधली आठीची रेघ कायम होती. उषा मनाशीं म्हणाली, स्वारी माझ्यावर अगदीं नाराज झालेली दिसते. ही नाराजी एकदम घालवून टाकली पाहिजे. ती हंसत हंसत पावलं टाकीत त्याच्याजवळ गेली आणि म्हणाली, "हें काय, तुम्ही केव्हां आलांत ?"

जगन्नाथ म्हणाला, "मला वाटलं थंडरच्या कचेरींतलं काम तुम्हीं सोडून दिलं."

"वा! असं कसं वाटलं तुम्हांला?"

"वाटलं याचं कारण इथें आल्यापासून कचेरींत तुम्ही दिसलांच नाहीं!"

उषानं मूर्तीकडे पाहिल्यासारखं करून म्हटलं, "यांना विचारलं असतं तर मी आज कचेरींत कां आलें नव्हतें तें तुम्हांला कळलं असतं."

जगन्नाथ म्हणाला, "मूर्तीला विचारायचं? तें कशाला? तुमच्या-बद्दलची बातमी काढण्यावांचून माझं कांहीं इतकं अडलं नव्हतं!"

अस्सं! रागाचा पारा बराच वर चढला आहे म्हणायचा...पण त्याचा घुस्सा लक्षांत न घेतां विनोदानंच कांहीं तरी उत्तर दिलं पाहिजे, असा विचार करून उषा म्हणाली, "बरोबर आहे. माझ्याबद्दलच्या बातमीला कांहीं आंतरराष्ट्रीय महत्त्व नाहीं." तिच्या या बोलण्याचा थोडासा परिणाम झाला. जगन्नाथ हंसला नाहीं, परंतु त्याच्या कपाळावरची आठी नाहींशी झाली, व त्याची चर्या जराशी बदलली. तें पाहून उषाला बरं वाटलं. त्याच्या आणखी जवळ सरकल्यासारखं करून तिनं हलक्या आवाजांत विचारलं, "दिल्लीहून अगदीं ताजी खबर कोणती आणली आहे तुम्हीं, ती सांगा. एकंदर चिन्ह ठीक आहे कीं नाहीं? स्वातंत्र्य जवळ येत आहे कीं दूर जात आहे?"

जगन्नाथनं आजूबाजूला पाहिलं. जणूं तो उषाला जें सांगणार होता तें रस्त्यांत उघड्यावर सांगण्यासारखं नव्हतं. त्यानं आपली मान किंचित् खालीं झुकविली, व तिच्या कानांत तो हलकेंच म्हणाला, "दूर जातं आहे! कॅबिनेट मिशन, कॉंग्रेस, आणि लीग यांची एकवाक्यता होण्याचा संभव रोज दुरावतोच आहे. तुम्हांला सांगेन मी नंतर केव्हां तरी. आतां मी फार घाईत आहें. राजगोपालाचारी मद्रासहून निघून दिल्लीला चालले आहेत. त्यांचा मुक्काम आज इथें मुंबईत आहे. त्यांच्या मकाणावर कोणती ताजी बातमी मिळते तें पाहण्यासाठीं मी अन् मूर्ति निघालों आहोंत". असं सांगतां सांगतां तो तिच्यापासून दूर झाला. ते दोघे गाडींत चढून बसले. उषाला थोडंसं वाईट वाटलं. 'तुम्ही चला कीं आमच्याबरोबर' असं जग-न्नाथला म्हणतां आलं असतं. पण तो तसं म्हणाला नव्हता. पुन्हां अमक्या

वेळेस भेटेन असंहि कांहीं बोलला नव्हता. अगदीं तुटकपणानं तो तिला सोडून निघाला होता. परंतु हें वाईट वाटणं मनांतल्या मनांत ठेवून ती उभी राहिली. टॅक्सी सुरू होणार असं दिसल्यावर तिनं जरा मोठ्यांदा विचारलं, " दोन दिवस तरी आहांत कीं नाहीं मुंबईत ? मला केव्हां भेटणार तुम्ही ? " पण टॅक्सीचा फरंदिशीं मोठ्यांदा आवाज झाला, त्यांत तिचा आवाज जगन्नाथला कदाचित् ऐकूंहि गेला नसेल. दुसऱ्याच क्षणीं टॅक्सी निघून गेली. फूटपाथच्या फरशीवर ती एकटीच राहिली !

जगन्नाथच्या रागावण्यानं तिचं मन कांहींसं खिन्न झालं होतं. तिची त्याची नजरानजर झाल्याबरोबर तो हंसला नव्हता. 'कुठें होतीस दिवसभर, दिल्लीहून आल्यापासून तुझी भेट केव्हां होते असं मला झालं होतं ' असं तो म्हणाला नव्हता...परंतु या विचारांबरोबरच दुसरा एक विचार तिच्या मनांत आला, आणि तिची खिन्नता एकदम नाहींशी झाली. एका परक्या पुरुषाबरोबर मोटारींत ती बसलेली दृष्टीस पडतांच जगन्नाथाची चर्या रुष्ट झाली होती ! हें असूयेचं लक्षण होतं ! आणि ही असूया जर त्याला खरोखरीच वाटली असेल, तर तिच्यावर त्याचं प्रेम होतं खचित ! आजपर्यंत त्याच्या बोलण्यांत तिला प्रेमाचा पुरावा शोधूनहि सांपडला नव्हता. तिच्या बुद्धी-विषयीं व कर्तृत्वाविषयीं त्याला फार अभिमान आणि आदर वाटत होता, एवढंच त्याच्या बोलण्याचालण्यावरून तिला आढळून आलं होतं. तिचा सहवास त्याला आवडत होता, परंतु तिला त्याच्या सहवासाची ज्या तऱ्हेची ओढ होती तशी ओढ त्यालाहि वाटते असं तिला दिसलं नव्हतं ! जगन्नाथचं प्रेम आपल्यावर आहे कीं नाहीं, या प्रश्नाचं उत्तर ती आज-पर्यंत शोधीत राहिली होती; पण तिला तें सांपडलं नव्हतं. आणि आतां त तिला अकस्मात् समजलं होतं ! त्याच्या रुसलेल्या चर्येवरून ! त्याच्या भुंवयांमधल्या आठीच्या रेघेवरून ! सुरैयांच्या गाडींत त्यांच्या शेजारीं ती बसलेली पाहिल्यामुळें जगन्नाथला राग आला असेल, तर ती फार आनंदाची गोष्ट म्हटली पाहिजे. त्याला मत्सर वाटला असेल तर फार चांगलं...या विचारांनीं उषा स्वतःशींच थोडीशी हंसली. ती क्षणभर जागच्या जागीं उभी राहिली; आणि मग आपल्या मनाच्या खुषींत हंसत हंसतच चौकांत जाऊन बस गांठायसाठीं ती सावकाश पावलं टाकूं लागली !

# प्रकरण पांचवं

दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत गेल्याबरोबर आपल्या कामाच्या जागेकडे जातां जातां उषानं जगन्नाथाच्या छोट्या खोलीपुढें थबकून हळूच कानोसा घेतला. स्वारी आली आहे, ती मनाशीं म्हणाली. त्याची काम करण्याची पद्धत तिला आतां माहीत झाली होती. कंपोझिंग खात्यांतला एक छोकरा त्याच्या टेबलापुढें उभा असायचा, आणि लहान आकाराचा एकेक कागद लिहून झाल्यावर पॅडवरून फाडून त्यानं वर न बघतां पुढें केला कीं त्या छोकऱ्यानं तो घेऊन कंपोझिंग खात्याकडे धूम ठोकायची, आणि परत त्याच्या टेबलापुढें येऊन उभं रहायचं, अशा प्रकारें त्याचं काम चालत असे. उद्यांच्या रविवारच्या अंकासाठीं आपला लेख लिहिण्यांत जगन्नाथ गढून गेला असला पाहिजे. दिल्लीच्या मुक्कामांत ज्या ज्या गोष्टी त्यानं पाहिल्या अगर ऐकल्या होत्या, त्या सगळ्या सुसंगतपणानं सांगून पुढच्या आठवड्यांत राजकारणाला कोणता रंग चढेल त्याबद्दलचे अंदाज या साप्ता-हिक लेखांत तो प्रदर्शित करीत असे. "माझ्या गवाक्षांतून" असा मथळा त्याच्या या लेखावर असे. हें त्याचं सदर फार लोकप्रिय झालं होतं...त्याच्या खोलीपुढें थोडा वेळ थांबल्यानंतर ती आपल्या जागेकडे गेली व कामाला लागली.

एक वाजतां छोटा स्वामी तिची कॉफी घेऊन आला, तेव्हां तिनं एका कागदावर लिहिलं, "तुम्ही केव्हां मोकळे व्हाल?" आणि कागदाची घडी स्वामीच्या हातांत देत म्हटलं, "जगन्नाथना नेऊन दे, आणि उत्तर घेऊन ये." तिनं कॉफी संपवून पेला खालीं ठेवला, तों स्वामी परत आला. तिच्याशीं कांहींच न बोलतां कपबशी उचलून तो जाऊं लागला, तेव्हां ती म्हणाली, "काय रे स्वामी?"

तो थबकला, आणि म्हणाला, "काय?"

" अरे, माझ्या चिठीचं उत्तर नाहीं आणलंस ? "

स्वामी आपल्या मोडक्या तोडक्या स्पेशल इंग्रजींत म्हणाला, " त्यांनीं दिलं नाहीं तर मी कुठून आणूं ? "

" दिलं नाहीं ? "

" नो ! त्यांनीं तुमची चिठी टेबलावर ठेवली अन् नुसती मान हालविली. मी थोडा वेळ त्यांच्यापुढें उभा राहिलों. ते म्हणाले, 'कां रे, उभा कां राहिलास ? जा.' मग मी काय करूं ? " स्वामीनं आपले पांढरेशुभ्र दांत विचकले, आणि कपबशी उचलून तो निघून गेला.

'अस्सं !'—उषा स्वतःशीं म्हणाली, 'स्वारी रागावली आहे, ही माझी कालची शंका खरीच तर !' आणि काल संध्याकाळीं तिला जसं हंसूं आलं होतं, तसंच आतांहि आलं.

तिनं दीड दोन घटका जाऊं दिल्या, आणि स्वामीला बोलावून पुन्हां जगन्नाथकडे चिठी पाठविली. कागदावर तिनं लिहिलं, " चिठी नंबर दोन. तुम्ही कामांतून केव्हां मोकळे व्हाल, तें कृपा करून कळवाल काय ? "

या वेळेस जगन्नाथचं उत्तर आलं, पण त्यानं लिहिलं होतं, " केव्हां मोकळा होईन सांगतां येत नाहीं ". तें वाचून उषा स्वतःशीं हंसली. तासाभरानं तिनं पुन्हां एक चिठी पाठवली. " तुम्ही मोकळे होईपर्यंत मी थांबूं काय ? " जगन्नाथाकडून उत्तर आलं, " तें मी काय सांगूं ? " तें उत्तर वाचल्यावर उषाला आणखीच हंसूं आलं. त्याच्या त्या दोन्ही चिठ्या घडी करून तिनं आपल्या पर्समध्यें ठेवल्या. 'कधीं तरी चेष्टा करायला उपयोगीं पडतील' ती मनाशीं म्हणाली. मग तिनं पुन्हां चिठी पाठविली नाहीं. स्वामीला बोलावून घेऊन ती त्याला म्हणाली, " जगन्नाथ आपलं काम संपवून केव्हां उठतात त्याकडे नीट लक्ष ठेव, आणि ते उठून निघणार असं वाटल्याबरोबर इकडे ताबडतोब येऊन मला वर्दी दे. "

स्वामीनं तिची कामगिरी अगदीं उत्तम बजावली. जगन्नाथ आपल्या खोलींतून बाहेर पडत होता, त्याच क्षणीं ती त्याच्या खोलीपुढें जाऊन पोंचली. त्याच्याकडे हंसत पाहून तिनं विचारलं, " निघालांत ? ". तो हंसला नाहीं, फक्त " हं " असं म्हणाला. त्याच्याबरोबर पावलं टाकतां

टाकतां तिनं विचारलं, "कुणीकडे जाऊं या फिरायला ?" त्यानं भुंवया किंचित् चढवून विचारलं, "म्हणजे, दोघांनीं मिळून जायचं म्हणतां ?" ती म्हणाली, "हो ना !" मग मात्र त्याला थोडसं हंसूं आलं. जिन्याच्या पायऱ्या उतरतां उतरतां ती म्हणाली, "माझं काम आज केव्हांच आटोपलं होतं."

"मग घरीं कां नाहीं गेलांत ?" तो तिच्यापुढें खालच्या पायरीवर होता. प्रश्न करतांना त्यानं मान वळवून तिच्याकडे पाहिलं नाहीं.

ती म्हणाली, "घरीं रोजच जातें."

"मला नाहीं खरं वाटत." हें बोलतांना तो खालीं बघून जरा जास्त वेगानं पायऱ्या उतरत होता.

त्याच्या पाठीकडे, भरदार मानेकडे, व दोन कानशिलांच्या मधोमध दिसणाऱ्या केंसांकडे पाहतां पाहतां उषा स्वतःशीं पुन्हां हंसली. "मला नाहीं खरं वाटत" हा त्यानं तिला टोला दिला होता. काल ती त्याला मोटारींत दिसली होती ना ? परंतु तो विषय आतां या क्षणीं काढून वाढविण्याची तिची इच्छा नव्हती. ती झटकन् पायऱ्या उतरून त्याच्या बरोबरीला आली, आणि म्हणाली, "वाटलं तर फिरायला जायच्या आधीं कोपऱ्यावरच्या हॉटेलांत थोडंसं खाऊं या."

"होय, मला फार भूक लागली आहे." असं सांगतांना त्याच्या चेहऱ्यावरची पहिली रुष्टता एकदम नाहींशी झाली. तें पाहून उषाच्या मनांत आलं, हे सारे पुरुष अगदीं लहान मुलासारखे कसे ! भूक शमविण्याचा संभव दिसला, कीं लहान मुलांसारखेच यांचे सारे रागरुसवे नाहींसे होतात ! पण गाडी थोडी ताळ्यावर आल्यामुळें तिला थोडं बरं वाटलं.

हॉटेलांतून बाहेर पडल्यावर तिनं विचारलं, "कुठें तरी जवळ जाऊन बसायचं कीं लांब जायचं ?"

तो म्हणाला, "जवळच जाऊं या. काल परत आल्यापासून मला अगदीं दमल्यासारखं झालं आहे."

रस्त्यावरची संध्याकाळची गर्दीची रहदारी आतां ओसरून गेली होती. फ्लोरा फौंटनच्या चौकांत बसच्या टप्प्यांपाशीं आतां रांगा उभ्या नव्हत्या.

आपला खेळ आटपून मुलं घरोघर निघून गेलीं कीं आंगणाला यावं तसं स्वरूप फोर्टमधल्या त्या भागाला आलं होतं. हॉटेलांखेरीज बाकीचीं सारीं दुकानं आतां बंद झालीं होतीं. ठिकठिकाणीं दिवे दिसूं लागले होते. तो आणि ती भराभर पावलं टाकीत चाललीं होतीं. युनिव्हर्सिटीच्या आवारा-पलीकडच्या मोठ्या मोकळ्या मैदानापाशीं पोंचल्यावर जणूं न बोलतांच ठरविल्याप्रमाणें तीं दोघं मैदानांत शिरलीं, आणि हिरवळीवरून चालत गेलीं. चालतां चालतां तो एकदम म्हणाला, "इथें बसूं या" आणि त्यानं अंग टाकलं. ती त्याच्याजवळ बसली. आतां त्याचा पहिला रुसवा गेला होता, परंतु अजूनहि त्याचा नेम नाहीं. पुन्हां केव्हां एकदम डोकं वर काढील असं भय उषाला वाटत होतं. मुद्दाम कोणताच विषय न काढण्याच्या धोरणानं ती म्हणाली, "किती उकडतं आहे ! इथं मोकळ्यावर देखील वारा नाहीं."

तो म्हणाला, "हं, आतां पावसाळा जवळ आला ना ?"

तरी तिला कळेना कोणतं बोलणं कसं काढावं, आणि त्याची कळी खुलवावी.

पण तितक्यांत तो म्हणाला, "दिल्लींत तर असं उकडत होतं कीं कांहीं विचारूं नका."

मग ती एकदम म्हणाली, "दिल्लीच्या हकीगती सांगा ना मला."

तो म्हणाला, "उद्यां माझा लेख वाचा."

"तो वाचीनच, पण तुम्ही सांगा कीं. या कॅबिनेट मिशनमधून कांहीं निष्पन्न होतं आहे कीं नाहीं ?"

त्यानं मान हलविली. "मला नाहीं फारशी आशा."

"होय ?" तिनं उद्‌गार काढला.

मग मात्र तो एकदम बोलूं लागला, "त्याचं असं आहे" तो म्हणाला, "हिंदुस्थानांतली ब्रिटिश सत्ता संपवून हिंदुस्थानला स्वतंत्र करावं अशा प्रामाणिक इच्छेनं मिशन इकडे आलं आहे यांत शंका नाहीं. साऱ्या प्रमुख पक्षांच्या पुढाऱ्यांशीं चर्चा केल्यानंतर कॅबिनेट मिशननं जें निवेदन प्रसिद्ध केलं, त्यावर 'हरिजन'मध्यें लिहितांना महात्माजींनीं

असं म्हटलं, 'या मसुद्याची चार दिवस अगदीं कसून पाहाणी केल्यानंतर माझी खात्री झाली, कीं याहून अधिक चांगली योजना ब्रिटिश सरकारला पुढें मांडतांच आली नसती.' परंतु त्यांनीं नंतर असंहि लिहिलं कीं 'या योजनेंत कित्येक महत्त्वाचीं दोषस्थळं आहेत.' सर्व पक्षांचं समाधान होईल अशा प्रकारं हे दोष कसे काढायचे हा मुख्य पेंच आहे. आणि हा पेंच कॅबिनेट मिशनपुढें आहे असं म्हणण्यापेक्षां निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांपुढेंच आहे, असं म्हटलं पाहिजे. पाकिस्तान निर्माण करण्याचा जीनांचा आत्यंतिक हट्ट आहे. उलट हिंदुस्थानची फाळणी होतां कामा नये असा गांधींचा जिवापाड आग्रह आहे. गांधींच्या खेरीज बाकीचे कॉंग्रेस पुढारी फाळणीला कदाचित् तयार होतीलहि असा माझा कयास आहे. परंतु ते तयार झाले तरी त्याच्यानंतर आणखी एक मोठा प्रश्न उभा राहणार आहे. तो म्हणजे पंजाब आणि बंगाल या दोन प्रांतांची फाळणी करायची कीं नाहीं ? कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचं म्हणणं असं, कीं ज्या भूमिकेवरून जीनांनीं पाकिस्तानचा हट्ट धरला आहे, त्या भूमिकेवरूनच या दोन प्रांतांची फाळणी जीनांनीं मान्य केली पाहिजे. परंतु जीनांना हे दोन्ही प्रांत सबंधाच्या सबंध गिळंकृत करावयाचे आहेत. आणि या गोष्टीला गांधीजी तर राहोतच पण बाकीचे कॉंग्रेस पुढारी देखील कबूल होतील असं वाटत नाहीं. मिशनसुद्धां कबूल होणार नाहीं. अशी पंचाईत उत्पन्न झाली आहे !" बोलतां बोलतां तो थांबला. त्या घटकेच्या अंधुक प्रकाशांत तिनं त्याच्याकडे पाहिलं. त्याची चर्या तिला कष्टी दिसली.

तितक्यांत त्यांच्यापासून बऱ्याचशा अंतरावर अंधार पडत चालला तरी हॉकी खेळणाऱ्या मुलांचा चेंडू वेगानं सरपटत आला आणि त्यांच्या अगदीं पुढेंच येऊन थांबला. त्या चेंडूमागोमाग एक चौदा पंधरा वर्षांचा मुलगा धांवत आला. जगन्नाथनं चेंडू उचलून त्याच्याकडे टाकला. त्यानं तो झेलून जमिनीवर सोडला, व तो पडतां पडतांच हातांतली हॉकीची स्टिक सरसावून असा कांहीं सफाईचा तडाखा दिला, कीं हिरव्या गालिचावरून तो काळवंडलेला पांढरा चेंडू बंदुकीच्या गोळीसारखा गेला.

उषा जगन्नाथकडे पाहून हंसली. 'किती सुरेख' असं तिला म्हणायचं होतं. जगन्नाथहि हंसला; आणि तिला पुन्हां सांगूं लागला, "आपला राज्य-

कारभार गुंडाळून चालतं व्हायचं इंग्रजांनीं ठरविलं खरं, परंतु जातांना सत्ता कोणाच्या स्वाधीन किती करायची हें त्यांना ठरवायचं आहे. ही गरज कांहीं खोटी म्हणतां येणार नाहीं. परंतु या गरजेंतूनच एकेक चमत्कार आणि उपद्रव निर्माण झाले आहेत आणि होणार आहेत." त्यानं पुढच्या गवतांत खरवडल्यासारखं करून गवताचं एक पातं हातांत घेतलं, व त्याकडे पाहात तो थोडा वेळ स्तब्ध राहिला. मग हातांतलं पातं दूर टाकून तो म्हणाला, "मिशनची भूमिका अशी कीं आपल्या स्वतंत्र राज्याची तऱ्हा कशी असावी तें हिंदुस्थानच्या लोकांनीं आपलं आपण ठरवावं. तें आम्ही कशाला सांगूं? यासाठीं एक घटना समिति निर्माण झाली पाहिजे. परंतु अशी घटना समिति अस्तित्वांत येऊन तिनं हिंदुस्थानांतल्या स्वतंत्र राज्यपद्धतीचा आराखडा तयार करायचा म्हटलं, तर ती कांहीं चुटकीसरशी होणारी गोष्ट नव्हे. दोन चार वर्षांचा तरी अवधि त्याला लागणार. तोंपर्यंत देशाच्या राज्यकारभाराचा गाडा कुणीं हांकायचा? ब्रिटिश तर निघून जाणार. त्यांची जागा घ्यायची कुणीं? तेव्हां पाकिस्तान निर्माण करायचं कीं नाहीं, घटना समिति कशी बनवायची या दोन प्रश्नांपेक्षां देखील अधिक तांतडीचा निराळाच एक प्रश्न उत्पन्न होतो. तो म्हणजे कामचलाऊ मध्यवर्ति सरकार बनविण्याचा. होय कीं नाहीं?"

त्याच्याकडे पाहतां पाहतां व त्याचं बोलणं ऐकतां ऐकतां उषाला एकदम हंसूं आलं. ज्या वयांत तरुण मुलींना कोणत्याहि गोष्टीची गंमत वाटली कीं अनावर हंसूं येतं, त्या वयाच्या पुढें ती अजून फारशी गेली नव्हती. तिचं तें हंसणं पाहून जगन्नाथनं विचारलं,

"कां? हंसतां कां?"

उषा म्हणाली, "माझ्या मनांत एकदम असं आलं, कीं आमच्या भाऊंप्रमाणें तुम्ही कॉलेजांत प्रोफेसर कां नाहीं झालांत? त्यांच्याइतकंच उत्तम तुम्हीं शिकविलं असतंत."

"असं?" तो म्हणाला, "पण तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें हा गुण माझ्या अंगीं खरोखरच असेल तर त्याचं श्रेय सरनाच आहे. त्यांच्या हाताखालीं मीं कांहीं दिवस काढलेत ना?"

तो नेहमीं भाऊंविषयीं बोलतांना ‘ सर ’ असं म्हणे, हें उषाच्या लक्षांत आलं. तिला आणखीच गंमत वाटली आणि तिचं हंसणं वाढलं. ती म्हणाली, “ हं. पुढें सांगा. ”

तो म्हणाला, “ पुढें सांगा काय ? पुढेंच सगळ्या पंचायती आहेत. कामचलाऊ सरकार बनविण्याच्या बाबतींत साऱ्या प्रमुख पक्षांना खुष करायचं म्हणजे महाबिकट काम आहे. कॉंग्रेसचे पांच प्रतिनिधी, मुस्लीम लीगचे पांच, अल्पसंख्याकांचे दोन, अस्पृश्यांचा एक अशा लोकांचं एक वरिष्ठ मंत्रिमंडळ तयार करण्याची योजना लॉर्ड वेव्हेलनीं काढली; पण तिच्यांतून किती पंचायती निर्माण झाल्या ! कॉंग्रेसचा वाजवी हट्ट असा कीं आम्ही कांहीं फक्त हिंदूंच्या वतीनं झगडलों नाहीं, सबंध देशाच्या वतीनं आम्ही झगडलों आणि नेहमीं बोलत राहिलों, हिंदूंप्रमाणें मुसलमानांचंहि प्रतिनिधित्व करण्याचा आम्हांला हक्क आहे, आमच्या राष्ट्रीय सभेचा आज घटकेला अध्यक्ष एक मुसलमान गृहस्थ आहे; तेव्हां वरिष्ठ मंत्रिमंडळांत आम्ही म्हणू त्या एका मुसलमान गृहस्थाचा अंतर्भाव झालाच पाहिजे. आणि जीनांची मुस्लीम लीग तर या गोष्टीला बिलकुल तयार नाहीं. कारण जीनांचा आणि लीगचा नेहमींचा मुख्य मुद्दा असा कीं कॉंग्रेस हिंदूंची आहे, मुसलमानांच्या वतीनं बोलण्याचा तिला कांहीं एक अधिकार नाहीं. मागें गांधीजी आणि जीना यांच्या मुंबईत गांठीभेटी झाल्या, बोलणीं झालीं. तें सारं फिसकटलं याचं सुद्धां कारण जीनांचा हा हट्टच. गांधी फक्त हिंदूंचे पुढारी आहेत, सबंध देशाचे नाहींत आणि मुसलमानांच्या वतीनं बोलण्यास काय तो मी एकटा आहें, अशी हट्टी भूमिका जीनांनीं अलीकडे घेतली आहे. सारांश, कोणताच राजकीय पक्ष आपला हट्ट सोडायला तयार नाहीं, दुसऱ्याविषयीं विश्वास दाखवायला तयार नाहीं ! मग कामचलाऊ सरकार अस्तित्वांत यायचं कसं ? ब्रिटिशांनीं सत्ता अमक्याकडे सोंपवायची हें ठरायचं कसं ? आणि हें ठरलं नाहीं तर ब्रिटिश जायला तयार असले तरी त्यांनीं जायचं कसं ? सारा कसा विचका आहे बघा ! हा विचका पाहून गांधींना मनांतल्या मनांत वाटत असेल, स्वातंत्र्य दाराशीं आलं तरी दार उघडून तें आंत घेण्याची घटका दूरच आहे ! मुस्लिम लीगला नाखुष करून कॉंग्रेसच्या हातीं तुम्ही सत्ता सोंपवा तर

खरी, देशांत जिकडे तिकडे ताबडतोब पुंडाई माजेल, अशी दहशत जीना घालताहेत आणि दंग्याधोप्याची तयारी देशभर झालेली आहे. तेव्हां मुस्लिम लीगला रुसून बसायचं असलं तर बसूं द्या, आम्ही घेतों सत्ता हातांत, आणि चालवितों देशाचा कारभार, असं म्हणण्याचं धाडस कॉंग्रेस करूं शकत नाहीं ! मग उंबरठ्याशीं आलेल्या स्वातंत्र्याचं पाऊल दारांतून आंत पडायचं कसं ? या साऱ्या गलिच्छ गुंतागुंतीमुळें गांधीजींच्या अंतःकरणाच्या आंतल्या आंत कशा चिंध्या होत आहेत, तें रोजच्या संध्याकाळच्या प्रार्थनेनंतर जीं भाषणं ते करतात, तीं ऐकलीं कीं कळतं. त्यांच्या प्रार्थनेला मी कांहीं दिवस हजर राहिलों. पण मग मीं हजर राहायचं सोडून दिलं. गांधीजींचे आत्यंतिक निराशेचे उद्गार मधूनच एखादे वेळीं बाहेर पडत, आणि ते ऐकले कीं अंतःकरणाला एकदम जखम झाल्यासारखं वाटे. त्यांच्या प्रार्थनेला जायचं मीं सोडूनच दिलं..." बोलतां बोलतां तो एकदम अगदीं स्तब्ध झाला. गांधीजींच्या प्रार्थनेच्या वेळच्या कोणत्या तरी उद्गारांची त्याला तीव्रतेनं आठवण झाली असावी.

कांहीं वेळानं उषा हलकेंच म्हणाली, "परंतु या एकंदर प्रकारावरून मनांत एक शंका आल्यावांचून राहात नाहीं. तुम्हांला विचारूं का ?"

"कोणती शंका ?"

"तुम्ही सांगतां कीं हिंदुस्थानचं भलं करून निघून जाण्याची ब्रिटिशांची अगदीं प्रामाणिक इच्छा आहे, असं गांधींजीसुद्धां म्हणतात—"

"हो."

"मग त्या इच्छेच्या विरुद्ध जाणाऱ्या प्रत्येक गोष्टीचं कठोरपणानं निर्मूलन त्यांनीं कां करूं नये ?"

"म्हणजे जीनांचा बींमोड त्यांनीं कां करूं नये असंच ना ?"

"हो, असंच. कारण पिस्तुलाची नळी दाखवून आपले सारे हट्ट पुरे करून घेण्याचा चंग जीनांनीं बांधला आहे. मला जें हवं तें सारं द्या, नाहीं तर मी देशांत जिकडे तिकडे सुरामारी, लूट, आणखी जाळपोळ कशी भडकावितों तें बघा, अशी दहशत जीना घालताहेत. या दहशतीची

भीति काँग्रेसला वाटली तर नवल नाहीं. कारण काँग्रेसच्या हातांत शस्त्र नाहीं, असलं तरी त्यांना हिंसा करायची नाहीं. परंतु जीनांची ही शिर-जोरी ब्रिटिश सरकार खुशाल चालूं देतं कसं? अजून तर कांहीं त्यांनीं हिंदुस्थानचा कारभार सोडून दिलेला नाहीं ना? आणि जीनांनीं जातीय दंगलीचे कितीहि बॉम्ब देशांत जागोजाग पेरून ठेवले असले, तरी त्यांची दंगलीची धमकी वेळींच मुळांत उखडून टाकायला पुरून उरेल इतकं चतुरंग सैन्य सरकारजवळ अगदीं या घटकेला सिद्ध आहे ना? मग सरकारचं लष्करी सामर्थ्य माहिती असूनसुद्धां जीना शिरजोरीची भाषा करतात याचा अर्थ काय? याचा अर्थ एकच कीं जीनांनीं शिरजोरी करावी अशी ब्रिटिशांची इच्छा आहे! नाहीं का?"

जगन्नाथ म्हणाला, "ही शंका कांहीं गुप्त नाहीं. तिचा कुणी उघड उच्चार करीत नाहीं, पण साऱ्याच काँग्रेस पुढाऱ्यांच्या मनांत ती आहे. आणि इंग्रजांची ही कपटनीति जमेस धरूनच त्यांना पावलं टाकायचीं आहेत. यामुळेंच गांधीजी आणि बाकीचे पुढारी यांच्या मतांत हळुहळूं भिन्नता उत्पन्न व्हायला लागली आहे. स्वातंत्र्य लांबणीवर पडलं तरी चालेल, पण हिंदुस्थान अखंड राहिला पाहिजे, असं गांधींना वाटतंय. पण उलट बाकीच्या पुढाऱ्यांना वाटतंय, कीं स्वातंत्र्य ताबडतोब मिळत असेल तर पाकिस्तानसकट तें घ्यावं लागलं तरी घ्यावं. या साऱ्या गोष्टींमुळें राजकारणाची कोंडी झाली आहे."

उषा एकदम म्हणाली, "अखेर व्हायचंय तरी काय?"

तो म्हणाला, "कांहीं सांगतां येत नाहीं. सारा घोळ पडला आहे. आणि म्हणूनच मी कंटाळलों, आणखी एकदम इकडे निघून आलों."

उषा म्हणाली, "होय. तुम्ही येणार अशी अगदीं कल्पना नव्हती मला. तुम्हांला पाहून मी थक्कच झालें."

"आणि तुम्हांला पाहून मी तर जास्तच थक्क झालों!"

त्याचे ते शब्द ऐकतांच उषा चमकली. ज्या गोष्टीच्या निमित्तानं तो तिच्यावर रुसला असावा असं तिला वाटत होतं, त्या गोष्टीविषयींचं बोलणं यांतून आतां निघणार होतं. तिच्या मनांत आलं, आतां जपून बोललं

पाहिजे...हा विषय केव्हां तरी एकदां निघायला हवाच होता. त्याचा राग घालवायला हवाच होता. आतां तो विषय अकस्मात् निघाला हें एक प्रकारें बरं झालं. पण ती स्वतःशीं पुन्हां म्हणाली, 'जपून बोललं पाहिजे...' ती म्हणाली,

"तुम्हांला आश्चर्य वाटावं हें साहजिक होतं. पण तुम्ही असे रागावाल ही कल्पना नव्हती."

"मी रागावलों ?" तो एकदम म्हणाला, "बघा बुवा. कोणीं सांगितलं तुम्हांला मी रागावलों म्हणून ?"

तिनं आपली पर्स उघडली, कागदाच्या दोन छोट्या घड्या बाहेर काढल्या, व त्या त्याच्या हातीं देण्यासाठीं पुढें करून ती म्हणाली, "या दोन चिठ्ठ्यांनीं."

जगन्नाथनं त्या पाहिल्यावर ओळखल्या. पण आपला आविर्भाव कायम ठेवून तो म्हणाला, "छे छे ! तुमचा कांहीं तरी गैरसमज झाला आहे. मी कशाला रागावूं तुमच्यावर ? तुम्ही कुणाच्या मोटारींत बसावं, कुणाबरोबर हिंडावं, हें ठरविण्याचा मला काय अधिकार ? तो सर्वस्वी तुमचा प्रश्न आहे. नाहीं का ?"

खरं म्हणजे उषाला वाटलं खूप मोठ्यांदा हंसावं. कारण आपण रागावलों नाहीं हें सांगतां सांगतांच ज्या गोष्टीचा त्याला घुस्सा आला होता, त्या गोष्टीबद्दल त्यानं तिला टोमणा मारला होता. सुरैयांबरोबर मोटारींत बसलेली ती दिसल्यामुळें त्याला मत्सर वाटला असला पाहिजे ही तिची कल्पना बरोबर होती तर ! मत्सर वाटण्याइतकी ती त्याला हवीशी वाटत होती तर !...उषाच्या मनांत आलं, त्याला एकदम म्हणावं, महाराज, आतां उगीच सोंग करूं नका. तुमचं माझ्यावर प्रेम आहे असं स्वच्छ सांगून टाका...पण ती तसं म्हणाली नाहीं. तिनं म्हटलं,

"सर्वस्वी माझा प्रश्न आहे असं मला वाटत नाहीं—"

"वाटत नाहीं ? आश्चर्य आहे बुवा. वाटायला हवं !" तो वांकड्यांत शिरून म्हणाला. परंतु तिनं त्याचा राग येऊं दिला नाहीं. ती म्हणाली, "खरं विचाराल तर तुम्ही इथें नसलांत म्हणजे इकडे तिकडे कुठें

हिंडावं, कुणाकडे जावं, बसावं, बोलावं, अशी मला इच्छाच होत नाहीं." हें बोलतांना तिच्या मनांत आलं, आतां फक्त माझं तुमच्यावर प्रेम आहे एवढंच यांना स्पष्ट सांगण्याचं मी शिल्लक ठेवतें आहे. या स्पष्ट वाक्याच्या इतक्या जवळ जाऊन आपण कांहीं या वेळीं बोलूं असं तिला प्रारंभीं वाटलं नव्हतं, पण ती बोलून गेली होती खरी. आणि तसं झालं म्हणून बिघडलं होतं कुठें? ती म्हणाली, "तुम्ही दिल्लीस गेलांत कीं तुमच्या वाटेकडे डोळे लावून बसायचं एवढंच मला समजतं; तुम्हांला माहीत नाहीं? नाहीं म्हणा पाहूं."

तो स्वतःशीं तोंडांतल्या तोंडांत कांहीं तरी पुटपुटला.

ती म्हणाली, "ज्यांच्या मोटारींत मी तुम्हांला दिसलें, ते कोण होते तुम्हांला माहीत आहे ना?"

"मला नाहीं माहीत. आणि माहीत असण्यावांचून माझं कांहीं अडलं नाहीं."

"मी त्यांच्याकडे कां गेलें होतें तें तुम्हांला माहीत आहे ना?"

"गेलां असाल कशालाहि. तुम्हीं कुणाशीं किती मैत्री करावी त्याचं वेळापत्रक लिहून देण्याचा अधिकार मला आहे असं मी नाहीं समजत. त्यांच्याकडे कशाला कां गेला असानात?"

त्यानं पुन्हां असं वांकडयांत शिरून बोलावं, याचं उषाला दुःख झालं. त्याच्याशीं भांडण्याचा हा तिचा पहिलाच प्रसंग होता. प्रेमकलहाचा अनुभव ती पहिल्यादाच घेत होती. आपली बाजू बरोबर असतांना दुसऱ्या माणसानं मुद्दाम वेड पांघरून कुजकं बोलायला सुरवात केली तरी त्याच्याशीं गोडीनंच बोलत राहण्याची ही तिची पहिलीच वेळ होती. पुढें कसं बोलावं तें तिला चटकन् सुचेना. ती गोंधळली. क्षणभर गप्प बसली. मग ती हलकेंच म्हणाली,

"मीं माझ्या एका पत्रांत तुम्हांला लिहिलं नव्हतं का बरं?"

तो कांहीं न बोलतां स्तब्ध राहिला.

ती म्हणाली, "बोला कीं! लिहिलं होतं कीं नाहीं सुर्वेयांच्याकडे कदाचित् मला चहाला जावं लागेल म्हणून? महिला परिषदेवरचा माझा

लेख आवडल्यामुळें त्यांनीं मूर्तीकडे चेक कसा पाठविला, लेख कुणीं लिहिला म्हणून कसं विचारलं, मूर्तीनं माझी संमति न घेतां माझं नांव कसं कळवलं, हें सारं मीं तुम्हांला लिहिलं नव्हतं ?"

तरीदेखील तो कांहीं बोलला नाहीं.

ती म्हणाली, "असे गप्प काय राहतां? बोला कीं! मी वाटेल त्याच्याशीं वाटेल तितकी मैत्री करायला मोकळी आहे असा टोला मला कां देतां? मला कुणाची मैत्री हवी आहे? केवळ तुमच्या सहवासांत अंतर पडूं नये म्हणून इकडे मुंबईस आले, आणखी या वर्तमानपत्राच्या उद्योगांत पडलें. तुम्ही इथें असतां तर सुरैयांकडचं चहाचं बोलावणं आलं तेव्हां मीं जायला हवं असं तुम्ही खचित म्हणालां असतां असं मला वाटलं म्हणूनच मी गेलें. बसमधून गेलें आणि तशी परतहि आलें असतें. पण ते मला पोंचवायला निघाले, मग काय नाहीं म्हणू? त्यांच्या गाडींतून उडी टाकूं ?—"

एकेक वाक्य बोलतां बोलतां तिचा स्वर अधिकाधिक विकल होत होता. आपण केलेल्या एका साध्या गोष्टीला अपराधाचं स्वरूप यावं, जगन्नाथनं आपल्यावर रागवावं, आपल्याला त्याचीं आर्जवं करावीं लागावीं याचा तिच्या मनाला वाटणारा खेद, अन् कांहींसा रागहि प्रत्येक वाक्यागणिक वाढत होता. पण 'त्यांच्या गाडींतून काय उडी टाकूं ?' या तिच्या अखेरच्या वाक्याचा जसा गंभीर अर्थ होण्यासारखा होता, तसा त्यांत पाहिला तर विनोदहि होता. आणि त्यांतल्या गांभीर्याऐवजीं विनोदच जगन्नाथला जाणवला आणि तो एकदम मोठ्यांदा हंसला. आधींच त्यानं आणलेलं रागाचं अवसान खोटं होतं. ती सुरैयांबरोबर मोटारींत बसलेली दिसली एवढ्याच एका गोष्टीवरून भांडण काढणं फारसं समर्थनीय नव्हे, असं त्याचं त्यालाच कदाचित् वाटत असावं. त्यामुळे आवाज चढवून एकेक प्रश्न विचारतांना, 'त्यांच्या गाडींतून काय उडी टाकूं ?' हें वाक्य जेव्हां तिच्या तोंडून बाहेर पडलं, तेव्हां त्याला ते एकदम अतिशय विनोदाचं वाटलं. त्याला हंसू आलं; आणि हंसणं एकदां तोंडांतून फुटल्याबरोबर त्याच्या खोट्या रुष्टतेचा पारा एकदम शून्यावर येऊन त्या हंसण्याची मजा घेण्यासाठीं तो आणखी हंसत सुटला...

उषानं प्रथम किंचित् भांबावल्याप्रमाणें त्याच्याकडे पाहिलं. मग तिच्या लक्षांत आलं, कीं 'त्यांच्या गाडींतून काय उडी टाकूं?' असा प्रश्न आपण केला होता. त्या प्रश्नांतली हास्यास्पदता तिच्याहि मग लक्षांत आली. आणि तीदेखील हंसूं लागली.

"हो हो, टाकायची होती उडी! कां नाहीं टाकलीत?" जगन्नाथ हंसत हंसत म्हणाला.

आतां रुसव्याचं बोलणं करावंसं तिला वाटलं. ती म्हणाली, "अडलंय माझं! माझी लहर लागली तर मी पुन्हांसुद्धां जाणार आहे सुरैयांच्याकडे. ते माझ्याशीं फार चांगले वागले."

"असं का? जा जा बरं."

"जाईन ना! तुम्हांला विचारीन म्हणतां कीं काय?" पण बोलतां बोलतां रुसल्याचा आविर्भाव कायम ठेवणं तिला अशक्य झालं आणि ती एकदम मोठ्यांदा हंसली, व म्हणाली, "उगीच कसे तुम्ही माझ्यावर रागावलांत हो? काल संध्याकाळीं किती आंठ्या पडल्या होत्या तुमच्या कपाळाला! माझ्याशीं एक अक्षरदेखील बोललां नाहींत. तुम्ही मूर्तीबरोबर गाडींत चढून बसलांत तेव्हां मीं केवढ्यांदा विचारलं, उद्यां केव्हां भेटणार म्हणून. पण माझ्याकडे वळून पाहिलंसुद्धां नाहींत. आणखी आज कचेरींत मीं दोनदां चिटी लिहून विचारलं तर हीं उत्तरं पाठविलींत! असं रागावणं बरं काय? मीं आपल्या मनाशीं किती ठरविलं होतं सुरैयांच्या गमती तुम्हांला सांगायच्या म्हणून! तर तुम्ही—"

तो म्हणाला, "मग आतां सांगा कीं."

"आतां काय सांगायचं? माझा पहिला उत्साह सगळा मारून टाकलात."

"मला फार वाईट वाटतं. सांगा."

"अंहं, आतां माझा सारा उत्साह नाहींसा झाला."

"तो परत आणायची युक्ति मला माहीत आहे."

"होय? कोणती?"

तो म्हणाला, "आपण दोघे मिळून एखाद्या सिनेमाला जाऊं."

ती म्हणाली, “ अगदीं माझ्या मनांतलं बोललांत. माझ्या पत्रांत मीं लिहिलेलं तुम्हांला आठवतं ना ? ”

“ काय ? ”

“ सुरैयांनीं मला जो चेक धाडला तो तुम्ही दिल्लीहून आल्यानंतर वटविणार आहे मी म्हणून ? आमच्या कचेरींतल्या साऱ्या लोकांनीं माझ्या-कडून फीस्ट घेतली; पण तुम्हांला जंगी फीस्ट द्यायसाठीं मीं तो चेक तसाच ठेवून दिला होता. आज मीं तो मोडून घेतलाय. माझ्या पर्समध्यें खूप पैसे आहेत ! सिनेमाला अवश्य जायचं. आणि आधीं कुठें तरी छान जेवण करायचं. ” ती अगदीं हर्षभरानं बोलत होती. “ चला, उठा ” असं म्हणून उभं राहून तिनं आपल्या हातानं आपलं नेसणं नीटसुद्धां केलं.

तीं दोघं मैदान ओलांडून रस्त्याला लागलीं तेव्हां जिकडे तिकडे दिव्यांचा लखलखाट झाला होता. त्यांच्या अंगावरून मोटारी जात होत्या, धाडधाड आवाज करीत बस गेली कीं तिच्यांतल्या स्त्रीपुरुषांचे चेहरे उजेडानं उजळलेले दिसत होते व लगेच दिसेनासे होत होते. चर्चगेट-नजीकच्या चौकांत रहदारी विरळ होती. स्टेशनच्या इमारतीवरील मोठ्या जाहिरातींतलीं तांबडीं भडक अक्षरं झळाळत होतीं ! इरॉस सिनेमाच्या पुढच्या भिंतीवर चालू चित्रपटाची खूप मोठी रंगीबेरंगी जाहिरात दिव्याच्या चौकटींत शोभत होती. समुद्र फारसा दूर नव्हता... बरोबर पावलं टाकतां टाकतां जगन्नाथ आणि उषा कांहीं बोलत नव्हतीं. रुसवा संपला होता, समजूत झाली होती, आतां दोन तीन घटका मोठ्या सुखाच्या जाणार होत्या. असा आनंद मनांत असल्यावर शब्दांची काय जरूर ?...

हॉटेलच्या दारांतून आंत शिरून समोर दिसणाऱ्या टेबलांच्या रांगांतलं कोणतं टेबल पसंत करावं म्हणून तीं दोघं जरा थबकून उभीं राहिलीं. तितक्यांत कुणीं तरी म्हटलं, “ हल्लो ! ”

दोघांनींहि वळून पाहिलं.

नंदलाल सुरैया घाईघाईनं पावलं टाकीत तिच्याकडे येत होते. त्यांच्या-बरोबर आणखी एक गृहस्थ होता, त्याला उषानं एकदम ओळखलं नाहीं.

पण मग ओळखलं. ज्या मोहित्यांना सुरैयांच्या गाडींत तिनं पाहिलं होतं ते होते ते.

सुरैया हंसत जवळ आले व त्यांनीं हात पुढें केला. पण उषानं त्यांच्या हातांत हात न देतां दोन्ही हात जोडून नमस्कार केला. तिच्या त्या करण्यानं सुरैयांचं हास्य कमी झालं नाहीं. त्यांनीं तिची आणि मोहित्यांची ओळख करून दिली, जगन्नाथची ओळख करून घेतली, व त्यांच्याशीं हस्तांदोलन करतांना ते म्हणाले, " तुमच्या लेखांचा मी एक चाहता आहे. तुमचा परिचय झाला ही मोठ्या भाग्याची गोष्ट मी समजतों. " पण जगन्नाथनं कांहीं उत्तर केलं नाहीं. तो फक्त कसाबसा हंसला. आणि उषानं जेव्हां मोहित्यांना सांगितलं, " हे जगन्नाथ " तेव्हां तर मोहित्यांनीं पुढें केलेला हात त्यानं धरला नाहीं, किंवा तो हंसलाहि नाहीं. उलट त्यांच्याकडे जवळजवळ स्पष्ट तिरस्काराचा कटाक्ष टाकून तो उषाला म्हणाला, " तिकडच्या त्या टेबलावर बसूं या " व तो चालूंच लागला.

उषाला त्याच्या मागोमाग पावलं टाकणं भागच होतं. परंतु तिच्या चालण्यांतली आनंदाची उसळी एकदम नाहींशी झाली होती. जगन्नाथच्या पाठीकडे पाहून ती मनाशीं म्हणत होती, ' यांना रागाचा पुन्हां झटका आला वाटतं ? इथं नेमके सुरैया पुन्हां कशाला भेटले ?'

पण या घटकेची मजा रुसण्याफुगण्यानं बिघडूं द्यायला ती तयार नव्हती. टेबलाजवळ गेल्यावर बसतां बसतां खालीं वांकून आधींच बसलेल्या जगन्नाथच्या डोक्याला डोकं लावून ती अगदीं गोड स्वरांत म्हणाली, " पुन्हां रागावलांत ? "

तो म्हणाला, " मी काय लहान मूल आहे काय पुनःपुन्हां रागवायला ? "

तिनं विचारलं, " मग असे कां वागलांत ? "

" सुरैयांशीं वाईट वागलों काय ? "

" नाहीं, त्यांच्याशीं नाहीं. पण त्या मोहित्यांशीं—"

" तो कोण आहे तुला माहीत आहे ? " त्यानं विचारलं.

" थोडंसं. सुरैयांनीं मला सांगितलं, कीं ते पोलिस खात्यांतले एक वरिष्ठ अंमलदार आहेत. "

तो म्हणाला, " अत्यंत नीच मनुष्य आहे तो. "

तिनं एकदम आश्चर्यानं विचारलं, " अग बाई ! म्हणजे काय ? "

तो म्हणाला, " बसा, तुम्हांला सगळं सांगतों. "

ती बसली, आणि जगन्नाथच्या चेहऱ्याकडे पहात राहिली. त्याच्या मनांत कोणत्या तरी अत्यंत तापदायक आठवणी येत असल्यासारखी त्याची चर्या तिला दिसली. तो आतां तिला काय सांगणार होता तें तिला समजेना.

—*—

# प्रकरण सहावं



बस चालू होण्याच्या वेळेस तिनं सहज मान वळवून खालीं रस्त्यावर नजर टाकली, आणि तिला निरोप दिल्यानंतर आपल्या वाटेनं निघालेल्या जगन्नाथची पाठमोरी आकृति दिसल्याबरोबर तिच्या मनाची वृत्ति एकदम पालटली. हॉटेलांत जेवतांना, आणि नंतर थिएटरांतल्या खुर्चीत आराम-शीर बसून चित्रपट पाहतांना तिचं मन एक प्रकारच्या उत्साहानं हलकं झालेलं होतं. मोहित्यांच्याबद्दल ज्या गोष्टी जगन्नाथनं तिला सांगितल्या होत्या, त्या खऱ्या वाटूं नयेत इतक्या भयंकर तर होत्याच, परंतु शिवाय त्या ऐकल्यानंतर जगन्नाथच्या पूर्वचरित्रांतली आजपर्यंत माहीत नसलेली अशी एक कारुण्यपूर्ण हकीगत तिला ठाऊक झाली होती. आश्चर्य, राग, चीड, खिन्नता आणि जगन्नाथला भोगाव्या लागलेल्या दुःखांबद्दलची करुणा, अशा अनेक भावनांनीं तिचं अंतःकरण क्षणभर अगदीं जड झालं होतं. जगन्नाथनं आपली हकीगत संपविली, तेव्हां एकदम सुंद होऊन ती अगदीं गप्प राहिली होती. स्वत: जगन्नाथहि एकदम बोलेनासा झाला होता. पण मग तो तिला म्हणाला होता, "पण जाऊं दे या सगळ्या गोष्टी. माझ्या मनांतून त्या कधीं जायच्या नाहींत; किंबहुना त्या कधीं मनांतून जायच्या नाहींत याचीच मला कधीं कधीं भीति वाटते. पण तुम्ही त्या मनांत ठेवूं नका. तो मोहिते आतां आपल्याला सहज दिसला, अन् माझ्या वागण्यानं तुमचा गैरसमज झाला म्हणून मीं ही हकीगत सांगितली तरी! नाहीं तर कधीं सांगितली नसती. तुम्ही ती विसरून जा. निदान आतां तरी विसरा. आपल्याला मजेंत वेळ घालवायचा आहे ना? हें पहा आपलं जेवण आलंच. आः!" टेबलावर मांडल्या जाणाऱ्या कढत कढत पदार्थांकडे बघत आणि हातावर हात चोळीत तो म्हणाला होता, "काय भूक लागली आहे मला!"

तो हंसला होता. त्यानं सांगितलेल्या हकीगतीमुळें तिच्या मनावर आलेली विषण्णता घालविण्यासाठीं तो वाजवीपेक्षां जास्त अभिनय करीत आहे, असं तिच्या मनांत आलं होतं. परंतु ती विषण्णता तिलाहि नको होती, आणि त्याच्या अभिनयाला साथ देण्याची तिची तयारी होती. म्हणून तीहि हंसली व म्हणाली, " भूक लागली ? अहो, चहा, केक्स मारल्यात त्याला पुरत्या दोन घटका तरी झाल्या का ? "

" नाहीं ? " तो आणखीच हंसून म्हणाला, " मला तर आठवत देखील नाहीं चहा घेतल्याचं ! " त्यानं एकदम सुरी कांटा सरसावून घांस उचलून तोंडापाशीं धरला, व तो तोंडांत घालण्यापूर्वी विचारलं, " तुम्हांला मीं पूर्वी कधीं सांगितलंय का ? "

" काय ? " तिनं विचारलं.

" मी हे पदार्थ खातों, पण माझ्या सगळ्यांत जास्ती आवडीचं पक्वान्न कोणतं म्हणाल तर पुरणपोळी. "

" होय ? माझंसुद्धां. " घांस घेतां घेतां एकदम थांबून ती म्हणाली, " बरं झालं मला सांगितलंत तें. माझी आई फार चांगल्या पुरणपोळ्या करते. "

" पण त्या मला कशा मिळायच्या ? " असं म्हणत तो हंसला.

ती म्हणाली, " कां ? त्यांत काय अवघड आहे ? आईला मी लिहीन आणि ती करून पाठवील इकडे. पुढच्या आठवड्यास भाऊ यायचे आहेत. "

" सर येणार आहेत ? कां ? तुमचं कसं काय चाललंय तें पहाण्यासाठीं ? "

" अंहं ! त्यांत काय पहायचंय ! मी दर पत्रांत लिहितें कीं माझं उत्तम चाललं आहे म्हणून ! "

" मग सर कां येणार आहेत ? "

" रेडिओवर भाषण आहे त्यांचं. "

" होय ? बरं झालं. ते येतील तेव्हां मी इथे असायला मात्र हवं. "

ती म्हणाली, " बस करा हो तुमचं हें असलं बोलणं. असायला हवं म्हणजे काय ? पुन्हां दिल्लीस काय आहे तुमचं काम ? "

" तुम्हांला माहीत नाहीं ? "

" आहे माहीत. पण मुद्दाम भाऊंना भेटायसाठीं चार दिवस राहिलांत म्हणून कांहीं बिघडेल काय ? राहीन म्हणा."

" बरं, राहीन."

" तसं नाहीं, वचन द्या."

" वचन देतों. आतां तर झालं ?"

अशा प्रकारें त्यांचं जेवण हंसत खेळत झालं होतं. चित्रपट पाहतांनाहि तो आणि ती आनंदांत होती. मोहित्यांची हकीगत ती विसरून गेली होती.

परंतु आतां बसच्या वरच्या मजल्यावरून त्याची पाठमोरी आकृति रस्त्यानं निघालेली तिला दिसल्याबरोबर तिला एकदम एकटेपणाची जाणीव झाली. उल्हासाचं आणि आनंदाचं जें विरळ रेशमी आवरण तिच्या व त्याच्याभोवतीं गेल्या तीन चार घटकांत निर्माण झालं होतं तें त्यानं आपल्याबरोबर नेलं, आपण उघड्या पडलों, असा चमत्कारिक भास तिला झाला. तिच्या अंतःकरणाचा हलकेपणा एकदम नाहींसा झाला. इतका वेळ दूर ठेवलेली खिन्नता एकदम अंतःकरणांत घुसल्यासारखं तिला वाटलं. बस वेगानं निघाली होती. ' मरीन लाइन्स ' स्टेशनापुढच्या टप्प्यावर बस थांबली, तेव्हां समुद्राकडून येणारा वारा तिच्या अंगाशीं भिडला. तिनं पदर ओढून डोक्यावरून घेऊन घट्ट धरला, व डोळे मिटले. पण तसं केल्याबरोबर जगन्नाथनं सांगितलेल्या मोहित्यांबद्दलच्या गोष्टींची चित्रं तिच्या मिटलेल्या नजरेपुढें येऊं लागलीं. तिनं दचकून डोळे उघडले, आणि स्वतःशींच मान हालविल्यासारखं केलं. ' तिकिट घ्या ' म्हणायसाठीं कंडक्टर तिच्याजवळ आला, त्याच्याकडे पाहतांच तिला मोहित्यांचा भास झाला. तिनं नजर दूर केली, आणि पुढें बसलेल्या स्त्रीपुरुषांच्या पाठी आणि डोकीं ती न्याहाळूं लागली. मोहित्यांच्या हकी-गतीच्या आठवणी तिला अगदीं नको होत्या. परंतु कांहीं केल्या त्या तिला दूर ठेवतां येईनात. तिनं अंगाला शहारे दिले. जणूं जगन्नाथचं बोलणं तिला पुन्हां ऐकूं येत होतं...

१९४२ च्या चळवळींत जगन्नाथला पकडण्यासाठीं पोलिसांनीं जंग जंग पछाडलें होते. पण त्याच्या हिंमतीपुढें आणि सावधगिरीपुढें त्यांचं कांहीं

चाललं नव्हतं. आपल्याला पकडण्यासाठीं पोलिस केव्हां कुठें जाळं लावतील त्याचा नियम नाहीं, ही गोष्ट तो ओळखून होता. तुरुंगांत जाण्याची त्याला डरहि नव्हती. परंतु शक्य तों पोलिसांच्या हातीं सांपडायचं नाहीं, अशा धोरणानं तो आपलीं सारीं कामं उरकीत होता. पण अखेर अगदीं अकस्मात् तो पोलिसांच्या हातीं सांपडला होता. सांवळ्या घाटगे नांवाच्या एका सोळा वर्षांच्या पोरसवदा तरुणाला वांचवायसाठीं त्यान हिंमतीनं चौकीवर हल्ला केला होता, व त्याचा तो प्रयत्न फसून सांवळयाला सोडविण्याऐवजीं तो स्वतःच सांपडला होता. त्या जिल्ह्यांत मोहिते कामावर होता. जगन्नाथ हातीं पडल्या-बरोबर त्याला अगदीं स्वर्ग हातीं लागल्याप्रमाणें आनंद झाला. त्याच्यापुढें जेव्हां जगन्नाथला प्रथम उभं करण्यांत आलं तेव्हां तो आपली मिशी कुरतडीत म्हणाला, " आतां सारी चळवळ खणून काढतों. हा जगन्नाथ सांपडल्यावर सारे धागेदोरे आणि थांगपत्ते काढायला उशीर किती ! "... मोहित्याच्या त्या बोलण्यांत कोणती धमकी होती, तें जगन्नाथला ओळखतां येत होतं. पण तिची त्याला फिकीर नव्हती. त्याला फक्त इतकंच वाईट वाटत होतं, कीं आपल्याला मोठ्या शहामतीनं पकडलं अशी खोटी फुशारकी हा मोहिते आतां मिरवील अन् वरिष्ठांकडून पाठ थोपटून घेईल. केवळ एका लहानशा गफलतीनं दगा झाला अन् आपण धरले गेलों याची त्याला मनांतल्या मनांत विलक्षण चीड येत होती. आपल्याकडून माहिती काढण्यासाठीं मोहिते आतां आपले हाल करील याचं त्याला भय नव्हतं. कितीहि हाल झाले तरी आपण डगमगणार नाहीं अशी त्याला खात्री होती.

" पण माझ्या त्या खात्रीला लौकरच धक्का बसला, " जगन्नाथ तिला हकीगत सांगतां सांगतां म्हणाला होता. " आमच्यांतले कांहीं लोक पूर्वीच धरले गेले होते, त्यांच्यावर खटले झाले होते, त्यांना शिक्षाहि झाल्या होत्या. त्यांच्याकडून जबाब काढण्यासाठीं पोलिसांनीं त्यांचे कसे कसे हाल केले, त्याचीं वर्णनं आम्हीं ऐकलीं होतीं. मोहिते म्हणजे सबंध खात्यांतला सगळ्यांत अधिक दुष्ट माणूस आहे असंहि आम्हीं ऐकलं होतं. पण मी मनाशीं म्हणत होतों, कर माझे हाल वाटेल तेवढे ! तोंडांतून ब्र निघणार

नाहीं माझ्या. पाहूं या झटापटींत तूं हरतोस कीं मी हरतों तें. परंतु ही माझी ऐट तो टेकीला आणील ही कल्पना नव्हती मला..."

जगन्नाथनं आपल्या हालांचं वर्णन केलं तें एखाद्या यमपुरींतल्या प्रकारासारखं उषाला वाटलं होतं. तें ऐकतांना तिनं आपले दांत अगदीं गच्च आवळून धरले होते, वाताचा झटका आल्याप्रमाणें तिच्या मुठी वळलेल्या राहिल्या होत्या. "पुरे पुरे, मला अगदीं ऐकवत नाहीं," असं म्हणावंसं तिला सारखं वाटत होतं. पण कांहीं केल्या तिच्या दांत-खिळींतून शब्द बाहेर पडला नव्हता.

"गंमत अशी आहे," जगन्नाथ बोलत राहिला होता, "या हालांची कोणतीहि खूण माझ्या अंगावर दिसायची नाहीं. ज्यांची खूण उरणार नाहीं असे छळाचे प्रकार शोधून काढण्यांत या मोहित्याचा मेंदू मोठा सुपीक आहे. त्याच्या त्या छळाला मी पुरून कसा उरलों, तें मला सांगतां येत नाहीं. कितीहि छळलं तरी माझं तोंड उघडत नाहीं असं पाहिल्या-वर मोहित्यानं माझ्या देखत सांवळ्याला छळायला आरंभ केला. तो मला म्हणे, "या कोंवळ्या पोराचा प्राण शिल्लक ठेवीत नाहीं बघ. त्याची कांहीं दया तुला येत असेल तर मुकाट्यानं साऱ्या गोष्टी सांगून टाक." तें कोंवळं पोर किंकाळ्या फोडूं लागलं कीं मला वाटे स्वतःच्या कानांचे पडदे फोडून टाकावेत. मोहित्यानं त्याच्या छळाचा असा एक भयंकर प्रकार शोधून काढला, कीं त्यामुळें त्या पोराचं पुरुषत्वच नाहींसं व्हावं. चळवळ सुरू व्हायच्या आधींच ज्येष्ठ महिन्यांत त्याचं लग्न झालं होतं. संसारसुखाला तो पोरगा माझ्या डोळ्यांदेखत निकामी झालेला मीं पाहिला...अजून सुद्धां कधीं कधीं मला एकदम त्या पोराची आठवण होते, त्याच्या किंकाळ्या ऐकूं येतात, मी झोंपेंतून जागा होतों!..."

बोलतां बोलतां जगन्नाथनं दोन्ही हातांनीं आपलं कपाळ झांकून घेतलं होतं आणि तो स्तब्ध झाला होता. पण कांहीं वेळानं हात दूर करून तो तिला म्हणाला होता, "मोहित्याकडे पाहिलं कीं वाटे एक झेप घ्यावी अन् त्याची मान मुरगळून टाकावी. फांसावर लटकावं लागलं तरी हरकत नाहीं. मनांतली सारी क्रूरता, प्राण घेण्याची सारी इच्छा उचंबळून

वर येत असे. मीं तसं त्याच वेळीं केलंहि असतं. पण हवा तसा मोका आला नाहीं. तथापि मनांतल्या मनांत मीं निश्चय केला होता कीं कधीं तरी परिस्थिति पालटेल, आम्ही तुरुंगांतून सुटूं, मग बाहेर आल्यावर मोहित्याला गांठून गोळी झाडून त्याला खलास करायचा. पण जेलमधनं बाहेर पडलों आणि पुन्हां गांधीजींचं म्हणणं मानायचं ठरविलं. हिंसा सोडली, घातपाताचा मार्ग टाकला. पण अजून अंतःकरणांत कधीं कधीं आरोळी उठते कीं अरे, तो नरपशु मोहिते अजून जिवंत आहे! ती आरोळी दाबतां दाबतां जीव कासावीस होतो. माझ्या स्वभावांतल्या हिंसा-वृत्तीची उठावणी या मोहित्याची आठवण झाली कीं जितकी होते तितकी दुसरी कशानं होत नाहीं. आणि आमचे जे छळ त्यानें केले त्यांबद्दल रावसाहेब अशी पदवी मिळाली आहे त्याला!"

तो थोडासा थांबला, व मग पुढें म्हणाला, "सगळ्यांत भयंकर चीड या गोष्टीचीच येते. पहा, स्वातंत्र्यासाटीं आम्हीं हाल सोसले, साहसं केलीं. पण या नव्या जमान्यांत आम्ही कुठल्या कुठें गडप झालों. आणि उलट या मोहित्यासारख्या ज्या पोलिस अधिकाऱ्यांनीं आमची स्वातंत्र्याची चळवळ मारण्यासाठीं राक्षसी कृत्यं केलीं, उघड उघड देशद्रोह केला ते जमाना बदलला, प्रांताप्रांतांत कॉंग्रेसचीं सरकारें सत्ता चालवूं लागलीं, तरी आहेत तिथें आहेत. त्यांच्या नोकऱ्या कायम आहेत! त्यांच्या पदव्या ते, मिरविताहेत! काय चमत्कार पहा! सुभाषबाबूंचं सैन्य देशद्रोही ठरलं. त्या सैन्यांतल्या मुख्य अधिकाऱ्यांवर दिल्लीच्या लाल किल्ल्यांत खटले झाले! आणि स्वातंत्र्यासाठीं दिव्य करणाऱ्या देशभक्तांचीं आंतडीं बाहेर काढणारा हा मोहिते आणि याच्यासारखे कित्येक पोलिस अधिकारी आहेत तिथें आहेत. यांच्यावर खटले कां भरावयाचे नाहींत? यांना अंदमानला कां पाठवायचं नाहीं? यांचा देशद्रोह कशासाठीं पोटांत घालायचा? जें स्वातंत्र्य येऊं नये म्हणून या लोकांनीं दुष्टपणाची पराकाष्ठा केली, तें स्वातंत्र्य आल्यावर त्याचा आमच्या बरोबरीनं किंबहुना जास्तच या लोकांनीं उपभोग घ्यायचा? कधीं कधीं वाटतं हें स्वातंत्र्य आहे कीं चेष्टा आहे? कधीं कधीं वाटतं—"

तो एकदम गप्प झाला होता. आणि कांहीं वेळ अगदीं स्तब्ध राहिला होता. पण मग तो एकदम निराळ्याच चर्येनं तिच्याकडे पाहून म्हणाला होता, "पण जाऊं दे या सगळ्या गोष्टी...तुम्ही त्या विसरून जा...आपल्याला मजेंत वेळ घालवायचा आहे ना !"

त्याच्या सांगण्याप्रमाणें ती तेवढ्या वेळापुरत्या त्या गोष्टी विसरून गेलीहि होती. त्याच्या उल्हसित वृत्तीमुळें व खेळकर संभाषणामुळें त्या विसरणं तिला सोपं झालं होतं. परंतु आतां त्याचं सान्निध्य नाहींसं होतांच त्या गोष्टींच्या आठवणी तिच्या मनांत जोरानं येत होत्या. दारावरचा पहारा ढिला झाला कीं चोरट्यांनीं आंत घुसावं त्याप्रमाणें त्या तिच्या मनांत शिरून वावरत होत्या. तिला बसमध्यें बसवून निरोप देऊन तो दूर झाला होता, ती एकटीच होती, यामुळें एक प्रकारची चमत्कारिक पोकळी तिच्या अंतःकरणांत निर्माण झाली होती; आणि वाऱ्याचा झोत पोकळींत शिरावा त्याप्रमाणें जगन्नाथच्या तोंडून त्याच्या हालांची आणि मोहित्याच्या दुष्टपणाची जी हकीगत तिनं ऐकली होती ती तिच्या अंतःकरणांत शिरत होती...बस वेगानं पुढं चालली होती. वादळी वारे चक्राकार गतीनं जागच्या जागींच फिरावेत त्याप्रमाणें आठवणी तिच्या मनांत भिरभिरत होत्या.

त्या दिवशीं रात्रभर तिला नीटशी झोंप लागली नाहीं. आणि नंतर जसजसे दिवस जाऊं लागले, तसतशी तिची खात्री होऊं लागली कीं त्या आठवणी तिच्या मनांतून पुरत्या कधीं नाहींशा होतील हें शक्य नव्हतं. जगन्नाथ जवळ नसला कीं तिला वाटे आपण एकट्या आहों, म्हणून त्या आठवणी आपल्याला येतात; परंतु तो तिच्याजवळ असला कीं ती वरकांती इतर गोष्टींविषयीं त्यांच्याशीं अगर इतरांशीं बोलत राही, परंतु वरचेवर ती हळूंच जगन्नाथकडे नजर टाकून घेई व ती मनाशीं म्हणे, 'यानं किती दुःख सोसलं आहे...' किंबहुना त्याच्या दुःखाविषयींच्या सहानुभूतीची एक चमत्कारिक निरगांठ तिच्या मनांत उत्पन्न झाली. आणि त्या निरगांठीमुळें तिला वाटूं लागलं, या जगन्नाथनं जें दुःख सोसलं त्याचं पारितोषिक ज्यांच्या कैवारानं त्यानं तें सोसलं त्या लोकांनीं कांहीं नीटसं दिलं नाहीं, पण आपण देऊं. आपण त्याच्यावर प्रेम करूं, त्याला सुखी करूं...तो

म्हणाला होता, 'या मोहितेची आठवण झाली कीं मनांतील क्रूरतेची आणि हिंसेची सारी इच्छा उसळून वर येते...' त्याच्या मनांतली ही सुप्त इच्छा घालविली पाहिजे. त्याला सुखी करून आपण ती घालवूं...

स्त्रिया प्रेमांत सांपडल्या कीं ज्या पुरुषावर आपण प्रेम करतों तो अंतर्यामीं कशानं तरी दुःखी आहे असं त्यांना कळून आलं कीं त्या अधिकच प्रेम करूं लागतात. त्या पुरुषाला सुख देण्याची शक्ति फक्त आपल्या प्रीतींत आहे अशी त्यांची कल्पना होते, आणि त्याला आपलं प्रेम अधिकच मुक्त हस्तानं देण्याची इच्छा त्यांना होते. स्त्रीच्या स्वभावांतली सगळ्यांत प्रभावी प्रवृत्ति मातृत्वाची आहे म्हणून असेल कदाचित्, पण तिची प्रीति–इतकेंच नव्हे तर कामातुरता देखील–पुरुषाबद्दलच्या करुणेमुळें चटकन् वाढते खरी. ज्याच्यावर आपलं प्रेम जडलं, तो प्रत्यक्षांत दुःखी नसला तरीदेखील तो आहे अशी कल्पना करून घेऊन स्त्रिया वागतात, आणि स्त्रियांना नादीं लावून फसविणारे लबाड पुरुषदेखील खोट्या थापा देऊन त्यांच्या मनांत आपल्याविषयीं अनुकंपा निर्माण करतात. पुरुषांच्या अंगच्या गुणांबद्दलच्या कौतुकापेक्षां त्यांच्या दुःखाविषयींच्या अनुकंपेनं बायका अधिकच विवश होतात...जगन्नाथच्या अंतःकरणांत खोल कुठें तरी एक असह्य दुःख आहे हें आतां नव्यानं समजल्यावर उषाला तीव्रतेनं वाटूं लागलं कीं हें त्याचं दुःख आपण दूर केलं पाहिजे. आपण त्याच्यावर फार फार प्रेम केलं पाहिजे. त्याचं आपल्यावर प्रेम असो नसो, आपण त्याच्यावर अशी प्रीति केली पाहिजे कीं तिच्यापुढें बाकीच्या साऱ्या गोष्टींचा त्याला विसर पडेल. शक्य तितकं त्याच्या सहवासांत आपण राहिलं पाहिजे. त्याला आपल्यापासून दूर राहूं देतां कामा नये.

यामुळें तारीख २९ जून रोजीं टेलिप्रिंटरवर जेव्हां बातमी आली कीं कॅबिनेट मिशन इंग्लंडला परत जावयासाठीं निघालं, तेव्हां तिला आनंद झाला. 'बरं झालं, आतां जगन्नाथ दिल्लीस जाणार नाहीं!' ती मनाशीं म्हणाली.

गांठीभेटी, मुलाखती, चर्चा, बैठका, हे सारे प्रकार कित्येक दिवस झाल्यानंतर अखेर कॉंग्रेसनं आपला निर्णय तारीख २५ जून रोजीं अध्यक्ष

मौलाना आझाद यांच्याकरवीं मिशनला सादर केला होता, कीं "घटना समिति निर्माण करण्याची कॅबिनेट मिशनची सूचना जरी आम्हांला स्वीकारावीशी वाटली तरी कामचलाऊ मध्यवर्ति मंत्रिमंडळ स्थापण्याच्या बाबतींत आम्हांला सहकार्य देतां येत नाहीं." मुस्लिम लीगनं तर यापूर्वीच नकार दिला होता. त्यामुळें अखेर ज्या हेतूनं मिशन इंग्लंडहून आलं होतं तो साध्य होत नाहीं असं ठरलं होतंच. आणि आतां ही बातमी आली होती कीं कॅबिनेट मिशन आपला चंबूगबाळं आटपून परत निघालं होतं! टेलिप्रिंटरपाशीं उभ्या असलेल्या मूर्तीकडे पाहून जगन्नाथ म्हणाला, "फार वाईट झालं." मूर्तीनं विचारलं, "मग तुझं म्हणणं काय कीं कामचलाऊ सरकार स्थापण्याच्या बाबतींत कॉंग्रेसनं रुकार द्यायला हवा होता?"

जगन्नाथ म्हणाला, "तसं कसं मी म्हणेन? मला हें समजतं कीं ज्यायोगें जीनांचं समाधान होईल अशा योजनेला कॉंग्रेसनं संमति द्यायची म्हणजे कॉंग्रेसची शरणागति झाली असती."

"मग झालं तर. मग मिशन आलं तसं परत गेलं यांत बिघडलं कुठं?"

"बिघडलं असं कीं एकंदर परिस्थिति फार बिकट आहे हें स्पष्ट झालं. जीनांचा अडवणुकीचा धंदा भरभराटीला येणार, मुस्लिम लीग म्हणेल त्याच दिशेनं हिंदी राजकारणाला वळण लागेल हें सिद्ध झालं. स्वातंत्र्य आणखी शांतता या दोन्ही गोष्टी आपण एकदम मिळवूं शकूं हा भ्रम कॉंग्रेसच्या लोकांना आतां सोडावा लागेल. गांधीजी आणि कॉंग्रेसचे इतर पुढारी यांच्यांतलं अंतर आतां वाढेल. हीं लक्षणं कांहीं चांगलीं नाहींत..."

जगन्नाथ अगदीं आवेगानं बोलत होता. त्याची चर्या कष्टी दिसत होती. परंतु उषाला दुःख होत नव्हतं. देशाच्या राजकारणापेक्षां स्वतःचं वैयक्तिक सुखदुःख तिला या क्षणीं अधिक महत्त्वाचं वाटत होतं. कॅबिनेट मिशन गेलं ही राजकारणाची बातमी तिला वाटतच नव्हती. जगन्नाथच्या दिल्लीच्या फेऱ्यांचं निमित्त नाहींसं झालं एवढाच त्या बातमीचा अर्थ तिला समजत होता. ती ऐकून तिला आनंद झाला होता. ती मनाशीं म्हणत होती आतां जगन्नाथ दूर जाणार नाहीं. तो माझ्याजवळ राहील. त्याच्या दुःखाचा विसर त्याला पडावा इतक्या आनंदांत मी त्याला ठेवीन...

नंतरच्या दिवसांत ती याप्रमाणें खरोखर वागली. जगन्नाथाची आणि तिची निवांत भेट बहुधा रोज होत होती. त्याचं आपल्यावर खरोखर किती प्रेम आहे हें अजमावून पाहाण्याचा चाळा तिनं आतां सोडून दिला होता. कारण तिच्या मनानं आतां असं ठरविलं होतं, कीं त्याचं आपल्यावर प्रेम असो अगर नसो, त्याचा उल्हास वाढावा अशा प्रकारें त्याच्याशीं वागणं एवढंच आपलं काम आहे. आपलं प्रेम त्याला स्पष्ट शब्दांत सांगावं असं तिला पूर्वी कित्येकदां वाटलं होतं, पण आतां वाटेनासं झालं होतं. तो तिच्याशीं अगदीं उत्साहानं बोले. तिनं आपल्या बरोबर असावं अशी त्याची इच्छा असल्याप्रमाणें कामासाठीं बाहेर जातांनादेखील "येतां का माझ्या बरोबर ? सवड आहे ना ?" असं तिला विचारी. यांतच तिला हवा तो आनंद पुरेसा मिळत होता.

कॅबिनेट मिशन निघून गेलं याचा अर्थ हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याचा प्रश्न कायमचा मागं पडला असा थोडाच होता ? तो पुन्हां कोणत्या तरी स्वरूपांत उकरून काढल्यावांचून व्हाइसरॉयला गत्यंतरच नव्हतं. आणि कॉंग्रेस व मुस्लिम लीग हे दोन पक्षहि कामचलाऊ सरकार अस्तित्वांत येत नाहीं तर नाहीं असं म्हणून कायमचे घरोघर स्वस्थ थोडेच बसणार होते ? मिशन गेलं तरी राजकारणाचीं चक्रं बंद न पडतां पुन्हां हलके हलके हालूं लागतील ही गोष्ट उघडच होती.

या गोष्टी जगन्नाथ तिला सांगूं लागला कीं उषा म्हणे, "म्हणजे तुम्ही पुन्हां दिल्लीस जाणार असं म्हणा ना ?"

तो विचारी "माझ्या जाण्यावर तुमचा एवढा कटाक्ष कां ?"

मनांतलं खरं उत्तर लपविणं उषाला अवघड जात असे. एकदां ती त्याला म्हणाली, "कटाक्ष अशासाठीं कीं तुम्ही नेहमीं एकटे जातां. आतां पुन्हां जर दिल्लीला एकटे गेलांत तर बघा. इथलं कचेरींतलं काम आतां मला उत्तम येऊं लागलं आहे. कांहीं नव्या गोष्टी मला शिकवा कीं. गांधी, नेहरू अशांच्या गांठीभेटी कशा घ्याव्यात, त्यांच्या गोटांतल्या बातम्या कशा काढाव्यात, याची मला माहिती करून द्या कीं." तिनं पाहिलं तों तो तिच्याकडे बघण्याऐवजीं अंतराळांत कुठें तरी नजर लावून बसला होता.

तिनं म्हटलं, " ऐकलंत ना ? पुन्हां दिल्लीस एकटं जातां कामा नये. मला न्यायला हवं. बोला ना ! कसल्या विचारांत गढलां आहांत ?"

तो गंभीर चर्येनं म्हणाला, " फार चमत्कारिक विचारांत. त्याचा राजकारणाशीं कांहींच संबध नाहीं."

" मग कसल्या विचारांत ?"

" माझ्या स्वतःबद्दलच्या."

" मला सांगा ना."

एखाद्या पुस्तकांतला मजकूर वाचल्यासारख्या सुरांत तो म्हणाला, " आतांशा माझ्या मनांत वरचेवर असं येतं कीं गांधीजींना भेटावं, आणखी मोहितेची सारी हकीगत त्यांना सांगावी. हत्येचा आणि हिंसेचा विचार कधीं कधीं मनांत कसा अनावर होतो, त्याची कबुली त्यांच्याजवळ द्यावी आणखी या रोगावर त्याच्याजवळ औषध मागावं. मला वाटलं होतं मोहित्याचा सूड घेण्याची माझी इच्छा मीं जिंकली. पण त्या दिवशीं आपण हॉटेलांत गेलो तिथे तो भेटला, तेव्हांपासून त्या इच्छेनं माझ्या मनांत पुन्हां डोकं वर काढलंय. त्याचा जो राक्षसी दुष्टपणा मीं सोसला अन् सांवळ्यानं सोसलेला पाहिला, त्याच्या आठवणी पुन्हां जाग्या झाल्या आहेत. तुम्हांला मीं कधीं सांगितलं नाहीं, पण आतांशा माझी झोंप उडाली आहे. हत्येच्या इच्छेनं अंतःकरण भरलेलं आहे. माझ्या या रोगावर औषध देणारे एकटे गांधीजी आहेत. वाटतं, कीं त्यांना भेटावं..."

तो अशा प्रकारें बोलत होता कीं जणु ती जवळ बसली आहे याचं भान त्याला नव्हतंच. काय बोलावं तें उषाला सुचेना. ती गप्प राहिली. पण मग तोच म्हणाला, " पण हा विषय कशाला निघाला आपल्यामध्यें ? मीं दिल्लीस जाऊं नये असं तुम्हांला वाटतं ना ? इतक्यांत तरी जात नाहीं एवढं खास. कारण कॉंग्रेसचं राजकारण आतां नजीकच्या दिवसांत दिल्लींतून उठून इथें मुंबईत येणार आहे."

" म्हणजे काय ?"

" कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीनं दिल्लीस ज्या गोष्टी ठरविल्या, त्यावर ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचं शिक्कामोर्तब व्हायला हवं ना ? त्यासाठीं

ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा मुंबईत होईल. सभेची तारीख एक दोन दिवसांत नक्की कळेल आपल्याला. ”

त्याच्या वृत्तीची मघांची लकेर घालविण्यासाठीं ती म्हणाली, “ असं ? मग एक वचन तुम्हीं मला दिलं पाहिजे. ”

तो हंसला व म्हणाला, “ दिल्लीस इतक्यांत जात नाहीं हें वचन तर आपोआप दिल्यासारखंच आहे. ”

ती म्हणाली, “ वा ! तें काय तुम्हीं दिलंत वाटतं ? परिस्थितीनं दिलं. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा मुंबईत भरावी हें काय माझ्यासाठीं तुम्हीं ठरविलंत ? ”

त्या बोलण्याचं त्याला हंसू आलं. त्यानं विचारलं, “ मग मी कोणतं वचन देऊं ? ”

“ ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा मुंबईत होईल, तेव्हां तुमच्याबरोबर मला हिंडूं दिलं पाहिजे तुम्हीं. सारे मोटमोठे पुढारी मला जवळनं पहायचेत. ”

“ कबूल. ”

तिला आनंद झाला. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा जुलैच्या सहा तारखेला ठरली, तेव्हां ती जगन्नाथाला म्हणाली, “ बघा हं, आपलं वचन लक्षांत ठेवा. ”

तो म्हणाला, “ माझ्या लक्षांत आहे. तुम्ही खादीच्या साड्या भरपूर विकत घेऊन ठेवा म्हणजे झालं. ”

सहा जुलैची ती उत्कंटेनं वाट पाहूं लागली.

पावसाळा जोरात सुरू झाला तेव्हां तिला वाटलं, इतके दिवस लांबला होता तो आणखी कां नाहीं थोडे दिवस थांबला ? तारीख चार जुलैपासून तर पावसानं अशी झोड धरली कीं त्याला घटकाभर खळ पडेना. ऑफिसांत जातांना आणि येतांना तिच्या दृष्टीस जिकडे तिकडे चिंब भिजलेल्या गाड्या आणि न्हाऊन निघालेलीं माणसं दिसत ! ‘ नव्या छत्र्यांचा जगी स्टॉक ’ अशा पाट्या दुकानांवर लागलेल्या होत्या. परंतु फार थोड्या माणसांच्या

हातांत छत्र्या दिसत असत. कारण साध्या छत्रीची किंमत वीस रुपयांपर्यंत चढली होती. तांदूळ, गहूं, साखर, दूध इत्यादि पदार्थ वर्ज्य मानायला जसे लोक शिकले होते, तसेच छत्रीवांचून रस्त्यानं भिजत चालायलाहि शिकले होते. भाजीवाले, गाडीवाले, हमाल, मजूर, कारकून अशांचे थवेच्या थवे भिजत, कुडकुडत हिंडतांना तिच्या दृष्टीस पडत. ट्रॅमच्या आणि बसच्या नाक्यानाक्यांवर उभ्या राहणाऱ्या माणसांच्या रांगा खुशाल अंगावर पावसाच्या सरी घेत उभ्या राहिलेल्या तिला दिसत. तिच्या मनांत येई, या लोकांची दुरवस्था केव्हां संपणार आहे? ती संपावी यासाठीं तरी स्वातंत्र्य लौकर यायला हवं! पण त्या स्वातंत्र्याच्या मार्गांत किती विघ्नं होतीं? आणि तीं विघ्नं कोण कशीं दूर करणार होता?...

या विचारांनीं ती खिन्न होत असे. मग तिला वाटे, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत काय होतं, बघूं या.

या सभेला गांधीजी हजर राहिले. आपल्या भाषणांत ते म्हणाले, "मला चहूंकडे अंधार दिसतो!" त्यांचा तो उद्गार ऐकल्याबरोबर उषाच्या अंगावर शहारे उभे राहिले. त्या दिवशीं सकाळींच जगन्नाथ-बरोबर ती कॉंग्रेस पुढाऱ्यांच्या गोटांत जाऊन आली होती. सगळ्या मोठ-मोठ्या पुढाऱ्यांना तिनं जवळून पाहून घेतलं होतं. ज्यांचे केस पांढरे होऊं लागले होते, ज्यांची सुदृढ उंचसर अंगकाठी कांहींशी वाकल्याचा भास होत होता असे तेजस्वी अंगकांतीचे व सुंदर नाकाडोळ्याचे पंडित जवाहरलाल; कांहींसे ठेंगणे, शाल पांघरलेले, राकट भासणारे, उग्र चर्येचे वल्लभभाई पटेल; देहाचं स्थूलत्व न जुमानतां एखाद्या अवखळ किशोरीप्रमाणें हाल-चाल करणाऱ्या, शुभ्र केसांच्या आणि गोऱ्या चेहऱ्याच्या, आपल्या मत्स्याकृति डोळ्यांच्या नजरेनं, हास्यानं आणि सतत विनोदानं उल्हास पसरविणाऱ्या सरोजिनी नायडू; आणि या सर्वांच्या घोळक्यांत एखाद्या अधिष्ठात्री देवतेप्रमाणं पाय दुमडून डावा तळवा टेकून शुभ्र गादीवर बसलेले गांधीजी; साऱ्या थोर थोर व्यक्ती तिनं जवळून पाहिल्या होत्या. त्या वेळीं तिला वाटलं होतं, किती आनंदांत आहेत हीं सारी मंडळी! आणि आतां गांधीजी म्हणत होते, "मला चहूंकडे अंधार दिसतो आहे!"

कांहींशा गंभीर आवाजांतले त्यांचे ते शब्द ऐकतांच तिच्या अंगावर रोमांच उठले.

ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या त्या सभेनं दिल्लीस घेतलेला निर्णय दोनशें चार विरुद्ध एकावन्न मतांनीं मंजूर केला. कॉंग्रेसच्या मनाजोगं कामचलाऊ सरकार स्थापन झाल्याखेरीज कॉंग्रेस स्वातंत्र्याचा स्वीकार करील असा संभव दूर गेला.

मुस्लिम लीगच्या कौन्सिलची सभाहि वीस दिवसांनीं झाली. या सभेलाहि वृत्तपत्र–प्रतिनिधि म्हणून उषा जगन्नाथबरोबर हजर राहिली. आणि त्या सभेंतला एकंदर नूर पाहून जगन्नाथ जी गोष्ट तिला नेहमीं सांगत असे तिचा पडताळा तिला मिळाला. आपण अडवणुकीची कमाल केली कीं आपण जें म्हणूं तें आपल्या पदरांत पडेल या वृत्तीनें मुस्लिम लीगच्या साऱ्या पुढाऱ्यांना झपाटलेलं होतं. या सभेंत जीनांनीं व्हाइसरॉयवर तोंडसुख घ्यायला कमी केलं नाहीं. त्यांचा आरोप असा कीं कॉंग्रेसला खुष करण्यासाठीं व्हाइसरॉयनीं मुस्लिम लीगचा विश्वासघात केला होता, आपल्या वचनांना हरताळ फांसला होता. मुस्लिम लीगच्या या सभेंत असा ठराव पास करण्यांत आला, कीं मुस्लिम जमातीचं समाधान लौकर न झालं तर सबंध देशभर मुसलमानांनीं तारीख १६ ऑगस्टचा दिवस नुसता हरताळ म्हणून नव्हे, तर 'प्रत्यक्ष उठावा'चा दिवस म्हणून पाळावा.

या सभेहून परतल्यावर जगन्नाथ उषाला म्हणाला, "लक्षणं वाईट दिसतात असं मी कां म्हणतों तुम्हांला आतां कळलं काय?"

उषानं नुसती मान हालविली. ज्या सभांतून राजकारण शिजून बाहेर पडतं अशा सभा तिनं प्रथमच प्रत्यक्ष पाहिल्या होत्या. मुस्लिम लीगच्या कौन्सिलची ती सभा म्हणजे सुविचार सर्वस्वी सोडलेल्या, झिंगलेल्या लोकांची सभा तिला वाटली होती. तिनं जगन्नाथला हलकेच विचारलं, "सोळा ऑगस्टला उठावाचा दिवस पाळणार म्हणजे काय करणार आहेत हे लोक?"

"सुरामारी, हत्या, रक्तपात" जगन्नाथ म्हणाला, "आणि चमत्कार असा, कीं या उठावाचा दिवस हे लोक सरळ सरळ जाहीर करूं शकतात."

ती म्हणाली, "मग आतां पुढें ?"

"बघूं या काय काय होतं तें." जगन्नाथ म्हणाला. "आतां एकच मार्ग मला दिसतो तो हा, कीं व्हाइसरॉयनीं जर कॉंग्रेसला म्हटलं 'तुम्ही मंत्रिमंडळ बनवा', तर नेहरूंनीं जीनांच्या या धमक्यांना भीक न घालतां म्हणावं, 'ठीक आहे, बनवितों.' किती दिवस जीनांच्या सहकार्याची भीक मागायची ! किती दिवस त्यांच्या रुसव्याची डर बाळगायची ?"

तीं दोघं रस्त्यानं पायींच चाललीं होतीं. सभेंतून सुटलेल्या लोकांची गर्दी त्यांच्या उजव्या डाव्या अंगांनीं पुढं पुढें सरकत होती. बऱ्या लोकांच्या मोटारी हॉर्न जोरजोरानं वाजवीत, वाट काढीत, केव्हांच निघून गेल्या होत्या. परंतु अजूनहि एखाद दुसरी मोटार पाठीमागून येत होती, आणि ती आली कीं पाण्याचा लोंढा कापला जावा त्याप्रमाणें लोकांची थाप दुभंगत होती. 'पाकिस्तान झिंदाबाद' अशा ज्या आरोळ्या सभेच्या ठिकाणीं उठल्या होत्या त्यांच्या नशेंतच परतलेले हे हजारों लोक चालले आहेत असा भास उषाला होत होता. त्या लोकांच्या लांब लांब टांगा टाकून चालण्याच्या तऱ्हेंत, त्यांच्या नजरेंत, एकमेकांशीं त्यांचीं उंच आवाजांत बोलणीं चाललीं होतीं त्या बोलण्यांत एक प्रकारची मस्ती, दंगा माजविण्याची घाई असल्यासारखं तिला वाटत होतं. ज्या भागांतून तीं दोघं चाललीं होतीं त्या भागांत बहुतांशीं मुसलमानांची वस्ती होती. दुतर्फाचीं हॉटेलहि मुसलमानी होतीं. सभेंतून सुटलेले पुष्कळसे लोक या दुकानांत शिरत होते. तीं सारीं हॉटेलं अगदीं खचून गजबजून गेलीं होतीं आणि त्या हॉटेलांत उडालेली धांदल आणि माजलेली गजबज केवळ खाण्यापिण्यासाठीं जमा झालेल्या गिऱ्हाइकांची नव्हे, तर खोट्या धर्मवेडानं चेकाळून कसला तरी उठाव करण्याचं ज्यांनीं ठरविलं आहे अशा एकत्र आलेल्या पिसाटांचीं वाटत होती.

भोंवतालचं तें दृश्य पाहून उषाला एक प्रकारचं भय वाटलं. जगन्नाथ-बरोबर ती अगदीं मुकाट्यानं पावलं टाकीत होती. मध्येंच त्यानं तिला विचारलं, "कांहीं घेणार का तुम्ही ?". खरं म्हणजे तिला केव्हांपासून तरी तहान लागली होती. परंतु या वस्तींतल्या हॉटेलांत शिरण्याची तिची

इच्छा नव्हती. ती म्हणाली, " नको. जरा भराभर चालून आपण हा रस्ता ओलांडून बसच्या नाक्यावर जाऊं या. " तिच्या चर्येवरून तिच्या मनांतले विचार ओळखल्याप्रमाणें जगन्नाथनं तिच्याकडे पाहिलं. तो थोडासा हंसला. त्यानं आपल्या मनांतले विचार ओळखले हें तिच्याहि लक्षांत आलं. ती हंसून म्हणाली,

" कधीं कधीं माझ्या मनांत काय येतं सांगूं ? "

त्यानं चालतां चालतां मान वळवली. ' काय ' अशा अर्थी तिच्याकडे नजर टाकली.

ती म्हणाली, " ज्या या धंद्यांत राजकारणाचा सतत ध्यास धरावा लागतो त्या वर्तमानपत्राच्या धंद्याचा एखादे वेळेस वीट येतो. ते सुरैया मला कदाचित् चेष्टेनं म्हणाले असतील, पण त्यांच्या शब्दांची मला आठवण होते. "

" काय म्हणाले ते ? "

" ते म्हणाले, तुम्ही कशाला या व्यवसायांत पडलात ? सोडा. "

" मग ऐका कीं त्यांचा सल्ला. सोडून द्या हें काम. "

" सोडून द्यावंसं नाहीं वाटत. " ती म्हणाली, " या कामांत माझं मन रमलं आहे. पण कधीं कधीं वाटतं, तुम्ही आणखी मी इतकीं एकत्र असतों, पण राजकारणाखेरीज इतर विषय किती क्वचित् बोलतों आपण ! सदा मिशन काय करतं आहे अन् कॉंग्रेस काय करते आहे अन् जीनांची लीग—" पुढचा शब्द उच्चारण्याऐवजीं तिनं फक्त मान झटकली व म्हटलं, " नेहमीं या असल्या गोष्टी तुम्हीं सांगायच्या अन् मीं ऐकायच्या. जणुं तुम्हांला न् मला गंमतीचं खाजगी आयुष्य नाहींच. "

जणुं तिच्या मनाच्या ज्या बाजूची त्याला कल्पना नव्हती अशी एक बाजू प्रथमच दिसल्याप्रमाणें जगन्नाथ म्हणाला, " हो, असं होतं खरं. पण त्याला काय इलाज ? "

ती म्हणाली, " इलाज आहे. करायचा म्हटलं तर आहे. "

त्यानं पुन्हां फक्त प्रश्नार्थक चर्या केली.

ती म्हणाली, "तुम्हीं शपथ घ्यायची कीं एक दिवस राजकारणाचं एक अक्षरदेखील न काढतां खूप गप्पा मारायच्या."

तो हंसला व म्हणाला, "कांहीं वाईट नाहीं कल्पना. एक दिवस राजकारणाचा उपास करायचा म्हणाना?"

तिला हंसू आलं, "मग केव्हां करतां उपास, बोला. परवां रविवार आहे."

"कांहीं हरकत नाहीं."

तितक्यांत बस आली. टप्प्यावर खूप गर्दी होती. पुढें घुसून जागा मिळवणं आवश्यक होतं. "हं. चढा चढा." असं म्हणत त्यानं तिला ढकललं व तोहि तिच्या मागोमाग चढला. वरच्या मजल्यावर त्यांना दोन जागा मिळाल्या, पण त्या दूर दूर होत्या. तिला एकटीला बसावं लागलं. तिच्या शेजारीं एक राकट दांडगा मुसलमान बसला होता. बहुतेक सारीं बाकं मुसलमानांनींच व्यापलीं होतीं. उषाच्या मनांत आलं, पाकिस्तानांतून प्रवास होतो आहे म्हणायचा! पण त्या विचारांत कटुता नव्हती. उलट ती स्वत:शीं हंसली. तिनं दूर बसलेल्या जगन्नाथकडे नजर टाकली. दृष्टादृष्ट होतांच तोहि हंसला. तिला फार बरं वाटलं. आपलं आणि जगन्नाथचं खाजगी आयुष्य राजकारणांत बुडूं न देतां वांचविण्याची तिची इच्छा तिला पुरी करतां आली होती. 'परवां रविवार'—तिच्या मनांत सारखं येत होतं.

शनिवारीं रात्रीं तिच्या खोलीवर एक अनोळखी तरुण इसम आला आणि म्हणाला, "तुमच्या आईनीं हें तुमच्याकडं पोंचवायला सांगितलं आहे." तिनं त्याच्या हातांतला डबा ठेवून घेतला व तो गेल्यानंतर उघडून पाहिला. पुरणाच्या पोळ्या, बटाट्याची भाजी, भजीं असे पदार्थ डब्यांत होते.

दुसऱ्या दिवशीं ती जगन्नाथच्या खोलीवर गेली व म्हणाली, "आज उपास आहे. लक्षांत आहे ना?"

तो म्हणाला, "लक्षांत आहे. आज राजकारणाबद्दल अक्षरसुद्धां तोंडांतून बाहेर काढायचं नाहीं."

" आपल्या उपासासाठीं आईनं बघा काय पाठविलंय !" तिनं डबा दाखविला.

" काय ? "

" पुरणाच्या पोळया. "

" पुन्हां ? सरनीं एकदां आणल्याच होत्या कीं. "

" पण तुम्हांला त्या फार आवडतात हें माझ्या आईला माहीत झालंय ना ? ती आतां वरचेवर अशाच पाठवणार. हं चला, कपडे करा. आटपा. इथं खोलींत बसून नाहीं कांहीं खायच्या पोळया. "

" मग ? "

" दूर कुठें तरी जायचं. "

" कुठें ? "

" कुठें म्हणाल तिथें. झाडाखालीं निवांत बसायचं. साध्यासुध्या गप्पा मारायच्या. "

" असं काय ? " त्यानं शर्ट बदलला, कोट अंगांत चढवला. त्याची टोपी झटकन् साफ करून तिनं त्याच्या डोक्यावर तिरपी ठेवली.

तो आरशांत पाहून म्हणाला, " छे ! अशी तिरपी घालतों काय मी कधीं टोपी ? " तो ती सरळ करूं लागला.

त्याचे हात दूर करून ती म्हणाली, " राहूं द्या तिरपीच. निदान आतांच्या वेळेस. अशीच चांगली दिसते तुम्हांला. "

तो म्हणाला, " चांगलं दिसणं म्हणजे काय भानगड आहे ? "

ती हंसली व म्हणाली, " तुम्हांला नाहीं कळायचं. तुम्ही चला आपले. "

जिन्याच्या पायऱ्या उतरतांना त्यानं तिला विचारलं, " सर आतां पुन्हां केव्हां येणार इकडे ? " पण तिनं उत्तर दिलं नाहीं. त्याचा प्रश्न तिनं ऐकलाहि नव्हता. ती आपल्याच आनंदाच्या तंद्रींत होती.

—*—

# प्रकरण सातवं



तें पत्र उषाच्या मांडीवर पडलं होतं. ती समोर अंतराळांत कुठें तरी बघत होती. तिची नजर शून्य होती. खिडकीबाहेरच्या इमारती व त्यामागचं ढगांनीं काळवंडलेलं आभाळ तिला दिसत नव्हतं. जें पत्र तिनं मांडीवर पडू दिलं होतं, त्यांतला मजकूर तिच्या डोळ्यांपुढें पुनःपुन्हा उभा राहात होता. अशा मजकुराचं पत्र जगन्नाथकडून येईल अशी तिची कल्पना नव्हती. तो असं कांहीं करील हें स्वप्नांतदेखील खरं वाटलं नसतं. शून्य नजरेनं पहात बधिर अंतःकरणानं ती किती तरी वेळ तशीच बसली होती. तिच्या मनांत वरचेवर एकच केविलवाणा उद्‌गार उठत होता, " असं कांहीं करायचं ठरविण्यापूर्वीं मला विचारायचं तरी होतं ! "... परंतु या उद्‌गाराचा आतां काय उपयोग होता ? जगन्नाथ वेड्यासारखा कलकत्त्याकडे निघून गेला होता ! कलकत्त्याकडे ! जिथें जातीय दंगलीला विक्राळ स्वरूप आलं होतं ! जिथें प्राणांचा भरंवसा नव्हता ! जगन्नाथ दिल्लीहून इकडे परत मुंबईस येईल अशा आशेनं ती वाट पहात बसली होती. आणि आतां त्यानं लिहिलं होतं, " महात्माजींच्या सांगण्यावरून मी कलकत्त्यास जात आहें... " त्याचं तें पत्र वाचल्यापासून ती एखाद्या भ्रमिष्टासारखी जागच्या जागीं बसून राहिली होती.

ती ऑफिसांत गेली, पण तिचं कामाकडे लक्ष लागेना. टाक उचलून कागदाला लावावा असं तिला वाटेना. "...मी कलकत्त्यास जात आहे..." हें जगन्नाथच्या पत्रांतलं वाक्य तिला पुनःपुन्हां आठवत होतं. जणु तें वाक्य म्हणजे एक कूटप्रश्न होता व त्याची संगति तिला कांहीं केल्या लावतां येत नव्हती. पुढच्या कागदावर तिनं तें वाक्य दोनदां लिहिलं व त्याकडे ती बघत राहिली. मग तिनं तो कागद चुरगळला व टेबलाखालच्या टोपलींत टाकून दिला...कांहीं वेळानं ती आपल्या जागेवरून

उठली आणि टेलिप्रिंटरपुढें जाऊन उभी राहिली. बातम्यांची पट्टी तिनं उचलून पाहिली तों कलकत्त्यास घडणाऱ्या अत्याचारांची बातमी आलेली तिला दिसली. स्वामी तिच्याजवळ आला आणि म्हणाला, " साहेबांनीं तुम्हांला जरा बोलावलं आहे." ती मूर्तीच्या खोलींत गेली. तिला पाहिल्याबरोबर आधींच वाचून टेबलावर ठेवलेलं एक पत्र त्यानं डाव्या हाताच्या बोटांनीं पुढं सरकविलं, व म्हटलं, " याचा अर्थ काय समजायचा ?"

तिनं तें उचललं व उघडून वाचलं. तें जगन्नाथचं असलं पाहिजे हें तिनं आधींच ओळखलं होतं. त्यानं लिहिलं होतं,

" तारीख २ सप्टेंबर रोजीं नेहरूंचं सरकार अस्तित्वांत आलं, त्याबद्दलची सविस्तर तार मीं पाठविली ती पोंचलीच असेल. माझा लेखहि. तारीख ७ रोजीं नेहरूंचं रेडियोवर भाषण होणार आहे. पण त्या वेळेस मी इथें नसेन. कारण मी आजच कलकत्त्यास जात आहे. वृत्तपत्रकार म्हणून मी जात नाहीं, अगदीं निराळ्या नात्यानं जातों आहे. गांधीजींनीं परवांच्या आपल्या प्रार्थनेच्या सभेंत सांगितलं, कीं ज्याला म्हणून आपला देश वांचवायचा आहे त्यानं या घटकेला बंगालमध्यें जाऊन तिथें उसळलेला दंगा थांबविला पाहिजे. लोकांचीं माथीं भडकलीं आहेत, तीं शांत केलीं पाहिजेत. गांधींचे आशीर्वाद घेऊन तेरा लोक इथून कलकत्त्यास जायला निघाले आहेत. त्यांतला एक मी आहें. मला देश तर वांचवायचा आहेच. पण माझा आत्माहि वांचवायचा आहे. म्हणून मी जातों आहे. माझ्या या लिहिण्याचा अर्थ कदाचित् तुला कळणार नाहीं. सुखरूप परत आलों आणि तुला भेटलों तर सांगेन. सध्यां कांहीं दिवस मीं तुझ्याकडून रजा घेतली आहे असं समज. कलकत्त्यास गेल्यावर सवड झाली तर पत्र लिहीन."

उषानं तें पत्र पुन्हां एकदां वाचलं आणि मग तें परत टेबलावर ठेवून ती गप्प राहिली. मूर्ति पुन्हां म्हणाला, " याचा अर्थ काय ?" पण ती कांहीं बोलली नाहीं. त्याचा अर्थ तिलाच कळत नव्हता, तर ती त्याला काय सांगणार !

मग मूर्ति म्हणाला, " दिल्लीस जातांना त्याच्या बोलण्यावरून तो असं कांहीं करील अशी शंकादेखील मला आली नव्हती. तारीख २ सप्टेंबर रोजीं अस्तित्वांत येणाऱ्या नेहरू सरकारविषयीं नापसंती दाखविण्यासाठीं मुसलमानांनीं देशांत जिकडे तिकडे काळीं निशाणं उभारावींत असा आदेश जीनांनीं दिला होता. केवळ काळ्या निशाणांवर निषेध थांबणार नाहीं हें कुणालाहि ओळखतां येण्यासारखं होतं. ऑगस्टच्या १६ तारखेस देशांत कोणकोणते प्रकार घडले ते लोकांनीं पाहिले होते. पण बंगाल्यांत सरसहा कत्तल सुरू होईल अशी कुणाची कल्पना नव्हती. जगन्नाथ मला पुनःपुन्हां एवढंच म्हणे कीं मुस्लिम लीगनं सरळ अंतर्गत युद्धाची तयारी केलेली आहे. पण तो असंहि म्हणे, कीं या युद्धाला ते तोंड लावतील असं मात्र वाटत नाहीं. आणि हाहाःकार सुरू झालाच तर आपण तिकडे धांव घेऊं असं तर तो कधींदेखील म्हणाला नव्हता. आणि आतां हा एकदम कलकत्त्याकडे निघून जातो, याचा अर्थ काय?..."

उषा त्याच्याकडे पहात नव्हती. तिनं खालीं जमिनीकडे नजर लावली होती; परंतु त्याच्या बोलण्यावरून तिला कळत होतं, कीं जगन्नाथ कलकत्त्यास निघून गेला याचं तिच्याइतकंच त्याला आश्चर्य आणि दुःख वाटत होतं. तो असा जाईल अशी त्यालाहि कल्पना नव्हती. तिला तर मुळींच नव्हती. तिला उलट वाटलं होतं, दिल्लीचं काम आटोपल्याबरोबर तो एका दिवसाचाहि उशीर न करतां परत येईल...गेल्या कांहीं दिवसांत तिचीं व त्याचीं जीं बोलणीं झालीं होतीं, त्यांची आठवण आज सकाळीं ते पत्र आल्यापासून तिनं अगणित वेळां करून पाहिली होती. आतां पुन्हां पाहिली.

ज्या दिवशीं तो आणि ती मिळून वनभोजनासाठीं दूर गेलीं होतीं आणि तिच्या आईनं पाठविलेल्या जेवणाचा समाचार त्यांनीं घेतला होता, त्या दिवशीं तर त्यानं राजकारणाचा विषय न काढण्याचं वचन पाळलं होतंच; पण त्यानंतरच्या दिवसांतहि राजकारणांतल्या एखाद्या नव्या घटनेची बातमी सांगून तिच्याबद्दल बोलतां बोलतां तो एकदम थांबे व उषाकडे हंसत पाहून म्हणे, " अरे, पण मी विसरलों. राजकारणाचा विषय तुमच्या न् माझ्या आवडीचा असला तरी त्याव्यतिरिक्त

आपलं खाजगी म्हणून कांहीं आयुष्य आहे हें लक्षांत ठेवायला तुम्हीं मला सांगितलंय, नाहीं का ? हें असं विसरायला होतं पहा. माझ्या अंगचा हा दुर्गुण कधीं जाईल कीं नाहीं कुणास ठाऊक ! ”

ती म्हणाली होती, “ जाईल ! तुम्हांला विसर पडतो असं वाटलं, कीं मी आठवण करीत जाईन म्हणजे झालं. ”

तो म्हणाला होता, “ हं, मग आशेला थोडीशी जागा आहे. पण यांतहि पुन्हां एक अडचण आहे. ”

“ काय ? ”

“ मला इशारा द्यायला तुम्ही माझ्याजवळ नेहमीं असालच याचा काय भरंवसा ? ”

“ त्याची काळजी मी घेईन. तुम्हांला नको चिंता. ”

हें ऐकून तो हंसला होता. ज्या अर्थानं ती बोलली होती तो मान्य करून तो हंसला अशी तिला खात्री वाटली नव्हती. परंतु ज्या वृत्तीन तो तिच्याशीं बोलत होता व ज्या तत्परतेनं ‘ तुमचं माझं खाजगी आयुष्य ’ असे तिनं प्रथम म्हटलेले शब्द उच्चारीत होता ती पाहून तिच्या मनाला हवं तें समाधान पुष्कळ मिळालं होतं. असेच कांहीं दिवस गेले तर एक दिवस आपल्या मनांतली गोष्ट आपण त्याला स्पष्ट सांगूं शकूं असं तिला वाटलं होतं...

तारीख २७ जुलै रोजीं मुस्लिम लीगच्या कौन्सिलच्या सभेला त्याच्या-बरोबर ती हजर राहिली होती. त्यानंतर चारपांच दिवसांनींच तो तिला म्हणाला होता, “ मध्यवर्ति सरकार स्थापन करण्याच्या खटपटी थांबायच्या नाहींत असं मी तुम्हांला म्हटलं होतं ना ? त्याप्रमाणें घडायला लागलंय. ”

ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक तारीख ६ जुलै रोजीं झाल्यावर तारीख २७ जुलै रोजीं भरणाऱ्या मुस्लिम लीगच्या कौन्सिलच्या सभेंत कोणता ठराव होतो त्याची वाट लॉर्ड वेव्हेलनं पाहिली नव्हती. नेहरू आणि जीना यांनीं मिळून मध्यवर्ति मंत्रिमंडळ बनवावं असं आमंत्रण तारीख २२ जुलै रोजींच त्यानं उभयतांना पाठविलं होतं. जीनांनीं तारीख ३० जुलै रोजीं या आमंत्रणाला नकार दिला. मग वेव्हेलनं जीनांचा नाद

सोडून दिला आणि मंत्रिमंडळ बनविण्याची विनंति एकट्या नेहरूंना केली. नेहरू ताबडतोब जीनांची भेट घेण्यासाठीं मुंबईस आले. परंतु जीनांनीं त्यांना पुन्हां नकार दिला. मग नेहरूंनीं बारा लोकांचीं नांवं व्हाइसरॉयला सादर केलीं. व्हाइसरॉयनं तीं मंजूर केलीं, परंतु रेडियोवर भाषण करतांना म्हटलं कीं 'मुस्लिम लीगला अजूनहि मंत्रिमंडळांत यायचं असेल तर दरवाजा उघडा आहे. त्यांनीं आपले पांच प्रतिनिधी निवडून धाडावेत. तसे त्यांनीं धाडले तर मंत्रिमंडळाची पुनर्घटना करतां येईल.'

परंतु जीनांनीं निराळे डाव मनाशीं योजले होते. त्यांना नेहरू सरकार अस्तित्वांत आलं कीं देशांत बंडाळी माजवून त्याचा कारभार अशक्य करून टाकायचा होता. जे हवं त्याचं पुरेपूर माप पदरांत पाडून घेण्यासाठीं याच मार्गानं जायचं त्यांनीं ठरविलं होतं. व्हाइसरॉयच्या अखेरच्या विनंतीकडे देखील त्यांनीं सर्वस्वी कानाडोळा केला.

जीनांच्या हट्टीपणाचा आतां कॉंग्रेसलाच नव्हे, तर ब्रिटिश सरकारला-देखील वीट आला होता. जीनांना काय करायचं असेल तें खुशाल करूं द्या, आपल्या मार्गानं आपण जायचं असं त्यांनीं ठरविलं. नेहरू सरकारांतील मंत्रिमंडळाचा शपथविधि होण्याची तारीख २ सप्टेंबर ही निश्चित करण्यांत आली. हा दिवस मुसलमानांनीं सार्वजनिक निषेधाचा दिवस म्हणून पाळावा असा आदेश जीनांनीं दिला. पण जीनांच्या धमक्यांची फिकीर न करण्याचं नेहरूंनीं व लॉर्ड वेव्हेलनं ठरविलं होतं. किरकोळ दंगलीचे प्रकार होतील व त्यांचा बंदोबस्त आपण करूं असा त्यांचा हिशोब असावा. मुसलमान हिंदूंची सरसहा कत्तल सुरू करतील, अशी कुणाचीच कल्पना नव्हती. कदाचित् जीनांनीं असल्या अमानुष कत्तलीचा आदेश दिला नसेलहि. पुढें ज्या गोष्टी घडल्या त्या त्यांनीं वेळापत्रक आंखून पद्धतशीर-पणानं मुद्दाम घडवून आणल्या असं नव्हे, तर जी वावटळ त्यांनीं उठविली ती त्यांच्या आटोक्यांत न राहतां भलतीकडे थडकली असंहि कदाचित् झालं असेल. या बाबतींतला खरा इतिहास अज्ञात राहणार आहे...पण एवढं खरं, कीं बंगाल्यांत व पंजाबांत पुढें जो हाहाःकार उडाला त्याची नेहरूंना व वेव्हेलला कल्पना नव्हती. त्यांनीं ठरविलं

कीं स्वतंत्र हिंदुस्थानाचं मध्यवर्ति सरकार तारीख २ सप्टेंबर रोजीं स्थापन करायचं. अशा सरकाराची स्थापना म्हणजे एक प्रकारें हिंदुस्थानच्या सार्वभौमत्वाची ग्वाहीच होती. 'हिंदुस्थानचे पंतप्रधान' अशी किताबत नेहरू धारण करणार होते. घटना समितीची स्थापना, या समितीकडून स्वतंत्र भारताच्या राज्यघटनेची निश्चिति, इत्यादि विधी पुढें यथाकाल होणार होते. परंतु त्या सर्व गोष्टींचा प्रारंभ करून देणारा पहिला विधि तारीख २ सप्टेंबर रोजीं उरकण्यांत येणार होता. स्वातंत्र्याची प्रभातघटिका आतां फार दूर नाहीं असं आश्वासन देणारा उषःकाल या दिवशीं हिंदुस्थानाला दिसणार होता. लोक मोठ्या उत्कंठेनं तारीख २ सप्टेंबर या दिवसाची वाट पाहूं लागले.

दिल्लीस तारीख २ सप्टेंबर रोजीं होणाऱ्या समारंभासाठीं जगन्नाथनं जावं असं जेव्हां मूर्तीनं सुचविलं, तेव्हां तो उषाकडे आला होता व म्हणाला होता, " आपल्याला दिल्लीस जायचं आहे. "

तिनं आश्चर्यानं विचारलं होतं, " आपल्याला ? "

" हं ! एकटं न जाण्याबद्दल तुम्हीं मला बजावलं आहे ना ? तुमच्या लक्षांत नसेल, पण माझ्या आहे. "

त्याचं तें बोलणं ऐकून तिला फार बरं वाटलं होतं. पण ती म्हणाली होती, " माझ्यासुद्धां लक्षांत आहे. पण..."

" पण काय ? "

" दिल्लीस जायला एकटं निघण्याऐवजीं तुम्हीं मला विचारलंत यांत मला हवं तें मिळालं. तुमच्याबरोबर प्रत्यक्ष जाण्यांत जितका आनंद मला झाला असता तितकाच तुम्हीं विचारल्यानं झाला. "

" म्हणजे ? हातपाय गाळायचा विचार दिसतो आहे. "

" हातपाय गाळीत नाहीं, पण माझं येणं कसं जमायचं ? "

तो चटकन् म्हणाला, " मूर्ति नको म्हणायचा नाहीं. वाटल्यास मी विचारीन त्याला. "

" तसं नाहीं. दुसरीच अडचण आहे. मला दोन दिवसांसाठीं घरीं जावं लागणार आहे. आईनं कसल्याशा व्रताचं उद्यापन काढलं आहे. तिचा निरोप आलाय कीं—"

तो म्हणाला, "शाबास !" त्यानं चेहरा अगदीं वाईट केला.

ती म्हणाली, " तुम्ही एकटेच जा. मात्र एक वचन मी तुमच्यापाशीं मागतें. जरूरीपेक्षां अधिक तिकडे राह्यचं नाहीं. मी इकडे तुमची वाट पहात असेन हें लक्षांत ठेवायचं. मला फार वाट पहायला लावायचं नाहीं." तिच्या प्रत्येक वाक्यागणिक तो मान हालवून हं हं करीत होता व त्याच्या तोंडावर हंसूं फुटत होतं. तें पाहून तिला एकदम हंसूं आलं होतं व ती पुढें म्हणाली होती, " आणखी परत आल्यावर मला साऱ्या गंमती सांगायच्या. राजकारणाच्या नव्हे, इतर."

त्याच्याकडे पाहतां पाहतां उषाला अगदीं अनिवार इच्छा झाली होती कीं हळूच त्याचे दोन्ही हात धरावेत आणि त्याला म्हणावं, 'मी तुमच्यावर किती प्रेम करतें तुम्हांला माहीत आहे ना ? तुमचं माझ्यावर प्रेम आहे असं मला केव्हां सांगणार तुम्ही ? आतां माझ्याच्यानं अधिक धीर धरवत नाहीं...' परंतु तिनं आपली ती इच्छा रोखून धरली होती. ती मनाशीं म्हणाली होती, 'घाई कशाला ? इतके दिवस थांबलें तशी आणखी थांबेन. जगन्नाथ दिल्लीहून आला कीं त्याला म्हणेन...'

या साऱ्या गोष्टींच्या आठवणी आज सकाळीं जगन्नाथचं तें पत्र आल्यापासून उषानं अगणित वेळां मनाशीं करून पाहिल्या होत्या. आतांहि मूर्तीच्या टेबलाजवळ उभं राहिल्या राहिल्या तिनं त्या करून पाहिल्या... "आणि आतां हा एकदम कलकत्त्याकडे निघून जातो याचा अर्थ काय ?" असं मूर्ति म्हणत होता. तिचं स्वतःचं मनहि सकाळपासून हाच प्रश्न तिला विचारीत होतं, 'याचा अर्थ काय ?' जगन्नाथनं मूर्तीला धाडलेल्या पत्रांत न लिहिलेली एक गोष्ट तिच्या पत्रांत लिहिली होती, " माझ्या मनांतली एक गोष्ट दुसऱ्या कुणालाहि नाहीं, पण तुम्हांला मीं सांगितली आहे." त्यानं लिहिलं होतं, " मोहित्याचा सूड घेण्याची इच्छा माझ्या मनांतून कांहीं केल्या जात नाहीं. अगदीं क्रूरपणानं त्याला

शासन करणं हें माझं कर्तव्य आहे असं मला वाटतं. गोळी घालून त्याच्या राक्षसी मेंदूच्या चिंधड्या कराव्या, सुरा खुपसून त्याचं काळं अंतःकरण चिरून टाकावं, असे विचार माझ्या मनांत घोंघावत राहतात. हा हिंसेचा ध्यास म्हणजे मला जडलेला चमत्कारिक रोग झाला आहे. मीं तुम्हांला म्हटलं होतं ना, गांधीजींना भेटून या रोगावर मी औषध मागणार आहे? त्याप्रमाणें मी त्यांना भेटलों व साऱ्या गोष्टी सांगितल्या. ते मला काय म्हणाले तें सांगूं? मनन करण्याजोगे आहेत त्यांचे शब्द. ते म्हणाले, "पापाची इच्छा जेव्हां माणसाला होते, तेव्हां तें पाप प्रत्यक्ष घडतांना पाहून त्याची अगदीं शिसारी येईल असं माणसानं करावं. हिंसेचा अतिरेक तूं पाहिलास, तिची किळस तुला आली, तिचं निर्मूलन करण्यासाठीं जरूर तर स्वतःचे प्राण अर्पण करावेत असं तुला वाटलं, म्हणजे तुझ्या अंतःकरणांतील ही गुप्त इच्छा झडून जाईल. कलकत्त्यास जा. तिथें हिंसेला ऊत आलेला आहे. ती लाट थोपविण्यासाठीं झटलास तर तुझं स्वतःचं अंतःकरण शुद्ध होईल..." गांधीजींचे हे शब्द मला पटले. माझा आत्मा वांचविण्यासाठीं कलकत्त्यास गेलं पाहिजे असं मला वाटलं. म्हणून मी जात आहें. माझ्याबरोबर आणखी बारा लोक आहेत. शक्य तों माझी स्वतःची काळजी मी घेईन. तुम्हीं चिंता करतां कामा नये..."

त्याच्या पत्रांतले ते शब्द जेव्हां तिच्या मनांत येत तेव्हां कांहींशा रोषानं ती म्हणे, 'तुम्हीं चिंता करतां कामा नये' असं लिहिणं किती सोपं आहे! पण एवढ्या साध्या पांच शब्दांनीं माझ्या अंतःकरणाचं दुःख मी कसं आवरून धरूं?

हे सारे विचार आणि या साऱ्या आठवणी मनांत उचंबळून आल्यामुळें मूर्ति जेव्हां बोलतां बोलतां अखेर म्हणाला, "आणि हा आतां कलकत्त्याकडे निघून जातो याचा अर्थ काय?" तेव्हां त्याच्या त्या शब्दांनीं तिच्या मनांतली आधींच अधू झालेली जागा दुखावली गेली, आणि तिच्या डोळ्यांत एकदम आसवं उभीं राहिलीं. तिनं एकदम तोंड झांकलं, आणि मग डोळे पुसतां पुसतां ती मूर्तीला म्हणाली, "जातें मी."

तो म्हणाला, "जगन्नाथचं तुम्हांला कांहीं पत्र आलंय् का?"

तिनं फक्त मान हालविली.

त्यानं विचारलं, "तो असा निघून जाईल याची तुम्हांला कांहीं कल्पना होती का? तुमच्याजवळ त्यानं कधीं कांहीं सूचक उद्गार काढले होते का?"

त्याच्या प्रश्नांना उत्तर देण्याऐवजीं तिनं एकदम हुंदका दिला. तिच्या मनांत आलं, जगन्नाथच्या जाण्यानं मी किती हतबुद्ध झालें आहे तें या मूर्तीला कसं सांगू? अलीकडे जगन्नाथ माझ्याशीं कसा वागत होता, तें त्याचं वागणं पाहून मीं कोणते मनोरथ केले होते, एखादं काचेचं दार फुटून त्याचे तीक्ष्ण तुकडे अंगाला लागून जखमा व्हाव्या तद्वत् माझ्या भंगलेल्या मनोरथांचे तुकडे मला कसे घायाळ करताहेत, तें या मूर्तीला कसं सांगूं? माझं दुःख कुणालाहि कळण्यासारखं नाहीं! जगन्नाथ पुन्हां प्रत्यक्ष भेटेल त्याच वेळेस तें संपेल! आणि त्याची भेट पुन्हां होईल कीं नाहीं हें कुठें सांगतां येत होतं? किती दूर निघून गेला होता तो! आणि कोणत्या भयंकर ठिकाणीं!...तिला जोराचा हुंदका आला.

मूर्ति तिच्याशीं पुष्कळ वेळ बोलत राहिला. असोसिएटेड प्रेसची कचेरी कलकत्त्यास होती, तिथें त्याचे कांहीं मित्र होते, त्यांना तारा करून जगन्नाथला इकडे ताबडतोब निघून येण्याबद्दल निरोप देतां येईल असंहि तो म्हणाला. परंतु त्याच्या कोणत्याच शब्दांनीं उषाचं सांत्वन झालं नाहीं.

तिला वाटलं, जगन्नाथ कलकत्त्यास गेला तो गेला, निदान त्याची खुशाली आपल्याला मिनिटामिनिटांनीं कळेल अशी कांहीं किमया करतां यावी. ती ऑफिसांतला बहुतेक वेळ टेलिप्रिंटरपुढें उभी राही. त्यावर येणाऱ्या बातम्यांचीं अक्षरं उठूं लागलीं, कीं त्यांकडे अर्धवट भयानं, अर्धवट उत्सुकतेनं ती नजर लावी. 'कलकत्ता' असा शब्द उठला, कीं तिच्या पोटांत धस्स होई. तिला वाटे, या जाळपोळीच्या आणि घातपाताच्या वर्णनांत कांहीं अशुभ तर ऐकावं लागणार नाहीं? तिथून निघून जावंसं तिला वाटे. पण तिचे पाय हालत नसत. संपादक कचेरींतले सारे लोक काम आटपून निघून गेले तरी टेलिप्रिंटरपुढें ती तशीच उभी राही. त्या यंत्राजवळ उभं राहणं म्हणजे जगन्नाथच्या जरा तरी जवळ असणं होय, असं तिच्या मनाला वाटे. साऱ्या

लोकांना तिच्या त्या वागण्याचा चमत्कार वाटे. स्वामी वरचेवर तिच्याजवळ येऊन विचारी, " आतां तरी कॉफी घेणार का तुम्ही ? " पण ती फक्त मान हालवी. झोंपेंत उभ्या राहणाऱ्या माणसासारखी ती त्याला दिसत असे. त्याला वाटे, हिला बरं वाटेल यासाठीं काय करावं ? एखाद्या पाळीव मांजराप्रमाणें तो तिच्याजवळ घोटाळत राही. अखेर तो तिला हळूंच म्हणे, " फार उशीर झाला. आणखी थांबलांत तर बस नाहीं मिळायची घरीं जायला. " मग ज्या शय्येवर आपल्या प्रेमाचं माणूस आजारी पडलं आहे तिच्यापासून दूर होतांना माणसाची चर्या व्हावी तशी तिची चर्या होत असे, आणि ती ऑफिसांतून बाहेर पडून घरच्या वाटेला लागत असे. तिनं किती नको म्हटलं तरी स्वामी तिला घरापर्यंत पोंचविण्यासाठीं बरोबर जाई. कारण जातीय दंगलीनं मुंबईत जरी मोठं स्वरूप धारण केलं नव्हतं, तरी भोसकाभोसकीचे प्रकार केव्हां कुठें होतील त्याचा नेम नव्हता. शहराच्या कित्येक भागांत कर्फ्यू जारी झालेली असे...

खोलीवर आल्यावर उषाला वाटे, आतां पुन्हां उद्यां कचेरींत जाईपर्यंत कलकत्त्याची बातमी कळणार नाहीं; तोंपर्यंत नुसती चिंता करीत राहायचं. बाहेर पावसाचे थेंब वाजूं लागले, कीं टेलिप्रिंटरचाच आवाज होतो आहे असा भास होऊन ती चमके. रात्रीं स्वप्नांत तिला तें यंत्रच सारखं दिसे, व त्यावरच्या बातम्या आपण वाचीत आहोंत असं तिला वाटे.

" गेल्या चोवीस तासांत सुरामारींत मेलेल्यांची संख्या... ", " दुकानांची मोडतोड आणि लूट मोठ्या प्रमाणांत झाली... " अशीं वाक्यं तिच्या डोळ्यांपुढून सरकत. ती एकदम दचकून उठे, आणि " जगन्नाथ ! जगन्नाथ ! " अशा हांका मारी.

सप्टेंबरच्या १२ तारखेस तिला जगन्नाथचं पत्र आलं. तें अगदीं दोन ओळींचं होतं. " मी खुशाल आहें. इथं जो वणवा पेटला आहे, त्याचं वर्णन शब्दांनीं करतां येण्यासारखं नाहीं. " पण या दोनच ओळींनीं तिला किती समाधान झालं ! कारण त्या जगन्नाथच्या हातांनीं लिहिलेल्या होत्या ! पत्रावर पत्ता नव्हता. फक्त '७ सप्टेंबर १९४६' अशी तारीख होती. पत्र यायला पांच दिवस लागले होते. पण हरकत नाहीं, त्यानं आठवण

ठेवली होती. ती काळजी करील हें त्याला कळत होतं! ही कांहीं कमी समाधानाची गोष्ट नव्हती! ती स्वतःला म्हणाली, 'असा दुःखाचा अतिरेक करणं मला शोभत नाहीं. मीं असा धीर सोडावा हें बरं नाहीं. लढाईच्या वेळेस प्रत्यक्ष हातघाईच्या चकमकीच्या जागीं जाणारे बातमीदार परत येतात! जगन्नाथ परत येईल; तो मला भेटेल! माझा मला परत मिळेल...' तिनं शक्य तितकं उल्हसित राहायचं ठरविलं. ऑफिसांत जातांना तिनं आपल्या कपड्यांकडे नीट लक्ष दिलं. तिनं निश्चय केला कीं आज पूर्वीप्रमाणें अगदीं आनंदांत कचेरींत वागायचं. टेलिप्रिंटरचं दर्शन घ्यायचं नाहीं. जगन्नाथ खुशाल असणार, आणि तो परत येऊन भेटणार अशी मनाची खात्री ठेवायची. हंसत खेळत राहायचं! स्वतःच्या मनाला अशा प्रकारें बजावीत ती खोलींतून बाहेर पडली.

थंडरच्या कचेरीचे जिने चढून ती आपल्या कामाच्या खोलींत शिरली ती मुद्दाम हंसत हंसतच. परंतु तिला पाहतांच बाकीच्या लोकांनीं चमकून आपसांतलीं बोलणीं थांबविलीं आणि माना खालीं घातल्या. तो प्रकार तिला फार चमत्कारिक वाटला. तिच्या मनांत आलं, आपल्याला कदाचित् उगीच भास झाला असेल. पण आपल्या जागेवर बसतां बसतां तिनं पुन्हां निरखून पाहिलं, तों सगळ्यांच्या माना खालींच होत्या. जणु तिची दृष्टादृष्ट सारीजणं टाळीत होते. 'अरे, असं काय करतां? बोला कीं,' असं ओरडावंसं तिला वाटलं. तिनं कपाळाला आठी घातली व खुर्चीवर बसून टाक उचलला. तितक्यांत स्वामी आला व म्हणाला, "साहेबांनीं तुम्हांला जरा बोलावलं आहे." ती उठली आणि मूर्तीकडे गेली. तो नेहमींप्रमाणें आपल्या खुर्चीवर बसलेला नव्हता. टेबलाच्या अलीकडेच उभा होता. तिला पाहतांच तो दोन पावलं टाकून पुढें आला. ती आंत आल्यावर त्यानं दार लावून घेतलं. ती टेबलाकडे गेली. दारापासून परत वळून तो तिच्याजवळ आला. तिला कळेना, तो असं कां करीत आहे तें. तिनं हनुवटी उचलून त्याच्याकडे पाहिलं. तिच्या नजरेला नजर भिडवून त्यानं तिच्या खांद्यावर हळूच हात ठेवला. त्याच्याविषयीं वाईट शंका घेणं शक्यच नव्हतं. परंतु पूर्वी कधींदेखील त्यानं तिला स्पर्श केला नव्हता. त्याचं तें वागणं तिला फार चमत्कारिक वाटलं. तिची चर्या गोंधळल्यासारखी झाली. अगदीं

स्थिर डोळ्यांनीं तिच्याकडे पाहात तो अगदीं हलक्या आवाजांत तिचं नांव घेऊन म्हणाला, "तुमच्या धैर्याची परीक्षा आहे !"

ती हळूंच म्हणाली, "म्हणजे ?"

खिशांतला तारेचा कागद बाहेर काढून तो पुन्हां तिचं नांव घेऊन म्हणाला, "कलकत्त्याच्या असोसिएटेड प्रेसमधल्या माझ्या मित्राची ही तार सकाळीं आली."

तिनं एकदम विचारलं, "जगन्नाथबद्दल ?—"

त्यानं मान हालविली.

ती म्हणाली, "कांहीं वाईट नाहीं ना ?"

"फार वाईट आहे !" असं म्हणून त्यानं तारेचा कागद उलगडून तिच्या डोळ्यांपुढें धरला.

'फार वाईट आहे' हे शब्द ऐकल्याबरोबर उषाच्या अंतःकरणाचं पाणी झालं होतं. तिच्या अंगांतलं सारं रक्त आटून गेलं होतं. तिच्या पंचेंद्रियांचा जागेपणा नाहींसा झाला होता. तिच्या डोळ्यांपुढें आलेल्या अंधारांतून तारेच्या कागदावरचे शब्द तिला दिसत नव्हते. तिनं खूप प्रयत्न केल्यावर प्रारंभींचे इंग्रजी शब्द तेवढे तिला कसेबसे वाचतां आले. "तुमचे स्नेही जगन्नाथ मारले गेले..." त्यापुढचे शब्द तिला मुळींच दिसेनात. तिनं डोळे मिटले. छाती दोन्ही हातांनीं ओरबडल्यासारखी करून हुंदका दिला. दुसऱ्याच क्षणीं ती बेशुद्ध झाली !

* * *

तिला प्रथम वाटलं, कोठल्या अपरिचित ठिकाणीं आपण आहोंत. पण थोडया वेळानं तिच्या लक्षांत आलं, कीं मूर्तीच्या घरांतल्या एका खोलींत ती होती. ती खोली तिला अगदींच अपरिचित नव्हती. एक दोन वेळां ती मूर्तीच्या घरीं पूर्वी आली होती व त्या वेळेस या ठिकाणीं बसली होती. मूर्तीची बायको अगदीं जुन्या वळणाची असल्याचं तिला आढळून आलं होतं. मूर्ति सतरा वर्षांचा असतांना व त्याची बायको बारा वर्षांची असतांना त्या दोघांचं लग्न झालं होतं. खूप शिकलेला नवरा आणि जेमतेम अक्षर-ओळख होण्यापर्यंत शाळेंत गेलेली बायको, अशा स्त्री-पुरुषांत जें अंतर

कायमचं राहतं तें या दोघांत राहिलं होतं; पण मूर्तीची बायको अशिक्षित असली तरी अतिशय प्रेमळ आणि कष्टाळू गृहिणी होती. मूर्ति ज्या उद्योगांत कष्ट सोसून, धडपडून मोठा झाला होता, त्याचं आकलन त्याच्या बायकोला होणं शक्य नव्हतं. पण आपला नवरा कर्तृत्ववान् आहे, अनेक संकटांशीं झगडून त्यानं नशीब काढलं आहे, एवढं तिला कळत होतं. त्याच्याविषयीं अभिमान आणि आदर तिला वाटत होता, आणि त्याची सेवा करण्यांत व संसार दक्षतेनं चालविण्यांत ती रमून गेली होती. उषा ज्या ज्या वेळीं मूर्तीच्या घरीं आली होती त्या त्या वेळेस त्याची बायको तिच्याशीं फार प्रेमानं वागली होती, उषाला तिनं नानातऱ्हेचीं मद्रासी गोड तिखट पक्वान्नं तयार करून आग्रहानं खाऊं घातलीं होतीं. उषाला आतां आठवलं. हें ठिकाण तिला अपरिचित नव्हतं. तिच्यासमोर मूर्ती-जवळ बसलेली राजम्मा आणि तिचीं दोन मुलं तिच्या परिचयाचीं होतीं.

पण आपण या जागेंत कॉटवर कां पडलों आहों हें तिला चटकन् समजेना. तिनं डोळे मिटून घेतले आणि आठवण करून पाहिली. कांहीं वेळानं तिला वाटलं, बरोबर आहे... मूर्ति तिला कचेरींतून आपल्या घरीं घेऊन आला होता. त्यानं डॉक्टरना बोलावून आणलं होत. कसलं तरी औषध ती प्याली होती. मग तिला गाढ झोप लागली होती. त्या झोपेंतून ती आतां जागी होत असली पाहिजे...

खोलींत दिवा लागलेला होता. रात्र झाली असली पाहिजे. दिव्याच्या प्रकाशांत खोलींतल्या साऱ्या वस्तू स्पष्ट दिसत होत्या, भिंतीवरच्या एका आरशांत दिव्याचं प्रतिबिंब दिसत होतं. त्या खोलींतलं ते छोटं टेबल, टेबलाच्या वरच्या बाजूचं कॅलेंडर, टेबलावर मांडलेली लहानशी नृत्याच्या पवित्र्यांतील हस्तिदंती मूर्ति, कोपऱ्यांतला रेडिओ, एकच लहानसा मळकट अभ्याचा कोच, एका खुंटीला टांगलेला कातडी पिशवींतला कॅमेरा—या साऱ्या वस्तू तिनं पूर्वी पाहिल्या होत्या. मूर्तीजवळ बसलेली राजम्मा, तिच्या अंगावर रेलून उभी राहिलेली तिची छोटी मुलगी, खालीं बस्करावर कागदाचे तुकडे करीत बसलेला धाकटा मुलगा हीं सारीं माणसं तिनं पूर्वी पाहिलेलीं होतीं. साऱ्या वस्तू आणि सारीं माणसं जशींच्या तशीं होतीं!

कदाचित् या खोलीबाहेरचं सारं जगहि पूर्वी जसं होतं, तसंच या वेळीं असेल! काल होतं तसच असेल!

ज्या जगांतून जगन्नाथ एकाएकीं गेला होता आणि ज्या जगांत तो पुन्हां कधीं दिसणार नव्हता, तें जग पूर्वीसारखंच अजून कसं राहिलेलं आहे, याचा उषाला चमत्कार वाटत होता. तिच्या मनांत आलं, जगाचं राहो, जगन्नाथ गेला तरी मी अजून कशी राहिलें आहे?... मागें एकदां ती मूर्तीकडे आली तेव्हां जगन्नाथहि तिच्याबरोबर होता, आणि मूर्तीशीं राजकारणाच्याच कुठल्या तरी प्रश्नाबद्दल उंच आवाजांत चर्चा करतां करतां खुंटीवरचा कॅमेरा काढून घेऊन त्याच्याशीं खटपट करीत तो कोचावर बसला होता...आज जगन्नाथची आकृति तिला दिसत नव्हती. त्याचा आवेश-युक्त आवाज तिला ऐकूं येत नव्हता...आणि तरी ती जागा पूर्वी होती तशीच होती! हीं माणसं पूर्वीसारखींच होतीं! ती स्वतःहि अजून जिवंत होती!...उषा मनाशीं म्हणाली, 'मी अजून दुःखानं मेलें कशी नाहीं?'

तिनं मूर्तीकडे, राजम्माकडे, दोघां मुलांकडे पाहिलं. खोलींतल्या साऱ्या वस्तूंकडे पुन्हां एकदां पाहिलं. त्या वस्तू आणि तीं माणसं तिला पूर्वीं आवडलीं होतीं. पण आतां त्यांकडे तिनं नजर टाकली, तेव्हां त्यांच्याविषयीं प्रीति, अप्रीति कांहींच तिला वाटेना. जगन्नाथावरच्या प्रेमामुळें त्याच्याशीं ज्यांचा ज्यांचा जवळचा दूरचा संबंध होता त्या सर्वांविषयीं तिनं चटकन् आत्मीयता ठेवली होती. पण आतां जगन्नाथच नाहींसा झाल्यामुळें ऋणा-नुबंधाचे सारे धागेदोरे तुटल्यासारखे तिला वाटले. झाडाचा बुंधाच उन्मळून पडल्यानंतर त्याच्या शाखांना अवकळा यावी तशी ज्या ज्या व्यक्तींविषयीं आणि वस्तूंविषयीं तिनं जगन्नाथाच्या संबंधामुळें आपलेपणा ठेवला होता त्यांची अवस्था झाली होती. आपलेपणाचे तंतू तुटले होते...मूर्ति आणि राजम्मा तिच्याकडे पाहून हंसलीं. राजम्मानं तिला विचारलं, "आतां बरं वाटतंय ना तुम्हांला?" परंतु उलट हंसावं किंवा बोलावं असं उषाला कांहीं केल्या वाटेना. तिनं पुन्हां डोळे मिटले...आणि ऑफिसांत काय घडलं म्हणून मूर्तीनं आपल्याला इकडे घरीं आणलं, त्याची आठवण तिला एकदम झाल्यामुळें तिनं कोरडा हुंदका दिला...तिला पुन्हां वाटलं या जगांत

जगन्नाथ नाहीं, आणि तरी हीं सारीं माणसं आहेत, मीसुद्धां आहें! किती चमत्कारिक, किती लाजिरवाणी गोष्ट! तिनं अंगाला शहारे दिले आणि डोळे अगदीं घट्ट घट्ट मिटून घेतले.

मूर्तीनं रेडिओ सुरू केला. गाण्याचे स्वर तिला ऐकूं येऊं लागले. पण मग जरा वेळानं कुठल्या तरी घड्याळांत ठोके पडले. गाणं बंद झालं. खरखर आवाज झाला आणि त्यानंतर एकदम गांधीजींचा आवाज तिच्या कानीं पडला! तिनं डोळे उघडले नाहींत. तिच्या लक्षांत आलं कीं आतांशा रोज गांधीजींच्या संध्याकाळच्या प्रार्थनेनंतरचं त्यांचं भाषण दिल्लीहून ध्वनिक्षेपित करण्यांत येत असे. तिनं डोळे मिटलेलेच ठेवले. त्यांचं तें भाषण ऐकण्याची तिची इच्छा नव्हती. गांधीजींनीं सल्ला दिला नसता तर जगन्नाथ कलकत्त्याला गेला नसता अशा विचारानं गांधींबद्दल तिला त्या क्षणीं एक प्रकारचा रोष वाटत होता. त्यांच्या भाषणाकडे लक्ष देण्याची तिची इच्छा नव्हती. केवळ ती जागी होती म्हणून त्यांचे शब्द तिच्या कानांवर पडणार होते इतकंच.

गांधीजी म्हणाले, "आज एका वीरपुरुषाला मी श्रद्धांजलि वाहणार आहें. या पुरुषाचं नांव जगन्नाथ पंडित."

तें नांव ऐकल्याबरोबर उषानं डोळे उघडले, आणि कोपऱ्यांतल्या रेडिओकडे पाहिलं. मूर्ति रेडिओपाशीं उभा होता. त्यानंहि एकदम चपापल्यासारखी चर्या केली होती व तो 'ऐका ऐका' म्हणून डोळ्यांनीं उषाला खुणवीत होता. त्यानं चावी फिरवून रेडिओचा आवाज वाढविला. गांधीजींच्या आवाजानं ती खोली भरून गेली. उषा अगदीं उत्कंठेनं त्यांचा एकेक शब्द ऐकत राहिली.

"...माझ्या सांगण्यावरून हा जगन्नाथ पंडित कलकत्त्यास गेला होता. तिथें चालू असलेल्या हाहाःकाराची लाट थोपविण्यासाठीं त्यानं आपले बाहू आणि छाती पुढें केली होती. हिंसेचा अंत हिंसेनं करतां येत नाहीं, उलट त्या हिंसेचं आयुष्य वाढतं, अहिंसा ही एकच हिंसेवर उपाय आहे, हें तत्त्व जगन्नाथ पंडितला पटलं होतं. या तत्त्वाचं आचरण करण्यासाठीं तो कलकत्त्यास गेला होता. त्याच्या मृत्यूची बातमी आज आली आहे.

त्याच्या मृत्यूनं मी दुःखित झालों आहे असं मी म्हणणार नाहीं. कारण जगन्नाथ पंडित मरण पावला असं मी मानीत नाहीं. हिंसेचा नाश करतां करतां तो अमर झाला. हिंसेवर विजय मिळविण्यासाठीं ज्यांनीं बलिदान केलं अशांच्या दैदिप्यमान पंक्तींत तो जाऊन बसला. चौतीस वर्षांपूर्वी मीं दक्षिण आफ्रिकेंत सत्याग्रहाचा लढा केला, तेव्हां त्या लढ्यांत वल्ली आम्मा नांवाची अवघी सोळा वर्षांची मुलगी तीन वेळां तुरुंगांत गेली आणि अखेर अमर झाली. स्वतःच्या प्राणांची आहुति हिंसेला देऊन अहिंसेचं दिव्य तत्त्व अढळ राखणाऱ्या या वीरस्त्रीपुरुषांच्या आठवणींनीं माझी श्रद्धा अचल राहते. त्याचा काय नियम सांगावा, कदाचित् हिंसेशीं झगडतां झगडतां या स्त्रीपुरुषांप्रमाणेंच माझाहि देहपात ठरलेला असेल. जगन्नाथ पंडित यांच्या अमर आत्म्याला मी वंदन करतों. तो नुसताच वृत्तपत्रकार नव्हता. झुंझार होता. जनतेचा आत्मा शुद्ध रहावा म्हणून लढणारा वीर होता. त्याच्याबद्दल कुणींहि दुःखाचे अश्रू ढाळूं नयेत. त्याच्या एकट्याच्या देहपतनानं बंगालचे किती तरी लोक शुद्धीवर येतील याची मला खात्री आहे. त्याच्या निर्वाणानं स्वातंत्र्यापेक्षांहि अधिक मोलाची जी शांति ती जवळ येईल. ”

गांधीजींचा आवाज थांबला. रेडिओंतून दुसरा कोणताही आवाज ऐकूं येऊं नये म्हणून मूर्तीनं रेडिओ बंद करून टाकला. तो हलकेच उषाजवळ आला. त्यानं हात पुढं केला तेव्हां तिनं आपला हात त्याच्या हातांत दिला, व क्षणभर त्याच्याकडे पाहून डोळे मिटून घेतले. तिच्या बोटांवर अलगद ठेवलेलीं मूर्तीचीं बोटं तिला म्हणत होतीं, “ आतां तुम्हांला बरं वाटतंय ना ? ” ती बोटांच्या स्पर्शानं सांगत होतीं, “ बरं वाटतंय. ” तिला गांधीजींचे शब्द पुनःपुन्हां आठवत होते; “ त्याच्याबद्दल कुणींहि दुःखाचे अश्रू ढाळूं नयेत... ”



# प्रकरण आठवं

वजन करण्याच्या काट्यावरून उषा खालीं उतरली तेव्हां तिच्याकडे पाहून हंसत डॉक्टर म्हणाले, " या आठवड्यांत एक पौंड वाढलं कीं! वीस दिवसांत तीन पौंड म्हणजे कांहीं वाईट नाहीं. आतां तुम्हांला जास्त शक्ति वाटते कीं नाहीं?"

उषा म्हणाली, "वाटते."

"झोप?"

"बरी लागते."

"भूक?"

उषानं मान हालविली.

जवळ उभ्या राहिलेल्या अजयनं विचारलं, "खरंच डॉक्टर, आईनं तुम्हांला विचारायला सांगितलं आहे— "

डॉक्टरनीं खालीं वाकून त्याच्या गालाला हात लावीत विचारलं, "काय रे? काय विचारलं आहे आईनीं?"

अजय म्हणाला, "ताईला खायची परवानगी असेल तरच दिवाळीच्या फराळाचं करणार आहे आई. तेव्हां ती मला म्हणाली डॉक्टरना विचार—"

डॉक्टर म्हणाले, "हा प्रश्न आईचा दिसत नाहीं. तुझा स्वतःचा दिसतो. घरांत फराळाचं कदाचित् होणार नाहीं म्हणून तुला काळजी पडली आहे आणि तूं विचारतो आहेस."

"नाहीं नाहीं डॉक्टर. शप्पथ. आईच म्हणाली— "

"बरं बरं. आईना सांग, कीं ताईला दिवाळींतलं फराळाचं खायला कांहीं एक हरकत नाहीं. चापून वाटेल तितकं खाऊं दे. अरे, तुझ्या ताईला झालंय काय? कांहीं झालेलं नाहीं. तिनं उगीच मनाची समजूत करून घेतली आहे आपण आजारी आहोंत म्हणून. काय

उषाताई, मी म्हणतों तें खरं कीं खोटं ? " उषानं उत्तर देण्याऐवजीं कष्टी चर्येनं आपल्या हाताकडे पाहून डाव्या मनगटावरची बांगडी उजव्या हातानं फिरविली. डॉक्टर तिच्या उत्तरासाठीं थांबले नाहींत. त्यांनीं तिच्या खांद्यावर हात ठेवून तिला हालवल्यासारखं केलं आणि म्हटलं, " आतां चटकन् बरं व्हायचं बरं काय ? या अजयला काळजी पडली आहे बघा दिवाळींत फराळाचं खायला मिळणार कीं नाहीं याबद्दल. लौकर बरं व्हायचं. कांहीं झालेलं नाहीं तुम्हांला. हां अजय, आंत ये. तुझ्या ताईसाठीं अगदीं गोड औषध तयार करून देतों. "

डॉक्टर अजयला घेऊन पार्टिशनच्या पलीकडे गेले. उषा बाहेरच्या कोचावर बसून राहिली. 'तुझ्या ताईला कांहीं एक झालेलं नाहीं...' त्यांचं म्हणणं खोटं नव्हतं. डॉक्टर मोदीदेखील असंच म्हणाले होते. जें जगाला कळेल, जें जगाला सांगतां येईल असं तिला कांहीं झालं नव्हतं. परंतु जें तिला सांगतां येण्यासारखं नव्हतं असं खूपच झालं होतं. आणि तें किती भयंकर होतं! जगन्नाथ गेला होता! तिच्या जगांतला प्रकाशच नाहींसा झाला होता. भोंवतालच्या वस्तू आणि व्यक्ती तिला दिसत होत्या. परंतु त्यांच्या आकृती पुसट आणि एकमेकींत गुंतलेल्या भासत होत्या. माणसाच्या मनांत कसली तरी ईर्षा, कसली तरी आशा असली, कोणत्या तरी सुखाची माणूस वाट पहात असलं तरच त्याच्या आयुष्याला स्पष्टपणा येतो, भोंवतालच्या जगाला कांहीं रेखीव आकार आहे असं त्याला वाटतं. जगन्नाथ गेल्यामुळें उषाच्या मनांतली सारी ईर्षा अकस्मात् संपली होती, ताणलेला दोरा तुटावा त्याप्रमाणें तिची आशा तुटली होती. ज्या गोष्टीची तिनं वाट पहावी अशी गोष्ट आतां तिच्या आयुष्यांत उरली नव्हती. त्यामुळें तिन्हीसांजाच्या अंधारांत दिसाव्या त्याप्रमाणें साऱ्या वस्तू तिला अंधुक आणि पुसट पुसट दिसत होत्या...अशा या पुसट झालेल्या जगांत रहावंसं तिला वाटत नव्हतं...

ती 'थंडर'च्या ऑफिसांत जात असे. परंतु त्या जागेंतहि अंधार भरला आहे असं तिला वाटे. दौतींत टांक बुडवून कागदावर लिहिण्याचं काम ती करी, परंतु टांकांतून कोणतीं अक्षरं कागदावर उठताहेत तें तिला

घड कळत नसे; आणि त्या कागदाकडे पाहतां पाहतां ती स्वतःला पुनः पुन्हां विचारी, " हें मी कशासाठीं करतें आहे ? यांत आतां कांहीं अर्थ उरलाय का ? " आणि या प्रश्नांना उत्तर नव्हतीं...जगन्नाथचा सहवास मिळावा म्हणून ती मुंबईस आली होती, त्याची शाबासकी मिळवावी म्हणून वृत्तपत्राच्या कचेरींतलं काम ती हौसेनं करीत राहिली होती, पण आतां कशासाठीं आणि कुणासाठीं हें काम करायचं ?...तिला वरचेवर अगदीं असह्य दुःख वाटे तें या विचारानं, कीं ज्या वेळेस तिच्या मनांतली आशा अगदीं शिगेला पोंचली होती त्याच वेळेस त्या आशेचं एकदम निराशेंत रूपांतर झालं होतं. अगदीं ऐन पिकलेलं फळ वादळी वाऱ्याच्या झपाट्यांत सांपडून तुटावं आणि खालीं पडून फुटावं तसं तिच्या मनोरथांचं झालं होतं...जगन्नाथ दिल्लीला गेला त्यापूर्वी तो आणि ती अखेरचीं बोलत बसलीं होतीं त्या वेळेस आपल्या मनांतली गोष्ट उघड सांगण्याची इच्छा तिला किती झाली होती आणि पुढच्या वेळेस सांगू म्हणून तिनं ती कशी आंवरली होती, याची तिला सारखी आठवण होई. परंतु ती पुढची वेळ आतां कधींच येणार नव्हती. मूल्यवान रत्नांनीं भरलेली पेटी आपलीच आहे, पाहूं सावकाश उघडून म्हणून न उघडतां हातीं धरावी आणि मग उघडल्यावर तिच्यातला ठेवा नाहींसा झालेला आढळावा तसं झालं होतं. जगन्नाथला ती जें सांगणार होती तें तसंच राहिलं होतं. झाडावरचीं फुलं पूजेसाठीं खुडलीं न जातां फांदीवरच सुकून जावींत तशी तिची आशा आतां सुकून जाणार होती.

' त्याच्या मृत्यूबद्दल कुणींहि दुःखाचे अश्रू ढाळूं नयेत ' या गांधीजींच्या शब्दांचं तिला स्मरण होई. ती मनाची समजूत करी, ' बरोबर आहे, जगन्नाथचं कांहीं एक वाईट झालं नाहीं. तो कृतार्थ होऊन गेला. त्याचं आयुष्य सार्थकीं लागलं. मीं त्याच्यासाठीं दुःख करतां कामा नये. परंतु त्याच्या आयुष्यांत मीं हौसेनं गुंफलेलं माझं आयुष्य आतां एकदम हेतुशून्य झालं. त्या आयुष्याचं मी काय करूं ? कुठे टाकूं ? कोणत्या दिशेनं चालूं ? वृत्तपत्राच्या कचेरींतल्या या कामांत आतां गोडी कोणती उरली ? हें काम मीं यापुढें कशासाठीं करीत राहायचं ? '...तें सोडून ती घरीं निघून गेलीहि असती. पण तिच्या मनांत येई अशा प्रकारें घरीं

गेल्यावर भाऊंना मी काय सांगूं? इकडे येण्याची तिनं केवढी हौस दाखविली होती. जवळ जवळ हट्ट केला होता. आणि आतां एकाएकीं तें काम सोडून देऊन ती घरीं गेली, तर भाऊंना ती काय सांगू शकणार होती? ज्या हेतूनं ती इकडे आली होती तो भाऊंना माहीत नव्हता. जगन्नाथावर आपलं प्रेम आहे हें त्यांना तिनं कधीं सांगितलं नव्हतं. त्यामुळें जगन्नाथच्या आकस्मिक मृत्यूचा तिच्या मनावर जो परिणाम झाला तो तिला उघड सांगतां येण्यासारखा नव्हता. भाऊंनाच नव्हे, कुणालाच... 'थंडर' मधली नोकरी सोडून घरीं निघून जाणं सोपं नव्हतं...केवळ या अडचणीमुळेंच ती मुंबईत राहिली होती...

परंतु तिची प्रकृतिच जेव्हां बिघडली, तेव्हां तिला आपला विचार बदलावा लागला होता. भाऊ कांहीं कामासाठीं एकदां मुंबईस आले असतांना तिला म्हणाले होते, "तुझी तब्येत मुळींच बरी दिसत नाहीं मला." ती किंचित् हंसून म्हणाली होती, "बरी दिसत नाहीं? तुमची कांहीं तरीच कल्पना! मला काय झालंय?" पण ते तिला डॉक्टर मोदींकडे घेऊन गेले होते, आणि मोदींनीं सांगितलं होतं, "खरं म्हणजे हिला कांहीं एक झालेलं नाहीं. पण हिनं अगदीं संपूर्ण विश्रांति घ्यायला हवी." भाऊ तिला म्हणूं लागले होते, "माझ्याबरोबर चल." ती म्हणाली होती, "असं तडकाफडकीं जाणं मूर्तींना आवडायचं नाहीं. मी थोडे दिवस राहून पाहतें. बरं वाटतच नाहीं असं दिसून आलं, तर मग मूर्तींना सांगेन आणि घरीं येईन." तिचं म्हणणं भाऊंना पटलं होतं. ती आणखी कांहीं दिवस मुंबईत राहिली होती...

एके दिवशीं मूर्तींनं तिला आपल्या खोलींत बोलावून घेतलं आणि म्हटलं, "तुम्हांला इथल्या कामाचा कंटाळा नाहीं का आला?"

आपल्या मनांतली गोष्ट कशी ओळखली याचं उषाला आश्चर्य वाटलं. त्या आश्चर्याच्या भरांतच तिनं विचारलं, "म्हणजे काय?"

"म्हणजे असं, कीं तुमच्या कामांत कांहीं दिवस बदल झाला तर तुम्हांला आवडेल काय?"

ती हलकेच पुटपुटली, "तुम्ही काय म्हणतां तें माझ्या लक्षांत येत नाहीं."

मूर्ति म्हणाला, "सांगतों. हिंदी वृत्तपत्रकारांची एक तुकडी चीनमध्यें जायला निघणार आहे. चीनमधल्या परिस्थितीचा तिथें प्रत्यक्ष जाऊन अभ्यास करण्यासाठीं अर्धा खर्च सरकार देणार आहे, अर्धा ज्याचा त्यानं करायचा आहे. 'थंडर' मार्फत कुणाला पाठवतां का असं मला विचारण्यांत आलं आहे. मी तुमचं नांव सुचवावं म्हणतों. तुमचा खर्च मी सोसणार आहें. जातां का? बोला. एकंदर दोन अडीच महिन्यांची सफर आहे. जगन्नाथ असता तर त्यानं— "

जगन्नाथचं नांव त्यांच्या तोंडून ऐकल्याबरोबर तिच्या डोळ्यांपुढें एकदम अंधारी आली होती. कानांत मोठमोठे आवाज होऊ लागून दुसरं कांहीं ऐकू येईनासं झालं होतं. मटकन् खालीं पडावं असं तिला वाटलं होतं. आतांशां तिला असच होत असे. ज्या ज्या वेळीं तिला जगन्नाथची आठवण होई त्या त्या वेळीं तिचीं पंचेंद्रियें एकदम बधिर होऊन जात असत. आणि आपण खालीं खालीं घसरत आहोंतअसा भास होत असे. डॉ. मोदी म्हणत, "तुमच मन फार अशक्त झालं आहे. तुम्हीं संपूर्ण विश्राति घ्यायला हवी..."

आणि आतां मूर्ति तिला विचारीत होता, "चीनला जातां का? वृत्तपत्रकारांची तुकडी जाणार आहे!"... जगन्नाथ असता तर गोष्ट निराळी होती. कदाचित् तोहि निघाला असता व त्याच्याबरोबर ती गेली असती. परंतु त्या सार्‍या गोष्टी आतां संपल्या होत्या! जगाशीं ज्यामुळें तिचा जीव बांधला जायचा ते सारे धागेदोरे तुटले होते! चीन!... चीनशीं तिला काय करायचं होत? 'चीनला जातां का' हा मूर्तीचा प्रश्न तिला हास्यास्पद वाटला.

"काय? जातां का? बोला." मूर्तीनं तिला पुन्हां विचारलं होतं.

ती म्हणाली होती, "नको. माझी तब्येत अगदीं बरी नाहीं. इथलंच काम सोडून घरीं जायला डॉक्टर मला सांगताहेत. केवळ तुम्ही रागावाल म्हणून मी जात नाहीं. तुम्ही सोडीत असाल तर मी घरीं जावं म्हणतें—"

नंतर चार दिवसांनीं तिनं मुंबई सोडली होती. थंडरच्या कचेरींतलं काम पत्करून ती आली, तेव्हां मुंबईचं तें भव्य स्टेशन तिला किती प्रकाशमय

वाटलं होतं. आतां ती निघाली तेव्हां तेंच तिला अंधारलेलं वाटत होतं. माणसांची गर्दी, गजबज, धांदल या गोष्टी तिला पहाव्याशा वाटत नव्हत्या. ती हमालामागोमाग खालीं मान घालून पावलं टाकीत होती. कुणी आपल्याकडे बघेल, हंसेल अशी तिची अपेक्षा नव्हती. कुणाकडे पहावं, हंसावं असं तिला वाटत नव्हतं. तिच्या ठिकाणचा उल्हासाचा झरा अगदीं आटला होता. तिचं अंतःकरण शुष्क झालं होतं. ती घरीं निघाली होती, पण घरीं जाऊन ती काय करणार होती कोण जाणे! आपलं दुःख कसं विसरणार होती ? या दुःखावर कोणता उतारा तिला मिळणार होता ?...मनाशीं असे विचार करीत ती डब्यांत चढून एका बाकावर खिडकीपाशीं बसून राहिली होती. तिच्या हातांत एक पुस्तक होतं, पण त्यांतल्या मजकुरावरून तिचे डोळे शून्यपणें फिरत होते...

कुणी तरी आपला दंड धरून हालवीत आहे असं तिला वाटलं. तिनं पाहिलं तों प्लॅटफॉर्मवर तारा उभी होती. "हें काय ? तूं कुठें निघालीस ?" ती विचारीत होती.

तिला हंसणं भागच पडलं. ती म्हणाली, "घरीं."

"किती दिवसांसाठीं ?"

हंसत खोटं सांगणं तिला भाग होतं. "दोन दिवसांसाठीं."

"सोमवारीं परत येणार ?"

"हुं."

"मी येऊं का तुझ्या घरीं ?"

"चल कीं. तूं कुठें निघाली आहेस ?"

तारा मोठ्यांदा हंसली, व वेणीचा शेपटा पुढें ओढून घेऊन म्हणाली, "शीः ! मी नाहीं निघालें ग. आमच्या भाईची बायको जाते आहे माहेरीं नागपूरला बाळंतपणासाठीं !" तो शब्द उच्चारतांना ती खुदकन् हंसली. "तिला निरोप द्यायला आलें आहे. आम्ही सगळींच आलों आहोंत. बघ ना." तिनं बोट दाखविलं म्हणून समोरच्या प्लॅटफॉर्मवर उभ्या असलेल्या नागपूर मेलकडे उषानं पाहिलं. एका डब्यापुढें ताराचे चुलते, चुलत्या, भाऊ, भावजयी सगळ्यांचीच पलटण उभी असलेली तिला

दिसली तेव्हां ती म्हणाली, "अस्सं." तारा पुढें म्हणाली, "मला कल्पना नाहीं, तूं इथें भेटशील; पण आबू मला म्हणाला, 'त्या गाडींत उषाताई आहेत बघ.' पाहतें तों खरंच आपली स्वारी मारे खिडकीशीं बसून वाचनांत गढून गेलेली आहे!" ती मोठ्यांदा हसली आणि मग तिनं एकदम विचारलं, "किती दिवसांत आली नाहींस ग आमच्याकडे?"

उषा हंसून म्हणाली, "वेळच झाला नाहीं बघ. शपथ."

"आतां परत आलीस कीं ये. येशील?"

"खचित येईन."

"बघ हं."

"येईन म्हटल्यावर येईन."

"तुला एक गंमत सांगायची आहे!"

"होय?"

"कान कर इकडे" असं म्हणत तारानं टांचा उंच केल्या, डावा पंजा खिडकींतून आंत घालून उषाचं मस्तक ओढल्यासारखं केलं, आणि तिच्या कानाला तोंड लावून ती म्हणाली, "मी प्रेमांत सांपडलें आहे."

तें ऐकतांच आनंद झाल्यासारखं दाखविणं उषाला भागच होतं. ती म्हणाली, "असं होय? तरीच म्हटलं आमच्या ताराबाईच्या मळ्यांत आज एवढी खसखस कां पिकली आहे?"

तिच्या दंडावर थापटी मारून तारा म्हणाली, "चल! मी नेहमींच अशी हंसत असतें. तुला माहीत नाहीं वाटतं?" तिनं टाचा उंचावून उषाचं डोकं पुन्हां ओढून घेतलं व तिच्या कानांत सांगितलं, "आणि हें बघ, आतां मीं तुला जें सांगितलं तें अगदीं गुप्त ठेवायचं हं. आमच्या घरांत कुणाला माहीत नाहीं तें. खरं म्हणशील तर तुलाच पहिल्यांदा मीं सांगितलं आहे."

तितक्यांत समोरच्या गाडीची शिटी वाजली. ताराचे सारे भाऊ एकदम माना वळवून ओरडले, "तारा! तारा! अग गाडी सुटायला लागली कीं!" "आलें! आलें!" असं ओरडत तारा धांवली. परंतु पुन्हां एकदां तोंड फिरवून ती उषाला ओरडून म्हणाली, "परत आलीस

कीं येशील ना! मी वाट पाहीन हं." उषानं हंसत मान हालविली. तितक्यांत समोरची गाडी सुटली. ताराच्या घरांतल्या साऱ्या पलटणीनं 'संभाळून जा हं' 'पत्र धाड हं' असं ओरडून हातांतले रुमाल किंवा नुसते हात हालवून भाईच्या बायकोला निरोप दिला. गाडी निघून गेली. निरोप द्यायला आलेल्या लोकांच्या लोंढ्याबरोबर ताराच्या घरची ती पलटणहि परत निघाली...उषा परत हातांतलं पुस्तक वाचूं लागली. ताराशीं बोलतांना तिला वरकरणी खोटा आनंद दाखवावा लागला होता. त्याचा ओलावा अजून तिच्या अंतःकरणांत थोडासा उरला होता. स्वतःच्या खिन्नतेच्या आवरणांत पुन्हां शिरतांना ती मनाशीं आश्चर्य करीत होती, पांच मिनिटांपुरतंच का होईना, माझं दु.ख मी अजिबात विसरूं कसं शकलें होतें?...माणसाच्या मनोव्यापारांचा एक मोठा नियम तिला अजून माहीत नव्हता.

परंतु ती घरीं येऊन पोंचली, दिवसामागून दिवस हलके हलके सरकूं लागले, तेव्हां तो नियम तिच्या लक्षांत येऊं लागला. माणसाला आपल्या दुःखाचं प्रदर्शन करण्यास अवकाशच नसला कीं दुःख हळूंहळूं सुकत जातं. हुंदके द्यायची बंदी असली कीं हुंदका येईनासा होतो. डोळ्यांतलीं आसवं दाखवायची सोय नसली कीं आसवं फुटेनाशीं होतात. दुःख कुणाला सांगायचं नसलं म्हणजे तें मनांतल्या मनांत ठेवण्याच्या सतत प्रयत्नानं तें आटूं लागतं. दुःख लपविण्याची खटपट सदा करावी लागली, कीं त्या लपविण्याचंच एक नवं दुःख निर्माण होऊन व्यथा वाढण्याचा संभव असतो हें खरं, परंतु ती व्यथा वाढण्याऐवजीं दुःखाचे फणकारे अधिकाधिक वेळाच्या अंतरानं जाणवूं लागण्याचा आणि अखेर ते फणकारे बंद होण्याचा संभव जास्त असतो. मनांतल्या मनांत दुःख लपविण्याची सक्ती म्हणजे दुःखावर एक मोठा उतारा आहे.

या उताऱ्याचा गुण उषाला हळूंहळूं येऊं लागला होता. आणि भरीला घरांतल्या प्रेमळ वातावरणाचा परिणाम तिच्या मनावर होत होता. तिची आई, तिचे भाऊ, यांना तिच्या मनांतल्या दुःखाची कल्पना नव्हती. त्या दुःखाची शंकाहि त्यांना येऊं नये अशा प्रकारें तिला वागावं लागत होतं.

आणि तसं वागतां वागतां तिची जखम अगदीं सावकाश का होईना पण बरी होत होती. तिच्या प्रकृतीची काळजी वाटून भाऊंनीं तिला औषध घ्यायला लावलं होतं. त्याचाहि परिणाम झाला होता. दोन महिन्यांच्या अवधींत तिचा तोल पुष्कळ सांवरला होता. "तुझ्या ताईला कांहीं झालेलं नाहीं" असं डॉक्टर अजयकडे पाहून प्रत्येक वेळीं म्हणत असत... आजहि ते तसंच म्हणाले होते.

पार्टिशनच्या पलीकडे अजय डॉक्टरांशीं कांहीं तरी बोलत होता. ते त्याची चेष्टा करून मोठमोठ्यांदा हंसत होते. ती बाहेरच्या कोचावर बसली होती.

अजय बाटली घेऊन बाहेर आला, इतक्यांत घरचा गडी आला व म्हणाला, "भाऊंनीं लौकर बोलावलंय. घरीं पाहुणे आलेत."

तिनं विचारलं, "कोण रे?"

"ते कोण इनामदार आहेत ना, ते" गड्यानं सांगितलं. "भाऊंनीं मला सायकलवरून धाडलं, तुम्ही औषध घेऊन कदाचित् बाजारांत जाल म्हणून. बाजारात जाऊं नका, आधीं घरीं या, असं भाऊंनीं सांगितलं आहे."

गडी परत जाऊं लागला, तेव्हां अजयनं त्याला विचारलं, "माझ्यासाठीं गलोल आणला आहे का रे इनामदारांनीं?"

"आणलाय तर! आल्याबरोबर त्यांनीं तो खिशांतून काढला आणि विचारलं, अजय कुठें आहे?"

अजयनं एकदम आनंदानं उडी मारली आणि औषधाची बाटली उषाजवळ देऊन तो गड्याला म्हणाला, "मी तुझ्याबरोबर सायकलवरून येणार. ताई येईल मग सावकाश टांग्यांतून. इनामदारानीं मला गलोल आणला आहे. आतां आज मी चिंचा काढायला जाणार. चल रे!" त्यानं गड्याचा हात धरून दवाखान्याच्या पायऱ्यांकडे त्याला ओढीतच नेलं. सायकलच्या दांड्यावर तो चटकन् चढून बसला आणि सायकलची घंटा वाजवून उषाला म्हणाला, "ताई, मी जातों ग पुढें. तूं पण लौकरच ये माझा गलोल पहायसाठीं. मी सांगतों इनामदाराना—" सायकल निघून गेली. त्याचे पुढचे शब्द उषाला ऐकू आले नाहींत.

पण टांग्यांत बसण्यासाठीं ती जेव्हां पायऱ्या उतरून रस्त्यांत आली तेव्हां तिच्या तोंडावर हास्य होतं. या इनामदारांनीं अगदीं अल्पावधींत अजयला कसा एवढा लळा लावला असं तिच्या मनात येत होतं...एकट्या अजयलाच नव्हे, तर घरांतल्या साऱ्याच माणसांना. भाऊंची आणि नंदगढच्या या प्रभाकरपंत इनामदारांची ओळख अगदीं नुकती नुकती झाली होती. नंदगढशेजारच्या मोठ्या शहरांतल्या एका हायस्कूलचा हीरकोत्सव होता, व व्याख्यानासाठीं भाऊ गेले होते. या शाळेच्या चालकांपैकीं प्रभाकरपंत प्रमुख होते. त्यांनीं भाऊंची अशी कांहीं व्यवस्था ठेवली होती व आपल्या सौजन्यपूर्ण वागणुकीची अशी कांहीं छाप भाऊंवर टाकली होती कीं भाऊंचा आणि त्यांचा एकदम स्नेह जमला होता. प्रभाकरपंत कॉंग्रेसच्या कामानिमित्त वरचेवर पुण्यास येत. आतां ते केव्हाहि आले तरी भाऊंना येऊन भेटत. भाऊ त्यांना म्हणत, "तुम्ही आमच्याकडेच उतरायला कां येत नाहीं?" ते हंसून म्हणत, "उतरण्यातच काय आहे मोठंसं? आणि नुसता भेटायला आलों तुम्हाला तरी चहाच्या निमित्तानं आई इतकं खायला घालतात कीं चार वेळां जेवल्यासारखं वाटतं!" त्यांचा स्वभाव बोलका होता. आणि त्यांच्या वागण्यांत कमालीचं सौजन्य होत. त्यामुळें उषाची आईदेखील त्यांच्याशीं अगदीं मोकळेपणानं वागू लागली होती. अजयनं तरी त्यांच्याशीं भलतीच दोस्ती केली होती. मागच्या वेळेस ते आले असतांना त्यानं जेव्हां त्यांच्याजवळ गलोलची मागणी केली होती तेव्हां ते त्याला म्हणाले होते, "माझ्याबरोबर आमच्या नंदगढला चल. एक सोडून दहा गलोल देईन तुला." तें ऐकतांच अजय त्यांच्याबरोबर जायला निघाला होता. त्याची आई हंसून म्हणाली होती, "ए वेड्या!". सारींजणं हंसलीं होती. त्यांनीं कां हंसाव तें न समजल्यामुळें अजयनं प्रभाकरपंतांकडे पाहिलं होतं. त्यांनीं त्याला जवळ घेऊन म्हटलं होतं, "पुढच्या वेळेस येतांना मी तुझ्यासाठीं गलोल करवून घेऊन येईन हं." ते गेल्याच्या दुसऱ्याच दिवसापासून अजय रोज भाऊंना विचारूं लागला होता, 'इनामदार केव्हां येणार?' त्याचा तो प्रश्न म्हणजे घरांतला एक हंसण्याचा विषय होऊन बसला होता...

ती घरीं जाऊन पोंचली तों अजयनं प्रभाकरपंतांना मागच्या अंगणांत ओढून नेलं होतं; आणि गलोल मारण्याचा पहिला धडा तो त्यांच्याकडून घेत होता. त्याला त्यांनीं कसंबसं ओढून परत घरांत आणलं. उषाची आई त्यांच्याकडे बघत म्हणाली, " आतां चिंचा पाडून घरीं आणण्याखेरीज अजयला दुसरं कांहीं सुचेल म्हणतां ? तो चिंचा खाईल, पाणी पिईल, अन् खोकूं लागेल. "

प्रभाकरपंत म्हणाले, " एवढंच ना ? तुम्ही कांहीं काळजी करूं नका. माझे दादा वैद्य आहेत. त्यांच्याकडून खोकल्यावर रामबाण गोळ्या आणून देतों म्हणजे झालं. " ते हंसले; व मग चटकन् आठवण झाल्यासारखी चर्या करून उषाकडे पाहून म्हणाले, " अरे हो, बरी आठवण झाली. आमच्या दादांच्याकडून तुमच्यासाठीं औषध घेऊन आलों आहे मी. "

उषा म्हणाली, " माझ्यासाठीं ? मला काय झालं आहे ? "

कोचावर बसतां बसतां प्रभाकरपंत उषाच्या आईकडे पाहून म्हणाले, " मागच्या वेळेस यांनीं सांगितलं होतं मला, तुम्हांला काय झालंय तें. त्यांना आणि भाऊंना फार काळजी वाटते तुमच्या तब्येतीची—"

उषा पुटपुटली, " आतां या वेडेपणाला काय म्हणायचं ? "

" वेडेपणा म्हटलंतच कीं ! आणखी काय म्हणायचं ? "

उषाला हंसूं आलं. ती पुटपुटली, " तसं नाहीं— "

खिशांतल्या पुड्या काढून टेबलावर मांडीत ते उषाच्या आईला म्हणाले, " सात दिवसांच्या आणल्या आहेत हं. दुधांतून घ्यायच्या— "

उषानं त्यांना विचारलं, " अहो, पण औषध आणतांना मला काय झालंय म्हणून सांगितलंत आपल्या दादांना ? मला कोणतं दुखणं झालं आहे म्हणून सांगितलंत ? तुमच्या दादांनीं मला डोळ्यांनीं पाह्यलंसुद्धां नाहीं आणि त्यांच्याकडून या पुड्या आणल्यात तुम्हीं ? कशावर आहे हें औषध ? "

प्रभाकरपंत म्हणाले, " तुमच्या दुखण्यावर नाहींच हो. तुमच्या आईना व भाऊंना तुमच्याबद्दलच्या काळजीचं दुखणं झालंय ना ! त्यांच्या त्या दुखण्यावर हें औषध आहे असं समजा. फक्त त्यांच्याऐवजीं तुम्हीं घ्यायचं. "

तें ऐकून साऱ्यांनाच हंसूं आलं. मग चहा घेऊन येण्याच्या निमित्तानं उषा तेथून पळालीच.

हळूंहळूं उषाच्या घरांत त्यांचा उल्लेख इनामदार या शब्दानं होईनासा झाला, प्रभाकरपंत असा होऊं लागला. भाऊ त्यांना 'अहो जाहो' म्हणत असत; पण प्रभाकर एके दिवशीं त्यांना म्हणाला, " तुम्ही मला प्रभाकरपंत म्हणतां त्याचा मला फार संकोच वाटतो. माझ्या नांवापुढचा पंत काढून टाका. "

भाऊ म्हणाले, " मी तुमच्या शाळेच्या समारंभाला आलों तेव्हां सारेच लोक किती अदबीनं वागत होते तुमच्याशीं तें पाहिलंय मीं. तुम्हांला सगळेच लोक प्रभाकरपंत म्हणतात. "

तो म्हणाला, " पण तुम्ही नका म्हणूं. "

भाऊंनीं हंसून विचारलं, " मग काय म्हणूं ? "

" प्रभाकर वाईट आहे काय ? "

" वाईट कोण म्हणेल ? " भाऊंनीं विचारलं; व त्यांच्या शब्दांचा दुहेरी अर्थ लक्षांत आल्यावर प्रभाकरनं हंसतां हंसतां उषाकडे पाहिलं.

ती हसली तेव्हां त्याला बरं वाटलं. आणि त्याच्या लक्षांत प्रथमच आलं, कीं आतांशा तिनं हसावं म्हणून आपण नेहमीं वाट पाहात असतों. तिच्या हंसण्याची तऱ्हा इतरांपेक्षां थोडी वेगळी असल्याच त्याला आढळून आलं होतं. तिच्या तोंडावर हंसू फुटे, मधेच तिनं तें रोखल्यामारखा भास होई, मग तें पुन्हां उमललेलं दिसे. अशी तऱ्हा त्यानं कुठें पाहिली नव्हती. ती त्याला फार मोहक वाटली. आणि दोन हप्त्यांनीं प्रगट होणारं तें मोहक हास्य पाहण्यासाठीं तिच्याकडे वरचेवर नजर वळविल्यामुळें तिच्या रूपाकडे त्याचं लक्ष अधिकाधिक जाऊं लागलं. ती फारच देखणी आहे ही गोष्ट त्याच्या लक्षांत जास्त जास्त येऊं लागली. भाऊंशीं बोलतांना डोळयांच्या कोपऱ्यांतून तो तिरपी नजर टाकी तेव्हां दिसणारीं तिचीं गोरींपान पावलं अन् मांडीवरच्या साडीच्या चुण्यांशीं चाळा करणारे तिचे सुकुमार हात, कांहीं तरी निमित्तानं तो तोंड तिच्याकडे वळवी तेव्हां दिसणारा तिच्या गळयाखालचा उघडा भाग आणि पदराखालून ओझरते

दिसणारे घट्ट चोळीच्या बाह्यांनीं शोभणारे तिचे बाहू, दृष्टि आणखी वर नेली कीं दिसणारे तिचे तरतरीत नाकडोळे, त्या डोळ्यांतलं चांचल्य व स्थिरता, खेळकरपणा आणि गांभीर्य यांचं अवर्णनीय मिश्रण, किंचित् उंचट हाडांच्या ठेवणीमुळें चोपल्यासारखे भासणारे गाल, दाट केसांच्या वलयांतून डोकावणारीं कानांचीं लालसर टोकं, अशा तिच्या अंगावर डंवरलेल्या सौंदर्याकडे तो वारंवार नजर टाकून घेई. तिच्या देखणेपणाची सीमा कुठें झाली आहे तें ठरवावंसं त्याला वाटे. आणि मग त्याची चोरटी नजर तिच्या ओंठांवर स्थिर होई व तो मनाशीं म्हणे, 'इथे!'. ज्या तिच्या ओठावर तिचं हास्य दोन हप्त्यांनीं प्रगट झालेलं त्याला दिसत असे, त्या ओठांची ठेवण आणि पुष्टता म्हणजे तिच्या स्वरूपाच्या लाघवाची अन् नाजुकपणाची परिसीमा होती. त्यांकडे पाहिलं कीं त्याला वाटे, हिचे हे ओंठ हुबेहुब कशासारखे तरी आहेत. कशासारखे तें मात्र त्याला आठवत नसे. पण एक दिवस त्याला आठवलं. नंदगढच्या त्याच्या वाड्यांत मागच्या अंगणांत वेलींवर पिकलेलीं तोंडलीं त्यानं पुष्कळदां पाहिलीं होतीं! हुबेहुब त्यांसारखे होते तिचे ओठ! त्याला वाटलं, तिला सांगावं...पण त्यानं तो विचार आंवरून धरला...असं कांहीं बोलण्याइतपत तिची त्याची सलगी अजून झाली नव्हती...

अगदीं प्रथम तो भाऊंकडे येऊं लागला, तेव्हां नव्यानं ओळख झालेल्या घरांतल्या तरुण मुलीशीं ज्या दूरत्वानं वागायला हवं तें त्यानं साहजिकच आपल्या वागण्यांत ठेवलं होतं. शिवाय मोठ्या शहरांतल्या कॉलेजांत शिकलेल्या तरुणीबरोबर बोलण्यासाठीं जी नागरी कुशलता आवश्यक असते ती आपल्या अंगीं विशेष नाहीं, या जाणिवेनं तो थोडासा संकोचला होता. प्रोफेसरसाहेबांची मुलगी विलक्षण देखणी आहे खरी येवढीच त्याच्या मनाची, ती त्याला प्रथम दिसली त्या वेळची, प्रतिक्रिया होती. तिच्याशीं बोलण्याची उचल त्याच्या मनानं केली नव्हती. पुढें कधीं आपण तिच्याशीं संकोच सोडून बोलूं असंहि त्याला वाटलं नव्हतं... पण नंतर भाऊ आणि उषाची आई, या उभयतांनीं त्याच्याशीं अशा कांहीं रीतीनं वागायला सुरुवात केली, कीं त्याचा संकोच नाहींसा होऊन त्याचा मूळचा मनमोकळा स्वभाव प्रगट होऊं लागला; आणि त्या दोघांशीं

ज्या घरोब्यानं तो वागे त्याच घरोब्यानं तो उषाशींहि बोलूं चालूं लागला. मुद्दाम म्हणून तिच्याशीं जपून वागलं पाहिजे, असं त्याला वाटेनासं झालं. तिच्या सौंदर्याचा त्याच्या मनावर जो परिणाम झाला होता, त्यामुळें ती समोर असली कीं त्याला गोंधळल्यासारखं होई. मनाचा हा गोंधळ भाऊंच्या अगर उषाच्या आईच्या लक्षांत येऊं नये अशी दक्षता तो घेई. त्याला वाटे, त्यांच्या ध्यानांत तो येत नसावा. एखादे वेळीं त्याला वाटे, आला तर आला. पण उषाला मात्र आपली अवस्था कळतां कामा नये अस त्याच्या मनांत येई. जी स्त्री आपल्याला हवीशी वाटते तिच्या लक्षांत आपलं मनोगत येऊं नये असं पुरुषाला वाटायला लावणारी प्रणयाची एक चमत्कारिक पहिली अवस्था असते. या अवस्थेत प्रभाकर अजून होता. तो फक्त तिच्या सौंदर्याचा विलास चोरट्या नजरेनं पण डोळे भरून पाही. तें पाहतां पाहतां मनांत येणारे विचार मनांतच ठेवी. कांहीं बोलण्याचा मोह झाला तरी तो स्वतःशीं म्हणे, 'अंहं, हिची माझी इतकी सलगी अजून झालेली नाहीं'; आणि जें बोलावंसं वाटलं तें बोलतां न आल्यामुळें नाराज झालेल्या आपल्या मनाला तो पुढें म्हणे, 'उतावीळ होऊं नकोस, जरा थांब'...

एकदां तो भाऊंशीं बोलत बसला असतांना त्यांच्या कॉलेजांतले चार पांच प्रोफेसर कांहीं कामासाठीं त्यांच्याकडे आले. भाऊंनीं त्याची सगळ्यांशीं ओळख करून दिली. पण त्यांची अन् भाऊंचीं कॉलेजांतल्या कांहीं प्रकरणाविषयींचीं बोलणीं सुरू झालीं तीं लवकर संपणार नाहींत असं वाटल्यावर तो हळूच उठला, व अजय मधल्या दालनांत अभ्यास करीत होता त्याच्याजवळ बसून भागाकाराचं उदाहरण सोडविण्यांत त्याला मदत करूं लागला. मंडळी गेल्यावर भाऊ आंत आले व त्याला म्हणाले, "आमचीं बोलणीं फार लांबलीं, माफ करा हं. पण तुम्ही बसलां असतां तरी कांहीं हरकत नव्हती. आमचं कांहीं गुप्त खलबत चाललेलं नव्हतं. उठून कां आलांत ?"

"उठून आलों हें दिसायला वाईट नाहीं ना दिसलं ?"

तितक्यांत उषा आपल्या खोलीच्या दाराशीं आली, तिच्याकडे अर्धवट पहात भाऊ म्हणाले, "छे छे, तसं नाहीं; पण तुम्ही बसलां असतांत तरी चाललं असतं."

प्रभाकर म्हणाला, "खरं सांगू ? मोठमोठीं शिकलेलीं माणसं जमलीं, कीं त्यांच्यांत बसण्याचा मला संकोच वाटतो. किती झालं तरी आम्ही गांवढळ शेतकरी माणसं. आमची योग्यता आहे काय विद्वान् माणसांत बसायची ?"

भाऊ म्हणाले, "असं मी नाहीं तुम्हांला म्हणूं देणार. तुमच्या शाळेच्या समारंभाला मी आलों होतों, तेव्हांचं तुमचं भाषण किती सुंदर झालं तें मीं उषाला कितीदां सांगितलं तें विचारा."

भाऊंच्या बोलण्याचा फायदा घेऊन प्रभाकरनं उषाकडे पाहिलं. ती हंसली. तो म्हणाला, "भाषणाच नका सांगूं भाऊसाहेब. गेलीं चौदा वर्षं या कॉंग्रेसच्या कामांत आहे. जिल्ह्याचं पुढारीपण लोकांनीं माझ्यावर लादलंय, तेव्हां भाषणं रेटायची आतां संवय झाली आहे. पण आमचीं व्याख्यानं म्हणजे काय, तोंडाला येईल ते बेगुमान बोलत सुटायचं."

भाऊ म्हणाले, "तोंडाला येईल तें नका म्हणूं. अंतःकरणांत जें तळमळीनं वाटतं तें बोलायचं असं म्हणा."

"तसं कां म्हणाना ! पण मुळांतली गोष्ट म्हणतों ती खरीच, कीं किती झालं तरी आम्ही गांवढळ शेतकरी !"

उषाला त्याच्या त्या बोलण्याची गंमत वाटली. आपण शेतकरी आहोंत असं तो वरचेवर बोलून दाखवीत असे. भाऊंकडून तिला कळलं होतं कीं तो कधीं कॉलेजांत गेला नव्हता. हायस्कूलात शिकत असतांना अठराव्या वर्षींच त्या वेळच्या राजकीय चळवळींत तो पडला होता, आणि तेव्हांपासून कॉंग्रेसचा एक एकनिष्ठ प्रचारक या नात्यानंच त्यानं आपलं आयुष्य घालविलं होतं. पण त्याला वाचनाची हौस होती. त्याची अभिरुचि सुसंस्कृत होती. पण तरी तो नेहमीं म्हणे, "कांहीं झालं तरी आम्ही गांवढळ शेतकरी !". खोलीच्या दारांत उभं राहिल्या राहिल्या उषा त्याच्याकडे पाहात राहिली. तिच्या मनांत आलं, याच्या स्वभावांतला सगळ्यांत मोठा गुण म्हणजे याचं सौजन्य ! त्याच्या गोऱ्यापान कमावलेल्या शरीराची सुदृढता जशी त्याला पाहतांच कुणाच्याहि नजरेंत भरण्यासारखी होती, तसंच त्याचं कमालीचं सौजन्य होतं. बोलण्यांतली अशी शालीनता तिला दुसऱ्या पुरुषांत दिसली नव्हती.

भाऊ प्रभाकरला म्हणाले, " बरं, उठून आलांत ते इथें मधल्या घरांत कां बसलात ? उषाच्या खोलींत बसायचं नाहीं ? "

प्रभाकर म्हणाला, " सांगितलं ना भाऊ, आम्ही साधे शेतकरी ! "

तें ऐकल्याबरोबर मात्र उषा म्हणाली " हं, पुरे पुरे हं ", आणि बापाकडे वळून तिनं म्हटलं, " मला लाजविण्यासाठीं हे असं बोलतात बरं का ! "

भाऊ म्हणाले, " मग त्यांना उलट लाजविण्यासाठीं आतां आपण तुझ्याच खोलींत बसून चहा घेऊं म्हणजे झालं. प्रभाकर, उठा पाहूं ; चला ताईच्या खोलींत ". प्रभाकर हंसत उठला. भाऊ पुढं म्हणाले, " तुम्ही बसा. मी टेबलावरचे कागद आवरून येतों. "

खोलींत गेल्यावर खुर्च्यांच्या मधोमध मांडलेल्या बैठ्या टेबलावरचीं पुस्तकं उषा उचलून ठेवूं लागली, आणि तें करतां करतां ती म्हणाली, " चहाचा ट्रे मांडायला जागा हवी, म्हणून पुस्तकं उचलतें बरं का. "

तो म्हणाला, " तें ओळखलं मीं. "

" नाहीं तर म्हणाल, शेतकरी जवळ येऊन बसला त्याचा विटाळ पुस्तकांना नको म्हणून आवरतें आहे. " असं म्हणतांना तिनं खालीं वांकल्या वांकल्याच त्याच्याकडे बघितलं आणि हास्य केलं.

तो म्हणाला, " हा मला उलट टोमणा वाटतं ? "

तिनं मान हालविली व हंसतां हंसतां म्हटलं, " आतां पहा बाई. "

तो म्हणाला, " तुम्हीच पहा. असे शब्दांचे आहेर आम्हांला करतां यायचे नाहींत. "

ती म्हणाली, " तें कां ? तुम्ही कांहीं कमी पटाईत नाहीं बोलण्यांत– "

तो म्हणाला, " तुम्ही सर्टिफिकेट देतां आहांत, तेव्हां पटाईत असेनहि बुवा. "

" यापूर्वी कधीं कुणाकडून मिळालं नव्हतं सर्टिफिकेट ? "

तो कांहीं उत्तर करणार होता, पण इतक्यांत ती त्याच्यापुढून दूर होऊन चहा आणायसाठीं गेली.

स्वयंपाकघरांत तिच्या आईनं पुढें केलेलं चहाचं साहित्य हातांतल्या ट्रेवर घेत ती उभी होती, तें दारांतून प्रभाकरला दिसत होतं. खोलींत तो एकटाच होता. तिच्याकडे टक लावून पाहण्याची अशी संधि त्याला पूर्वीं कधीं मिळाली नव्हती.

पुढच्या खेपेस तो आला तेव्हां एका मोटारींतून आला, व भाऊंना म्हणाला, "तुम्हांला सगळ्यांना घेऊन जायसाटीं आलों आहे."

भाऊंनीं विचारलं, "कुठें?"

तो म्हणाला, "प्रदर्शनाची जागा दाखवितों तुम्हांला."

भाऊंनीं आश्चर्यानं विचारलं, "प्रदर्शन?"

तो म्हणाला, "वा, तुम्हांला माहीतच नाहीं वाटतं? तुमच्या शहरांत खूप मोठं शेतकी प्रदर्शन भरायचं आहे. त्याला जोडून गुरांचंहि प्रदर्शन व्हायचं आहे. त्यांत माझ्या बैलांच्या दोन जोड्या मी ठेवणार आहे."

मग प्रदर्शनाच्या जागेकडे जातांना आणि गेल्यावरहि तो सारखा शेतीबद्दल आणि गुरांबद्दल बोलत होता. प्रदर्शनाच्या जागेंत गेल्यावर एका एंजिनपुढें उभं राहण्याची अजयला लहर आली व भाऊ त्याच्याबरोबर राहिले. त्यामुळें तो आणि उषा दोघंच बरींच पुढें गेलीं. त्यानं तिला विचारलं,

"माझ्या बडबडीचा कंटाळा आला असेल तुम्हांला?"

तिनं विचारलं, "माझ्या चेहऱ्यावरून वाटतंय कीं काय तुम्हांला?"

"चेहऱ्यावरून होय?" त्यानं अगदीं टक लावून तिच्याकडे पाहिलं, आणि मग तो म्हणाला, "तुमच्या चेहऱ्याकडे पाहून काय वाटतं तें सांगण्यासारखं नाहीं."

आधींच उन्हानं फुललेल्या उषाच्या चेहऱ्यावर त्याच्या त्या बोलण्यानं आणखीच फुलोरा आला. तिनं एकदम नजर वळविली आणि नेसण्याचा पदर उजव्या हातानं सरसावून डोक्यावरून घेतला. ती कांहीं बोलली नाहीं.

तो म्हणाला, " माझ्या बैलांचं मीं केलेलं वर्णन ऐकून तुम्हांला वाटलं असेल मी कांहीं तरी थापा देतों आहे. पण जोड्या आणीन तेव्हां तुम्ही पाहालच. पहिलं बक्षीस मिळवतील माझ्या जोड्या. "

प्रदर्शनाच्या निमित्तानं त्याचं येणं आणखी वरचेवर व्हायला लागलं. तो आपली नवी गाडी घेऊन येई, व बरोबर चलण्याबद्दल साऱ्यांना आग्रह करी. कधीं कधीं तीं सगळींच त्याच्याबरोबर जात. एखादे वेळेस एकटी उषा जाई. इतर मंडळी बरोबर असली कीं त्याचं बोलणं अगदीं निःसंकोच झपाट्यानं चाले. परंतु एकटी उषा बरोबर असली, कीं त्याला अजूनहि थोडं संकोचल्यासारखं होई. कारण त्याला स्वतःच्या अधिरेपणाचं भय वाटत असे. आपलं मनोगत वाजवीपेक्षां जास्त उघड करणारा एखादा उद्गार आपल्या तोंडून निघावा आणि तो उषाला आवडूं नये, असं होतां कामा नये असं त्याला वाटे. आतां प्रदर्शनाची जागा संपूर्ण तयार झाली होती. विजेचे दिवे लागले होते. स्टॉल्स भरूं लागले होते. ज्या दिवशीं प्रभाकरच्या बैलांच्या जोड्या स्टॉलमध्यें बांधल्या गेल्या, त्या दिवशीं तिला त्या दाखवून त्यानं विचारलं, " कशीं आहेत माझीं जनावरं ? "

ती म्हणाली, " अगदीं दृष्ट लागण्यासारखीं आहेत. जनावरांत असं सौंदर्य असूं शकतं याची मला कल्पना नव्हती. "

तो म्हणाला, " आमच्या मळ्यांतला एकेक खोंड आणि गोठ्यांतली एकेक गाय तुम्हीं बघायला हवी. मी स्वताला शेतकरी म्हणवितों तें स्वतःला कमीपणा घेण्यासाठीं असं मी वर वर दाखवितों खरं, पण अंदरकी बात ही आहे, कीं मी शेतकरी आहे याचा मला अभिमान वाटतो. तुमच्या या शहरांतल्या आयुष्याला काय करतां ? " आणि मग तो आपल्या शेता-विषयीं, मळ्याविषयीं कित्येक पिढ्यांच्या जुन्या वाड्याविषयीं बोलत राहिला.

एकदां तो ऐन तिन्हीसांजांच्या वेळेला आला. कॉलेजांत कुणाचंसं व्याख्यान होतं, त्यामुळें भाऊ कॉलेजांतून आले नव्हते. उषाची आई अजयला घेऊन बाजारांत गेली होती. घराच्या पुढच्या खोल्यांतले दिवे लागलेले नव्हते. दाराला आंतून कडी होती. दारावर थाप मारून त्यानं दोन तीन हांका मारल्या, पण ओ आली नाहीं म्हणून अखेर त्यानं खिडकीच्या गजांशीं तोंड लावून विचारलं, " घरांत कोणी आहे का ? "

उषा न्हाणीघरांत होती. बादलींत पडणाऱ्या नळाच्या पाण्याच्या आवाजांत तिला प्रभाकरचे शब्द ऐकू आले. तिनं एकदम चावी बंद केली आणि ती धांवत बाहेर आली. कडी काढतां काढतां तिनं विचारलं, "कोण आहे?", आणि बाहेरच्या व्हरांड्यांतला दिवा लावण्यासाठीं डाव्या हातचं बटण ओढलं.

प्रभाकरचं 'मी' असं उत्तर तिला ऐकूं यायला आणि दिव्याच्या प्रकाशांत तो उभा राहिलेला तिला दिसायला एकच गांठ पडली. तिच्या तोंडून एकदम उद्गार बाहेर पडला, "हें काय? या वेळेस?"

पुढें पावलं टाकून, दारांत उभं राहून तो म्हणाला, "कां! या वेळेस येऊं नये कीं काय?"

ती कांहीं बोलली नाहीं. त्यानं विचारलं, "सगळी मंडळी कुठें गली आहेत?"

"बाहेर."

"या वेळेस?"

"कां! या वेळेस बाहेर जाऊं नये कीं काय?"

आपला प्रश्न तिनं उलटविला हें पाहून त्याला अगदीं मनापासून हंसूं आलं. शाबासकीनं भरलेल्या नजरेनं तो तिच्याकडे पाहात राहिला. तिचे हात भिजले होते, केंसांतहि पाणी उडालं होतं, अंगावरचं नेसणं भिजून कमेरला चिकटलं होतं, साडीचीं टोकं वर खोंवल्यामुळें तिचे पाय उघडे होते ते तर पाण्यानं निथळत होते, थोडासा दम लागल्याप्रमाणें तिचा उरोभाग हालल्यासारखा वाटत होता...प्रभाकरच्या मनांत आलं, हिच्या सौंदर्याची ही शोभा कधीं पाहिली नव्हती. आणखी या शोभेचे प्रकार किती असतील? त्याला वाटलं, तिला म्हणावं फार सुंदर दिसतेस तूं!

तो आपल्याकडे टक लावून पाहात आहे असं लक्षांत आलं तेव्हां "धूत होतें" असं कांहीं तरी पुटपुटून उषा त्याच्यापुढून दूर झाली, आणि दारांतून वळून ती म्हणाली, "बसा हं. आलेंच! पांच मिनिटांत! चहा घेणार ना?" आणि ती आंतल्या बाजूकडे पळाली.

चहाचा ट्रे घेऊन ती पुन्हां खोलींत आली.

"फार नाहीं ना बसायला लागलं?" तिनं विचारलं.

कांहीं बोलण्याऐवजीं तो तिच्याकडे पाहात राहिला. तिच्या सौंदर्यानं आतां कांहीं निराळंच रूप घेतलं होतं. अगदीं काळी भोर मलमलीची साडी आणि काळयाच मलमलीचं चोळी–ब्लाऊझ तिनं घातलं होतं. त्या काळया वस्त्रांत तिच गोरं पान अंग दिव्याच्या प्रकाशांत उठून दिसत होतं. टॉवेलनं तोंड पुसल्यामुळें तिच्या तोंडावर लाली आली होती. आणि तिचे तळहात असे दिसत होते कीं जणुं तिनं ते लाल रंगांत बुडविले होते ! ती त्याच्या समोर बसली आणि म्हणाली, " आई आणि भाऊ येतीलच आतां इतक्यांत."

तो मनाशीं म्हणाला, ' न येतील तर बरं होइल '. चहा पितां पितां तो उठला आणि बाहेर जाऊं लागला. तिनं विचारलं, " हें काय ? " तो म्हणाला, " एक गंमत घेऊन आलों आहे. " तो बाहेरच्या मोटारीकडे गेला आणि परत आला, तेव्हां त्याच्या हातांत एक मोठी करंडी होती. त्यानं तिच्या हातांतला टॉवेल घेऊन सतरंजीवर पसरला आणि करंडी रिकामी केली. टॉवेलवर पडलेल्या गुलाबाच्या गेंदांचा ढीग पाहून उषा म्हणाली, " अग बाई ! ! किती सुंदर आहेत हो ! असे गेंद मीं जन्मांत पाहिले नव्हते ! "

तो म्हणाला, " तुम्हांला आवडतात असं आई परवां म्हणाल्या. म्हणून घेऊन आलों. "

ती म्हणाली, " आई काय काय सांगत असते माझ्याबद्दल तुम्हांला कुणास ठाऊक ! "

तो म्हणाला, " तुमच्याविषयीं वाईट मत व्हावं असं कांहीं त्या सांगत नाहींत. तुम्ही फिकीर नका करूं. "

" मग हरकत नाहीं. माझ्याविषयीं तुमचं चांगलं मत असलं म्हणजे झालं. " असं म्हणतां म्हणतां तिनं खालीं वांकून ढिगांतले दोन गेंद उचलून घेतले व ते आपल्या कानशिलांवरच्या केंसाजवळ धरून त्याला विचारलं, " या रंगांची शोभतील ना माझ्या केंसांत ? "

तो म्हणाला, " मी कांहीं या विषयांतला दर्दी नाहीं. पण मला असं वाटतं, कीं साऱ्याच रंगांचीं घालून पहावींत—"

" एकदम कशीं साऱ्या रंगांचीं घालतां येतील ? "

" हो, तेंहि खरंच. मग रोज निरनिराळ्या रंगांचीं घालून पहावींत. "

" पण तोंवर तीं सुकून जातील. "

तो हंसला व म्हणाला, " मग याला एकच उपाय आहे बुवा. "

" कोणता ? "

" तुम्हांला आमच्या मळ्यावर घेऊन जायचं, आणखी– "

ती एकदम मान वेळावून म्हणाली, " वा महाराज! हें खूप काढलंत! "

त्यानं विचारलं, " कां ? मी म्हणतों तें अगदीं अशक्य आहे कीं काय ? "

ती बोलली नाहीं. जिभेनं 'चक्' असा आवाज करून मान हालवीत ती खालीं बघूं लागली.

तो म्हणाला, " उषा ! इकडे बघ. "

त्याच्या तोंडची ती एकेरी हांक ऐकून ती चमकली नाहीं. जणुं केव्हां तरी तो तशी हांक मारणार हें तिला पुष्कळ दिवस समजलं होतं. पण ती जशी चमकली नाहीं, तसं तिनं त्याच्याकडे पाहिलंहि नाहीं.

तो हलकेच म्हणाला, " इकडे बघ ! मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे—" त्याच्या स्वरांत कंप होता. तिचा हात धरावा अशी मनांतली इच्छा पुरी करावी कीं न करावी याबद्दलचा निर्णय करतां येत नसल्यामुळें त्याची छाती धडधडत होती. त्यानं पुन्हां म्हटलं, " मला तुझ्याशीं बोलायचं आहे. "

उषानं वर पाहिलं नाहीं. मघांप्रमाणेंच ती खालीं बघून मान हालवीत होती, आणि आतां तिनं आपला खालचा ओंठ दातांनीं दाबून धरला होता.

—*—

# प्रकरण नववं

थिएटर माणसांनीं अगदीं फुलून गेलेलं होतं. सुभाषबाबूंच्या सैन्यां-तल्या परत आलेल्या लोकांच्या मदतीसाठीं नाटकाचा प्रयोग होता. प्रभाकरच्या आग्रहावरून भाऊंनीं चार तिकिटं घेतलीं होतीं. पहिल्या रांगेंतल्या कोचांवर बडी बडी मंडळी बसली होती. मागच्या दुसऱ्या रांगेंत बसलेल्या उषाच्या पुढच्याच जागेवर एक उच्च लठ्ठ गृहस्थ होते, त्यांच्या मानेवरच्या लठ्ठ वळकट्या आणि गुळगुळीत टकलाचा वाटोळा चांदवा तिला सारखा पाहावा लागत होता, व मान पुष्कळशी उजवीकडे कलती करून तिला रंगभूमीकडे बघावं लागत होतं, आणि तशी ती झुकली कीं प्रभाकरच्या खांद्याचा तिच्या कानशिलाला स्पर्श होत होता. तो वरचेवर उठून जात होता व येऊन बसत होता. कारण प्रयोग घडवून आणण्यांत त्यानं पुढाकार घेतला होता, व त्याला व्यवस्था पहावी लागत होती. येऊन बसतांना दर वेळीं तो तिच्या कानाशीं तोंड नेई, व तिला कांहीं तरी सांगून हंसवी. मधला एक अंक सपल्यावर स्टेजवर कोणाचं तरी अध्यक्षीय भाषण झालं, तेव्हां तो त्यांच्या शेजारीं बसला होता आणि पुन्हां पुन्हां तिच्याकडे पाहात होता. पुढचा अंक सुरू झाल्यावर मधेंच त्यानं तिला ओढून स्टेजवर नेलं आणि तो आणि तीच नाटकांतलीं भाषणं म्हणूं लागलीं. प्रेक्षकांच्या लक्षांत तें आलं नाहीं, पण भाऊंजवळ बसलेला अजय ओरडला, ‘ भाऊ ! ती पहा ताई !’. त्यांनीं त्याला शुः करून गप्प बसविलं. प्रभाकरनं अर्जुनासारखा पोषाख केला होता. त्याच्या हातांत धनुष्यबाण होता. तो तिला म्हणत होता, ‘ माझ्या प्रेमाचा स्वीकार केलास तर नंदगढच्या साऱ्या यादवांना आनंद होईल. नंदगढच्या गोकुळांतल्या साऱ्या गाई...’ ती पुन्हां पुन्हां म्हणत होती, ‘ प्रभाकर, मीं एकदां जगन्नाथवर प्रेम केलं आहे. त्याच्या आठवणी विसरून, किंवा न विसरतां, तुला अन् मला स्वतःला मी सुखी करूं शकेन कीं नाहीं तें मला ठरवितां येत नाहीं. तुझ्यावर

माझं मन जडलेलं आहे. पण मला थोडा आणखी अवधि दे...' मग एकदम मंगलवाद्यं वाजूं लागलीं होतीं...तिच्या डोक्यावर जिकडून तिकडून कुंकवानं रंगलेले तांदूळ फुलांचा सडा झाल्याप्रमाणें टपटप पडले होते...एका पलंगाशेजारीं ती उभी होती. तिचं अंतःकरण केवढ्यांदा तरी धडधडत होतं. त्याचीं पावलं वाजलीं. तो जवळ आला. त्याचीं बोटं तिच्या उजव्या कुशीला लागलीं. कमळाची पाकळी हळूंच उचलावी त्याप्रमाणें त्यानं तिची हनुवटी वर केली. "पिकलेल्या तोंडल्यासारखे तुझे हे लाडके ओठ..." असे त्याचे शब्द तिला ऐकूं आले. त्याचा श्वास तिच्या श्वासात मिसळला. तितक्यात दाराबाहेर वाजत्रीं वाजूं लागलीं. दत्तंभटाचा खणखणीत आवाज ऐकूं आला "...अग्निहोता... प्रजोत्पादनाय...गृह्णामि...म्हणा, गृह्णामि..." आझाद हिंद फौजेचं गीत सुरूं झालं...थिएटरांत टाळ्यांचा कडकडाट झाला. ती प्रभाकरला म्हणाली, 'सोडा! मला सोडा!'... ती विंगकडे धांवली, पण शालूचं टोक तिच्या पायांत अडखळलं आणि ती रंगभूमीवर पडली. तिनं घाबरून डोळे उघडले आणि इकडे तिकडे पाहिलं...

तिनं खरोखरीच डोळे उघडले, तेव्हा तिच्या लक्षांत आलं कीं त्याआधींच डोळे उघडण स्वप्नांतलं होतं. ती स्वतःशींच हंसली. तिनं आतां जागेपणीं पाहिल तेव्हां तिला दिसून आलं, कीं इनामदारांच्या वाड्यांतल्या पश्चिमेकडच्या माडीवरील खोलींत ती आपल्या पलंगावर एकटीच पडली होती. टेबलावरचा दिवा तिनं बारीक करून ठेवला होता, तो तसाच जळत होता. खोक्यांतल्या घड्याळांत पहाटेचे साडेचार वाजून गेले होते. प्रभाकर अजून आला नव्हता...अंगावरची शाल टाकून ती पलंगावरून उतरली, आणि खिडकीशीं गेली...विष्णुमंदिरापुढच्या मंडपाच्या छताखालची रोषणाई तिला दिसली. उंच आवाजांतले पोवाडयाचे सूर आणि थबक् थबक् थाप थाप असे डफाचे बसकट आवाजही तिला ऐकूं आले... ती मनाशीं त्रासून म्हणाली, 'अजून यांचं संपलं नाहीं! किती वाट पाह्यची माणसानं!'...तिला जोराची जांभई आली. प्रभाकरच्या मिठींत शिरल्यावांचून निजण्याची तिची इच्छा नव्हती. पण तिला झोंप मात्र भलतीच आली होती. तिचं सबंध अंग आंबून गेलं होतं. स्वातंत्र्याच्या

उत्सवाची धांदल सूर्योदयापासून जी सुरू झाली होती ती अजूनहि संपली नव्हती. सबंध दिवसभर तिनं धांवपळ केली होती. म्हातारे गांवकरी सारखे म्हणत होते, 'नंदगढावर असा उत्सवाचा थाट जन्मांत कधीं झाला नव्हता. इनामदारांनीं कमाल करून सोडली !...'

भल्या पहाटेस विष्णुमंदिरापुढें उभारलेल्या मंडपाच्या कमानीखालीं चौघडा झडूं लागला होता, आणि शहरांतून मुद्दाम आणवलेल्या रामू, लखू या प्रसिद्ध गुरवांच्या जोडीनं फुंकलेल्या सनयाचे मंजुळ स्वर गांवाच्या छोट्या पठारावर भरून राहिले होते. त्या घटकेपासून गांवांत जी आनंदाची गडबड उठली होती, ती सारखी वाढतच गेली होती. आदल्या दिवसापासूनच साफसफाई, रंगरंगोटी झालेल्या घराघरापुढचीं आंगणं सारवलीं गेलीं, रांगोळ्या घातल्या गेल्या. सीमेवरच्या दरीच्या कड्यावरील महारवाड्यांतल्या साऱ्या झोंपड्यांपुढेंसुद्धां सडासंमार्जन झाल, हळदी-कुंकवाचे पट्ट घातले गेले. तिरंगी झेंडे घरटीप वाटले गेले होते, ते उंच काठ्यांवर फडफडूं लागले. छोटीं मोठीं मुलं शाळेंत हजर झालीं, मंदिरा-पुढच्या मंडपांत जाण्यासाठीं मास्तर त्यांच्या रागा बनवूं लागले. देवरं, भितरं, डोरल, सुपलं, खिटणी, शिपली, बोरगांव, दूधगांव अशा नंदगढच्या पंचक्रोशींतल्या लहान गांवांतून प्रभाकरचे स्वयसेवक आधीं दोन दिवसां-पासून फिरून आमंत्रण देऊन आले होते, त्या खेड्यांतलीं माणसं शिलंगणाला निघाल्याप्रमाणें ठेवणींतले कपडे घालून, कुणी चालत तर कुणी बैलगाड्यातून येऊन दाखल होऊं लागलीं. मंडपापुढे हलकेहलके मोठा थवा जमा झाला. 'निशाणी' शहरांतून प्रभाकरच्या खास आमंत्रणावरून कांहीं बडीं बडीं माणसं आलीं. तंबाखूचे प्रसिद्ध व्यापारी सिद्रामाप्पा, दारूचे मक्तेदार बन्सीलाल परदेशी, पी. डब्ल्यू. डी. चे कंत्राटदार हसनअलि शेठ, अशीं माणसं एका लॉरींतून आपापल्या लवाजम्यानिशीं आलीं. दत्त-भटांनीं मुद्दाम आठ दहा वैदिक आणले होते, त्यांनीं मंडपापुढें उभारण्यांत येणाऱ्या तिरंगी झेंड्याची वैदिक मंत्रांनीं पूजा केल्यावर झेंडा वर चढविण्यांत आला. सलामीचा समारंभ पार पडल्यावर मंडपांत सभा झाली. भाषणं झालीं, निशाणीहून मिठाई आणून ठेवली होती ती वांटण्यांत आली. मग शाळेंतल्या मुलांची कवाईत, संवाद वगैरे कार्यक्रम

आटपतां आटपतां दुपारचे बारा वाजले. त्यानंतर इनामदारांच्या वाड्यांत जेवणाच्या पंक्ती सुरू झाल्या. जवळ जवळ गांवजेवणच झालं. आसपासच्या खेड्यांतून आलेल्या लोकांत इनामदारांच्या जमिनी करणारीं जीं कुळं होतीं त्यांना जेवणाचं आमंत्रण होतं. पंक्तीमागून पंक्ती उठल्या, आणि साऱ्यांचा समाचार घेण्यासाठीं प्रभाकरबरोबर हिंडतां हिंडतां उषाचे पाय अगदीं टेकीस आले. महारामांगांच्या मुलांना कपडे वांटण्यांत आले. इनामदारांच्या वाड्याच्या सोप्यांत आणि आंगणांत जेवणावळीची ही धांदल तिन्हीसांज उलटून गेली तरी चालूच होती. रात्रीं मंडपांत प्रथम मंत्रजागर झाला. नंतर करमणुकीच्या कार्यक्रमासाठीं शहरांतून मुद्दाम माणसं आणलीं होतीं, त्यांचे कार्यक्रम सुरू झाले.

चांदीचीं सारीं भांडीं आवरून तीं कपाटांत ठेवून कुलपं लावून उषा मधल्या घरांत आली, तोंच प्रभाकर लगबगीनं आला आणि तिला म्हणाला, "हें काय, तूं आहेस तरी कुठें ?"

तिनं हंसून म्हटलं, "ही इथें आहे, दिसलें ना ?"

"किती शोधली तुला !"

"माझी आठवण आहे म्हणायची ! आज सबंध दिवसांत चार शब्द तरी माझ्याशीं एकीकडे बोललांत का ?"

तो म्हणाला, "माझी कशी धांवपळ चालली आहे ती पाहतेस ना ? आणि त्यांत भरीला तूं माझ्यावर रागावणार काय ? एवढा रात्रीचा कार्यक्रम आटोपला कीं सुटलों. बाकी कोणत्याच गोष्टींना तूं हजर नव्हतीस, पण या करमणुकीच्या कार्यक्रमाला तरी तूं यायला हवंस. मंत्रजागराच्या वेळेस आशीर्वादाच्या अक्षता टाकतांना दत्तंभटांनीं आईला विचारलं, "हें काय ? सूनबाई कुठें आहेत ?" आई त्यांना म्हणाली, "दिवसभरच्या रगाड्यानं दमली आहे. मीच तिला येण्याचा आग्रह केला नाहीं." तरी पण माझ्या एकट्याच्याच उपरण्यांत अक्षता टाकतांना दत्तंभटांनीं चेहरा जरासा नाराजच केला होता !"

तिनं हंसून विचारलं, "दत्तंभट आणखी कोणता नवा आशीर्वाद देणार होते मला ? आतां त्यांच्या आशीर्वादाची गरज नाहीं उरलेली."

तो म्हणाला, " म्हणजे काय म्हणतेस ? "

" तुम्हांला एक आनंदाची बातमी सांगायची आहे. " असं बोलतांना तिनं क्षणभरच त्याच्याकडे पाहून मान खालीं केली, पण तेवढ्यांत तिचे डोळे विलक्षण हर्षानं आणि कांहींशा शरमेनं चमकले असं त्याला घाटलं.

त्यानं चटकन् तिचा हात धरला आणि विचारलं, " सांग. "

तिनं हात सोडवून घेत म्हटलं, " आतां नाहीं. मग सांगेन. म्हणूनच म्हणतें मी फार दमलें आहे. मी निजतें. तुम्हीसुद्धां लौकर या. "

तो म्हणाला, " वा वा, असं करू नकोस. तिकडे मंडपांत चल. इनामदाराची सून दिसायला नको काय लोकांना ? "

ती म्हणाली, " म्हणजे करमणुकीबरोबर प्रदर्शनहि आहे वाटतं ? "

" चेष्टा पुरे झाली. चल पाहू लौकर. "

मग तिला त्याच्याबरोबर जावं लागलं होतं. परंतु कांहीं वेळ बसल्यावर तिला झोंप अगदीं आवरेना. तेव्हां ती त्याला म्हणाली होती, " मला जाऊं द्या ना आतां. बाबासाहेब आणि सासूबाई गेल्या तेव्हांच मी उठणार होतें, पण तुम्ही रागावाल म्हणून गेले नाहीं. पण आतां माझ्याच्यानं अगदीं बसवत नाहीं. " मग दादूला बरोबर देऊन त्यानं तिची रवानगी केली होती. तिनं थबकून त्याच्या कानात म्हटलं होतं, " लौकरच या हं. मी वाट पाहीन. माहीत आहे ना ? " तो म्हणाला होता, " फक्त हा एवढा पोवाडा संपस्तवर बसतों. तुझ्या मागोमाग आलोंच बघ. "...

आणि आतां पहाटेचे साडेचार वाजून गेले तरी तो आला नव्हता !...

उषाला हें कळत होतं, कीं मंडपातून उठून येणं त्याला कठीण होतं. सकाळपासून सुरू झालेल्या त्या साऱ्या उत्सवाचा सूत्रधार तो होता. देशाला स्वातन्त्र्य मिळालं याबद्दल नंदगढच्या लोकांनीं अगदीं अविस्मरणीय आनंदोत्सव केला असं साऱ्यांनीं म्हणावं अशी त्याची कित्येक दिवसांची इच्छा होती. ती पूर्ण करण्यासाठीं श्रम आणि पैसा यांजकडे त्यानं पाहिलं नव्हतं. तो साऱ्याना सारख सांगत होता, " हा आनंद केवळ एका दिवसा-पुरता साजरा करायचा नाहीं. तो आपल्याला कायमचा टिकवायचा आहे. आणि त्यासाठीं आपण सगळे एकमेकांचे भाऊ भाऊ आहोंत अशा भावनेनं

आपल्याला काम करायचं आहे. एकानं दुसऱ्याच्या मदतीला नेहमीं धांवायचं, ब्राह्मण, कुणबी, माळी, महार, मांग, मुसलमान हे भेद लक्षांत न ठेवतां साऱ्यांनीं सगळ्यांना मदत करायची आहे. आपल्या गांवांत हेवादावा, लांडीलबाडी राहतां कामा नये. आपल गांव नमुनेदार झालं पाहिजे. आपल्या गांवासारखीं सात लक्ष गांवं आपल्या देशांत आहेत. तीं सारीं नमुनेदार झालीं तरच आपल्याला मिळालेल्या स्वातंत्र्याचं सार्थक होईल. ही गोष्ट करण्याची शपथ घ्यायसाठीं आजचा उत्सव आहे." अशा प्रकारें साऱ्या गांवकऱ्यांना आजच्या उत्सवाचं मर्म त्यानं फिरून फिरून सांगितलं होतं. उत्सवांतल्या प्रत्येक कार्यक्रमावर त्यानं देखरेख केली होती... तो होता म्हणून सारं बिनबोभाट घडलं होतं. करमणुकीच्या या अखेरच्या कार्यक्रमांतून मधूनच उठून येणं त्याला कठीण होत...पण हे सारं कळत असूनहि तिला प्रभाकरचा राग आला होता.

पहांटेचा गार वारा अंगावर घेत, विष्णुमंदिरापुढच्या मंडपाचं रोषणाईनं उजळलेलं छत पाहात, त्या बाजूनं ऐकू येणारे पोवाड्याचे स्वर ऐकत उभं राहिल्या राहिल्या उषाच्या मनांत रागानं असहि येत होतं, कीं प्रभाकरनं लोकांसाठीं इतके श्रम कशासाठीं करावेत? हे श्रम सार्थकीं लागणार आहेत का? देशाला स्वातंत्र्य मिळाल्यामुळें आपल्यावर कोणती नवी जबाबदारी पडली त्याची जाणीव गांवकरी खरोखर ठेवणार आहेत का? हेवेदावे विसरून गुण्यागोविंदानं, बंधुत्वानं राहण्याची बुद्धि यांना होणार आहे का? "या माणसांना मायेनं सांगून कधीं समजायच नाहीं. यांना काठी दाखवून कामाला जुपायला हवं" या दादांच्या उद्‌गारांत अर्थ नव्हता काय?...या उत्सवांतल्या साऱ्या गोष्टी पार पाडण्यासाठीं दादांनीं अगदीं प्रभाकरच्या बरोबरीन पडेल तें काम केलं होत. परंतु घरांत विषय निघाला कीं ते बाबासाहेबांना म्हणत, "उत्सव थाटानं पार पाडण्यासाठीं हा प्रभाकर नाचतोय आणखी साऱ्यांना नाचवतो आहे. पण एका दिवसापुरतीची गंमत यापलीकडे यांत कांहीं अर्थ नाहीं. बघाल तुम्ही." प्रभाकरहि हंसून उत्तर देई, "बघाल तुम्हीहि"...माणसाच्या अंगच्या चांगुलपणावर त्याची दृढ श्रद्धा होती. तो नेहमीं सांगे गांधीजींपासून मी खरोखर कांहीं शिकलों असेन तर ही श्रद्धा; आणि आमच्या कॉंग्रेसचे पुढारी जे जे

करतील त्यांतून जनतेचं कल्याणच निर्माण होईल असं मला वाटतं तें या श्रद्धेमुळेंच. पाकिस्तान झालं, पंजाब आणि बंगाल या दोन प्रांतांचे तुकडे पडले तरी मला भय वाटत नाहीं तेंसुद्धां यामुळेंच ! "...

तिकडे मंडपांत पोवाड संपले असावेत. कांहीं वेळ उषाच्या कानांवर कसलीहि गडबड आली नाहीं. मग थोड्या वेळानं राष्ट्रगीताचे स्वर तिला ऐकूं आले. ' महात्मा गांधी की जय ' असे जयघोष उठलेले तिनं ऐकले. गर्दी मंडपाबाहेर पडली आणि लोक पांगूं लागले हें तिनं ओळखलं. तिनं टेबलावरच्या घड्याळाकडे पाहिलं. पांच वाजले होते. पुढं होऊन तिनं दिवा मोठा केला. कांहीं वेळ ती स्वस्थ उभी राहिली. पण मग तिच्या मनांत आलं, परत आल्यावर प्रभाकर नाहीं तरी दादा म्हणतील, " आतां कॉफी पाहिजे बुवा ! " तेव्हां ते दोघे येण्याच्या आंत ती तयार करून ठेवावी. ती कल्पना मनांत येतांच ती जिन्याकडे गेली. पण ती पुरत्या दोन पायऱ्या उतरून गेली नाहीं तोंच प्रभाकर जिन्याच्या खालच्या तोंडाशीं आलेला तिला दिसला. ती पायऱ्या चढली आणि खोलींत परतली. प्रभाकर वर आला आणि तिला म्हणाला, " कुठें निघाली होतीस ? "

ती म्हणाली, " तुम्हांला आणायला ! किती वाजले, बघा. "

प्रभाकरनं दाराला कडी लावली, तिला हातान धरून टेबलाकडे नेऊन घड्याळ उलटं फिरविलं, आणि तो म्हणाला, " आतां किती वाजले तें पाहायचं नाहीं. "

उषाला हंसू आलं. त्याच्या हातांचा स्पर्श झाल्याबरोबर दिवसभरचा सारा शीण तिचं अंग विसरून गेलं. त्याची मिठी आतां गळ्याभोंवतीं पडणार या अपेक्षेनं उठलेल्या रोमांचांनीं तिच्या अंगोपांगांना सुखाची लहर शिवून गेली. अंथरुणांत शिरल्यावर आपल्या उजव्या दंडावर तिचं मस्तक ओढून घेऊन तिच्या कानशिलावरचे केस मागं सारीत त्यानं विचारलं, " सांग. "

ती म्हणाली, " काय सांगूं ? "

" मघांशीं माजघरांत जें सांगितलं नाहींस तें. "

" तें ?—मी विसरलें आतां. कांहीं तरी खूण सांगा म्हणजे आठवतं का पाहतें. "

तो म्हणाला, " खूण ? फार आनंदाची बातमी आहे असं म्हणालीस–"

गुदगुल्या झाल्याप्रमाणें हंसून ती म्हणाली, " ती होय ? पण सांगायलाच हवी का ? तुम्हांला नाहीं ओळखतां येत ? " मघांशीं माजघरांत बोलतांना तिच्या डोळ्यांत ज्याप्रमाणें हर्ष आणि लज्जा यांचं मिश्रण चमकलं होतं, त्याप्रमाणेंच आतांहि चमकलेलं प्रभाकरला दिसल. ती कांहीं वेळ गप्प राहिली, आणि मग न बोलतां फक्त उजव्या हाताच्या बोटांनीं त्याच्या खालच्या ओंठांशीं खेळत राहिली.

तिचं बोट चावल्यासारखं करून त्यानं विचारलं, " सांगतेस ना ? "

तिनं एकदम त्याच्या कुशींत तोंड लपविलं आणि ती म्हणाली, " उद्यां सांगेन. "

त्यानं हलकेंच डाव्या हातानं तिची हनुवटी वर केली आणि म्हटलं, " नाहीं, आतांच सांगायला पाहिजे. "

ती हंसली आणि म्हणाली, " मीं न सांगितलं तरी तुम्हांला ओळखतां येत नाहीं काय तें ? "

तिच्या नजरेंत मघांपासून दोनदां दिसलेलं आनंद आणि शरम यांचं तें तेजस्वी मनोहर मिश्रण पुन्हां दिसल्यावर प्रभाकरच्या मनांत एकदम उलगडा झाला. तो हलकेंच पुटपुटला, " होय ? "

आणि तिनं फक्त ' होय ' अशा अर्थी मान हालविली आणि त्याला एकदम घट्ट मिठी मारली.

त्यानं तिचे पटापटा मुके घेतले. " आतां ? पुरे कीं ! " असं म्हणून तिनं त्याला दूर ढकलल्यासारखं केलं, तेव्हां तो मोठ्यांदा हंसला आणि समाधानानं पोट भरल्यासारखं ' आः ' असा उद्गार काढून स्वस्थ उताणा पडला. मनाशीं तो कोणताहि विचार करीत नव्हता. परतु आतां त्याच्या लक्षांत आलं होतं, कीं उषाकडून जी गोड बातमी त्याला आतां कळली होती ती वास्तविक त्यानं केव्हांच ओळखायला हवी होती. कारण गेल्या कित्येक दिवसांपासून त्याच्या आईनं उषाचं पहाटे उठणं बंद केलं होतं.

" आतां तूं जरा बेतानंच काम करीत जा " असं आईनं तिला म्हटलेलं त्याच्या कानांवर दोन तीन वेळां आलेलं होतं. तिला माहेरीं केव्हां पाठवायची, परत केव्हां आणायची याबद्दलचीं बोलणीं आई आणि बाबा यांच्यांत कुजबुजून चाललेलीं त्याच्या कानांवर आलीं होतीं... त्यानं उषाला जवळ ओढलं आणि विचारलं, " किती दिवस ही आनंदाची बातमी गुप्त ठेवली होतीस माझ्यापासून ? "

ती हलकेच पुटपुटली, " आतां हा चौथा महिना म्हणायचा. "

खोटा राग चर्येवर दाखवून त्यानं विचारलं, " इतके दिवस मला पत्ता लागू दिला नाहींत तुम्हीं ? "

" आधीं उगीच सांगत सुटायचं नसतं. "

" कां ? "

" पहिल्याच खेपेला सारं सुरळीत होईल अशी खात्री पहिल्या दोन तीन महिन्यांत सांगतां येत नाहीं—" असं ती त्याला समजून सागू लागली. पण लगेच ती अतिशय लाजून म्हणाली, " मला नका सांगायला लावू असल्या गोष्टी. पुरुषांनीं भलत्या चौकशा कशाला करायच्या ? मुख्य गोष्ट कळली, गप बसावं ! "

" बरं बुवा, आम्ही गप्प बसतों. " असं म्हणून तो मोठ्यांदा हंसला व त्यानं दोन्ही हातांनीं जवळ तिला ओढून घेतल. मग तो आणि ती किती वेळ तरी अगदीं स्तब्ध पडलीं होतीं... त्यानं पश्चिमेकडच्या खिडकींतून बाहेर नजर टाकली तों जिकडे तिकडे गडद अंधार पसरला होता. रात्रीचा काळोख आणि आभाळांतल्या ढगांचा काळा रंग एकमेकांत मिसळले होते. दोन तीन चांदण्या दिसत होत्या तेवढ्यावरूनच क्षितिजा-वरचं आभाळ कुठें आहे तें सांगतां येत होतं... त्याच्या लक्षांत आलं, अधिक श्रावणांतली अमावास्या आज होती. देशाच्या स्वातंत्र्याचा पहिला उत्सव अमावास्येच्या चमत्कारिक योगावर झाला होता. पण साऱ्या देशभर लोकांनीं उत्सवाची रोषणाई करून सृष्टींतला अंधार नाहींसा केला होता. त्याच्या स्वतःच्या गांवांतला—नंदगढचा—उत्सव अगदीं त्याच्या मनाजोगा झाला होता. एकमेकाविषयींचं प्रेम, सहकार्य, बंधुभाव, हौस इत्यादि

गोष्टींनीं साऱ्या गांवकऱ्यांचीं अंतःकरणं उचंबळून आलीं होतीं. स्वातंत्र्याच्या काळांत त्याच्या गांवांच भवितव्य अधिकाधिक उजळेल अशी खात्री त्याला वाटली होती...आणि आतां दिवसभरच्या आनंदावर कळस चढविणारा हर्ष तो अनुभवीत होता...त्यानं खिडकीकडे लावलेली नजर काढून त्याच्या कुशींत बिलगलेल्या उषाच्या तोंडाकडे पाहिल. पाहतां पाहतां त्याच्या मनांत आलं, सात आठ महिन्यांपूर्वी जी ही उषा मीं डोळ्यांनीं पाहिलीहि नव्हती ती आज माझ्या मुलाचा गर्भ पोटांत वाहणारी माता म्हणून माझ्या मिठींत माझ्याजवळ झोपलेली आहे, हा काय चमत्कार! या आयुष्यांतली सुखदुःखांची रहदारी कोणत्या न्यायानं होते कुणास ठाऊक! जे तिचे ओठ त्याला पहिल्यापासून मोह घालीत आले होते त्या ओंठांवर त्यान आपल तोंड हळूच टेकलं. पण तस करतांना त्याच्या मनांत आलं, आतां लौकरच हिचे हे सुंदर ओंठ एका बालकाचे मुके घेतांना मला दिसतील...जी ही उषा लग्नाची वधू म्हणून सजली तेव्हांदेखील कोवळ्या किशोरीसारखी दिसली होती, तिच्या उदरांत नव्या जीवनाचा एक स्वतंत्र अंकुर आतां वाढत होता! जीवनाच्या प्रक्रियेची ही काय गूढ हालचाल!...परंतु ही गूढता त्याला आतांच्या सुखाच्या क्षणीं विस्मयाची वाटण्याऐवजीं आनंदाचीच अधिक वाटत होती...त्यानं पुन्हा खिडकीकडे पाहिलं तों आतां मघांच्या त्या तीन चांदण्या दिसत नव्हत्या. त्या क्षितिजाखालीं तरी गेल्या असाव्यात, किंवा ढगांनीं आपला काळा पडदा त्यांवरून ओढून घेतला असावा. तो तसाच पहात राहिला. कांहीं वेळानं बाहेरचा अंधार किंचित् उजळला जाऊन झाडांच्या फांद्याच्या धुरकट, पुसट आकृती हळूच हालतांना दिसूं लागल्या. उषःकालाची पहिली चाहूल सृष्टींत सुरू झाली. त्याच वेळीं बाहेरून येणाऱ्या वाऱ्यांत ओलसरपणा असल्यासारखं त्याला वाटलं. बहुधा पावसाची बारीकशी झिमझिम सुरू झाली असावी. त्याला एकदम निराळ्या आणि सामान्य गोष्टींची आठवण झाली. पेरण्या होऊन गेल्या होत्या. त्यानंतर पाऊस ठीक झाला होता. मग हवीं त्याप्रमाणें कडक उन्हं पडलीं होतीं. परंतु उघडीप फार दिवस लांबली तेव्हां पिकांची काळजी वाटूं लागली होती. आतां पावसाची झड जोरांत सुरू व्हायलाच हवी होती. झिमझिम

सुरू झाली असेल तर तें चांगलं लक्षण होतं...मग त्याच्या मनांत आलं, विष्णुमंदिरापुढचा मंडप उलगडायला आणि रोषणाईचे दिवे काढायला निशाणीचा कंत्राटदार संध्याकाळीं येईल. तो आला कीं त्याच्याबरोबर आपण निशाणीला जायचं कीं नंतर सावकाश केव्हां तरी...असले रोजच्या उद्योगाचे साधे विचार करतां करतांच शेवटीं त्याला झोंप लागली...

दुसऱ्या दिवसापासून पावसाची झड चांगलीच लागली. पिकांची काळजी दूर झाली. वर्ष सुगीचं जाणार असं वाटूं लागलं. परंतु पिकं चांगलीं आलीं तरी देशांतल्या सामान्य माणसाला खायला पोटभर अन्न मिळेलच अशी शाश्वति वाटत नव्हती. ठिकठिकाणचे सावकार शेतकऱ्यांकडून धान्य घेऊन त्याचा सांठा करणार होते. खादीचा पोषाख घातला आणि पांढरी टोपी डोक्यावर चढविली कीं वाटेल तें सामाजिक पाप लपवितां आणि पचवितां येतं ही खात्री सावकार, दुकानदार, व्यापारी या वर्गांत जोरानं वाढली होती. नफेबाजी आणि सांठेबाजी या दोन वृत्तींचे राहू केतु नुकत्याच उगविलेल्या स्वातंत्र्याचा ग्रास करायला सिद्ध झाले होते. या वृत्ती वेळींच मारल्या गेल्या नाहींत तर सामान्य जनतेची अवस्था ब्रिटिशांच्या गुलामगिरींतल्या अवस्थेहूनहि अधिक भयंकर होणार होती. या वृत्तींचं नियंत्रण सरकार कसं करील त्याची वाट न पहातां त्याविरुद्ध लोकांनींच मोहीम केली पाहिजे असा विचार सगळीकडे फैलावत होता. परंतु या सोज्वल विचाराला भलतेच फांटेहि फुटूं लागले होते. धनिकांची श्रीमंती संपविली पाहिजे या घोषणेचं रूपांतर उच्च वर्णीयांचे सुखाचे संसार उखडले पाहिजेत अशा प्रचारांत होऊं लागलं होतं. जनतेला भरपूर अन्न मिळवून देण्याच्या उद्योगाला जातीयवादाचं बांडगूळ चिकटूं लागलं होतं. त्या बांडगुळाची व्यवस्थित जोपासना करणारे लोक भोळ्या-भाबड्या शेतकऱ्यांचं आणि कामकऱ्यांचं पुढारीपण आपल्याकडे घेण्याचा प्रयत्न करूं लागले होते.स्वातंत्र्य मिळालं परंतु हिंदूंचं राज्य स्थापन झालं नाहीं, असं म्हणणारे लोक नेहरू सरकारला शिव्या देत होते, आणि लोकांच्या मनां-तला संतोष उस्कटूं पहात होते. आणि या प्रवाहापेक्षांहि अधिक भयंकर असा दुसरा एक असंतोषाचा प्रवाह खळखळाट करून वाहूं लागला होता. तो अशा विचाराचा कीं प्रांताप्रांतांत आणि दिल्लीच्या केंद्रस्थानीं जें देशी

सरकार प्रस्थापित झालं होतं तें शेटजी-भटजींचं होतं, बहुजनसमाजाचं नव्हतं, आणि म्हणून या सरकाराविरुद्ध बहुजनसमाजानं उठाव करायला हवा होता. बेचाळीसच्या चळवळींतल्या ज्या घातपातवादी पुढाऱ्यांना नव्या सरकारामध्यें सत्तेचीं आणि मानाचीं स्थानं मनाप्रमाणें मिळालीं नव्हतीं, आणि राजकारणांत आपण कायमचेच मागें टाकले जाऊं कीं काय अशा चिंतेंत ज्यांना वर्ष दीड वर्ष काढावं लागलं होतं, त्यांना दिसून आलं कीं उच्च वर्णीयांविरुद्ध बहुजनसमाजाला चिथावणी देण्यानंच आपलं पुढारीपण आपल्याला परत मिळवितां येईल. जातीय वैराचे अंगार फुलविण्यास त्यांनीं प्रारंभ केला होता. दक्षिण महाराष्ट्रांत ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद ब्रिटिशांच्या आणि मराठा संस्थानिकांच्या कृपाछत्राखालीं पूर्वी एकदां चांगलाच फोंफावला होता, परंतु मध्यंतरीच्या राजकीय घडामोडींत त्याचे निखारे जरासे निवले होते. आतां त्यांवरील राख फुंकून ते पुन्हां प्रज्वलित करणं हेंच कांहीं पुढाऱ्यांचं या घटकेचं मुख्य राजकारण होऊन बसणार असं उघड दिसूं लागलं. या नव्या आगीची झळ निशाणीपर्यंत येऊन पोंचायला फारसा वेळ लागला नाहीं. निशाणीपासून नंदगढ अवघ्या चारपांच मैलांच्या अंतरावर होतं, तिथेंहि तिचा संचार सुरू होणार असं दिसूं लागलं...

त्या दिवशीं मंगळवार होता. नवरात्रांतली सप्तमी होती. घरांतल्या घटांवर सात माळा चढायच्या होत्या. सात सवाष्णी जेवायला यायच्या होत्या. उषाची सकाळपासून धांदल उडाली होती. माडीवरून खालीं अन् खालून माडीवर खेपा घालतां घालतां तिला पुरेवाट झाली होती. तिच्या मनांत येत होतं, उद्यां दुर्गाष्टमी! मोठी पूजा होणार, जेवणखाणाचा रगाडा उडणार, रात्रीं घडे फुंकायसाठीं बायका जमा होणार, हें सारं माझ्यानं झेंपायचं कसं?... तिला आतां सहावा महिना संपत आला होता. एवढा दसरा झाला कीं ती माहेरीं जाणार होती. तिनं मनाशीं असं ठरविलं कीं घरीं गेल्यावर आईला सांगायचं, मला दिवस गेले आहेत म्हणून जेवणाविवणाची झोड उठवायचे बेत अगदीं करूं नकोस. माझ्याच्यानं हे व्याप सोसवत नाहींत. सासरची मंडळी माझ्यावर रागावली असती म्हणून तिथें मी सारे सोहाळे होऊं दिले. पण तूं माझं ऐकशील

म्हणून तुला सांगतें कीं माझं कौतुक तुला करायचं असलं तर मला निर्वेध विश्रांति घेऊं दे...पण हें सारं अजून चार दिवस दूर होतं...इथें सासरीं ती होती तोंपर्यंत इनामदारांच्या घरांतले सारे आचार तिला पाळायला हवे होते. तिला कष्ट सोसत नव्हते. पण ते करण्यांतहि आनंद होता. मनाशीं असे विचार करीत तिच्या इकडे तिकडे खेपा चालू होत्या...

एकदां जिना उतरून ओटीलगतच्या दाराच्या चौकटींत ती थोडी थबकून उभी रहायला आणि दादा एका पेशंटाकडे म्हणून निशाणीला गेले होते त्यांची परत आलेली गाडी बाहेरच्या दरवाजापाशीं येऊन थांबायला एकच गाठ पडली. ती थांबली. दादा आंगण ओलांडून ओटीवर चढले कीं ती विचारणार होती, "जेवणाचं व्हायला अजून पुष्कळ अवकाश आहे. तुम्हांला आधीं कांहीं खायला करून देऊं कां ?" ते पायऱ्या चढत होते तेव्हां चौकटीचा उंबरा ओलांडून तिनं पुढं पाऊल टाकलं, आणि त्यांच्याकडे पाहून ती हंसली. ते हंसले नाहींत. त्यांची चर्या कांहींशी क्रुद्ध झाली होती. पुष्कळदां रोग्याच्या नातलगांवर त्यांच्या मूर्खपणाबद्दल व गाढवपणाच्या समजुतीबद्दल रागावून यथेच्छ तोंडसुख घेऊन ते परत येत असत, व अशा वेळीं घरीं पोंचून दुसऱ्या कोणत्या तरी कामांत त्यांचं चित्त गुंतल्याखेरीज त्यांच्या मनांतल्या शिव्या संपलेल्या नसत. उषा मनाशीं म्हणाली, 'स्वारी आज कुणावर तरी रागावलेली दिसते.' काय झालं म्हणून ती विचारणार होती. पण तितक्यांत तिच्याकडे पाहून त्यांनींच विचारलं,

"तुझा भोळा शंकर कुठें आहे ?"

ती म्हणाली, "म्हणजे काय ?"

"म्हणजे आमचे बंधुराज प्रभाकरपंत इनामदार कुठें आहेत ?"

प्रभाकर सकाळीं मळयावर गेला होता, तिथून तो अजून यायचा होता. उषा तसं सांगणार होती. पण तितक्यांत बाबासाहेबच दुसऱ्या जिन्यानं खालीं आले व त्यांनीं दादांना विचारलं, "अरे, काय झालं काय ?"

दादा म्हणाले, " नाहीं, प्रभाकर कसा भ्रमांत आहे तें त्याला सांगणार आहें मी. साऱ्या लोकांना हेवेदावे विसरायला लावून एकजूट करून देशाचं हित साधणार आहे तो, पण प्रत्यक्ष काय गोष्टी घडताहेत तें त्याला सांगणार आहें मी. निशाणीच्या सिद्रामाप्पाला हा प्रभाकर स्वतःचा मोठा मित्र समजतो ना ?—"

त्याच्या बोलण्याचा रोख बाबासाहेबांच्या लक्षांत येईना. त्यांनीं विचारलं, " सिद्रामाप्पांनीं काय केलं ? "

दादा म्हणाले, " बाबा, आपण इथें डोंगरावर राहतों. आपल्या बुद्धीनं साऱ्यांचं कल्याण करण्यासाठीं झटतों. पण दुनिया आतां कशी बिघडत चालली आहे त्याची आपल्याला कल्पना नाहीं. प्रभाकरला वाटतं, कॉंग्रेसमध्यें त्याला मोठा मान आहे, लोकांच बरं व्हावं, म्हणून त्यानं चौदा वर्षं कष्ट केले आहेत, तेव्हां त्याला या जगांत शत्रु कुणी नसेलच. पण आतां लबाड लोकांना सत्तेची भूक लागली आहे, आणि ती भूक पुरी करण्यासाठीं सज्जनांचा घास घ्यायला ते कमी करायचे नाहींत. म्हणून हिला विचारलं मीं तुझा भोळाशंकर कुठें आहे ? गेले चार दिवस निशाणींत काय काय प्रकार झाले ते आतां गेलों होतों तेव्हां लोकांनीं मला सांगितलं. हीं चिन्हं मला ठीक दिसत नाहींत. "

बाबासाहेब म्हणाले, " पण अजून तूं काय म्हणतोस तें मला कळलं नाहीं. निशाणींत कोणते प्रकार झाले ? "

" नालायक लोकांना स्वराज्य मिळालंय, तेव्हां जे प्रकार व्हायचे ते सुरू झाले आहेत. आणखी निशाणीपर्यंत येऊन पोंचले आहेत. " दादा म्हणाले, " बहुजनसमाज नांवाचं गाढव जनावर आहे ना, कुणीहि छू करून कुणावरही सोडावं असं ? ज्याला म्हणून सत्ता हवी आहे तो आतां स्वतःला बहुजनसमाजाचा पुढारी म्हणवतो आहे. असल्या पुढाऱ्यांनीं निशाणींत रोज जाहीर सभा चालविल्या आहेत. रात्रीं त्यांचे तमाशे झडताहेत आणखी व्याख्यानांतून आणि लावण्या पोवाड्यांतून प्रचार काय चाललाय, तर आजपर्यंत बामणांनीं खालच्या वर्गांतल्या लोकांना नागविलं, आतां बामणांचा निःपात केल्यावांचून खालच्या लोकांना सुखाचे

दिवस दिसायचे नाहींत. शेटजी–भटजींचं राज्य माजलंय. त्यांना ओढा, झोडा म्हणजे तुमचं कल्याण होईल. सिद्रामाप्पाला प्रभाकर मित्र समजतो ना ? पण सिद्रामाप्पाच्या घरीं तमाशेवाल्यांचा मुक्काम होता ! आमचे प्रभाकरपंत म्हणतात कुणाहि माणसाच्या चांगुलपणावर विश्वास ठेवावा. ठेवा विश्वास ! एक दिवस तुमच्या मानेवर कुऱ्हाड उगारली जाईल, तेव्हां व्हाल जागे. तुम्हाला सांगतों बाबा, जग फार झपाट्यानं बदलत चाललंय. अक्कल तर आमच्या लोकांना कधीं नव्हतीच. पण आतां माणुसकीहि नाहींशी व्हायला लागली आहे. आपण नीतीनं वागावं मग कोण आपलं वाईट चिंतणार आहे, असं म्हणून आतां जगांत भागायचं नाहीं. आणखी पुष्कळ गोष्टी कळल्या आहेत मला निशाणींत. पण त्या तुम्हांला नाहीं सांगत. बंड्या धुमाळ आला माझ्याकडे म्हणजे त्यालाच सरळ विचारणार आहे. ”

असं बोलतां बोलतां त्यांनीं डोक्याची टोपी खुंटीला काढून ठेवली, आणि त्यांची वाट पाहाणारे पेशंट त्यांचं इतका वेळच भाषण ऐकत कांहींसं दबकून, कांहींसं भिऊन, आ वासून बसले होते त्यांच्या कोंडाळ्यांत मधोमधच्या भिंतीपासल्या गादीवर त्यांनीं बैठक मारली. इतक्यांत मोठ्या दरवाजांतून आंत शिरून अंगणांतून पावलं टाकतां टाकतां एका माणसानं ओरडून विचारलं, “ आहेत का दादासाहेब ? ”

त्या माणसाला पाहतांच उषा दचकली. कारण तो बंडू धुमाळ होता. ती चटकन् ओटीवरून मागं सरकली, पण जिन्याच्या पायथ्याच्या चौकटींत थांबली.

दादा म्हणाले, “ या या बंडबा, तुमचीच आठवण काढली होती आतां. ”

बंडू मोठ्या खुशीनं पायऱ्या चढला, आणि हातांतला मोठा सोटा सतरंजीवर आडवा ठेवून मांडी घालून म्हणाला, “ काल पहाटेपासून माझ्या म्हाताऱ्याला भलताच दम लागला आहे. खोकून बेजार झालाय. श्वास टाकतां येत नाहीं. सारखा म्हणतो मी आतां मरतों. म्हणून तुम्हांला घेऊन जायला आलों आहे. ”

दादा म्हणाले, “ असं का ? ”

ज्या स्वरांत दादांनीं प्रश्न केला होता त्याची खोंच धुमाळाला कळली नाहीं. तो म्हणाला, " होय दादा. तुम्ही आलां नाहींत या घटकेला तर म्हातारा आटोपतो बघा. "

दादा म्हणाले, " अरे बंडू, मी आलों असतों. मागं दोन वेळां तुझ्या बापाला दम्याचे झटके आले तेव्हां आलों नव्हतों ? पण आतां यायची माझी नाहीं इच्छा. मरूं दे कीं म्हातारा. करावं तस भरावं. "

बंडू धुमाळ म्हणाला, " ऐंशी वर्षांच्या माझ्या म्हाताऱ्यानं काय केलं म्हणून तुम्ही असं म्हणतां ? "

" त्यानं नाहीं केलं. पण तूं करतो आहेस ना बंडू ? आणि त्याबद्दल पितृवियोगाचं दुःख तुला द्यायचं देवानं ठरविलं असलं तर ? "

" मीं केलं ? आतां बघा, मीं काय कुणाचं वाईट केलं हो दादा ? "

दादा म्हणाले, " बरं विचारलंस. बंडू, निशाणीला जाऊन तूं आमच्याविरुद्ध कोणकोणत्या खोट्या चहाड्या सांगितल्यास त्याची आठवण कर. "

" मीं चहाड्या सांगितल्या ? आणि आपल्याविरुद्ध ? इनामदारांच्या घराचे उपकार विसरून मी कांहीं बोललों असेन तर माझी जीभच झडून पडेल. "

दादा हंसले व म्हणाले, " या कलियुगांत असं कांहीं होत नाहीं म्हणून अशी शपथ घेतो आहेस. जीभ झडायची भाषा राहूं दे. बाबा इथें आहेत, त्यांच्यासमोर सांग निशाणीला जाऊन काय काय गरळ ओकलास तें. मला कळलंय सारं. "

बंडू धुमाळाचा चेहरा पडला.

बाबासाहेबांकडे पाहून दादा म्हणाले, " बाबा, या धुमाळानं ज्याला त्याला असं सांगण्याचा सपाटा चालविलाय कीं आम्ही आमच्या गांवच्या आणि आसपासच्या गांवांतल्या शेतकऱ्यांकडून जोरजुलमानं कमी दरानं धान्य घणार आहोंत आणि सांठा करून विकणार आहोंत. या गोष्टीचा उच्चार निशाणीच्या परवांच्या जाहीर सभेंत बहुजनसमाजवाल्या एका पुढाऱ्यानं खुशाल केला. त्या पुढाऱ्याला दुसऱ्या दिवशीं निशाणींतल्याच एका सद्गृहस्थानं प्रतिपादून विचारलं, ' नंदगढच्या इनामदारांबद्दल तुम्ही

बोललांत तें कुठल्या आधारावर ?’ त्यानं चक्क या धुमाळाचं नांव घेतलं, आणि तो म्हणाला, “ इनामदारांचे गांवकरीच आम्हाला असं सांगताहेत. ” दादांनीं धुमाळाकडे नजर वळवून म्हटलं, “ काय बंड्या, मी म्हणतों तें खरं कीं खोटं ? अरे, असल्या खोट्या चहाड्या करतांना तुला शरम नाहीं वाटली ! आमचा प्रभाकर गांवोगांव फिरून शेतकऱ्यांना सांगतो आहे, तुम्ही आपलं धान्य सरकारांत भरा. आम्ही कुळांना कर्जाच्या सुटी देत आहोंत, तारणं देत आहोंत ! आणखी बंड्या, तूं आपली लांब जीभ काढून उलट्या गोष्टी पिकवतोस होय ? केवळ आम्ही ब्राह्मण म्हणून ? ज्या पुढाऱ्यांच्या नादीं तुम्ही लोक लागत आहांत ते तुमचं काय कोट कल्याण करतील ठाऊक आहे मला. पण त्यांच्या नादानं तूं स्वतः बिघडला असशील, आणखी आपल्या गांवांत हें द्वेषाचं विष आणणार असशील तर पुन्हां इनामदारांच्या घरांत पाऊल टाकूं नकोस—समजलास ? ऊठ ! चालता हो. तुझा म्हातारा मेला तर मला काय त्याचं सोयरसुतक सांगतोस ? ”

बंडू धुमाळ जागच्या जागीं थोडा घोंटाळला. तें पाहून दादा म्हणाले, “ रोग्याच्या मदतीला धांवण्यांत मीं कधीं कसूर केली नाहीं. पैसा दिला नाहींत तरी तुम्हांला औषध दिलीं. पण आम्हीं दूध पाजावं, आणि तुम्हीं विष ओकावं असं होणार असेल तर मी तुमचा वैद्य नाहीं. प्रभाकरसारखं साधु होता येत नाहीं मला. तुझ्या म्हाताऱ्याला श्वास लागला असला तर ज्या बहुजनसमाजवाल्या पुढाऱ्याच्या कानांत आमच्याविषयीं खोट्या गोष्टी सांगितल्यास त्याच्याकडे घे धांव. तो देईल तुला औषध. तुझ्या घरीं मी येणार नाहीं. खोटं नाहीं सांगत, ऊठ ! चालता हो. ”

बंडू धुमाळ काठी उचलून उठला, पायऱ्या उतरून त्यानं पायताण पायांत सरकाविलं, आणि आंगणांतल्या फरशीवर काठी वाजवीत तो निघाला. मान खालीं घालून दरवाजाकडे पावलं टाकतां टाकतां तो मनाशीं म्हणत होता, ‘ निशाणीला जाऊन तो तमाशा इकडे नंदगढला घेऊन येतों. इनामदारांच्या विष्णूच्या देवळापुढें तो तमाशा झडलाच पाहिजे. या बामणांना वाटतंय आपण गांवाचे धनी आणि सारे गांवकरी आपले गुलाम. पण आतां तुमची सद्दी संपली म्हणावं ’...

बंडू धुमाळ दाराबाहेर पडला. बाबासाहेब उठून आपल्या माडीकडे गेले. त्यांचं मन व्यग्र झालं होतं. उषा आंत वळली आणि देवघराकडे गेली. आक्कासाहेबांनीं तिला विचारलं "दादा कुणावर उसळला होता ग एवढा? काय झालं?" उषा म्हणाली, "कांहीं नाहीं." पण तिचं मन खिन्नतेनं अगदीं जड होऊन गेलं होतं... हीं सारीं कशाचीं लक्षण आहेत तिला कळत नव्हतं. गांवाच्या जीविताच्या नेहमीच्या संथ पाण्यांत घाणेरडे ओघळ हळूहळू येऊन मिसळत होते. साऱ्या देशांतच जें चमत्कारिक अराजक माजू पहात होतं त्याचे पडसाद या छोट्याशा गांवांतहि उठूं लागले होते... आणि या आपत्तीवर कोणाचा कोणता इलाज चालणार होता कोण जाणे!... दादांचं चुकतंय, का प्रभाकरचं चुकतय, तिला कळेना... तिचं मन विलक्षण खिन्न झालं होतं...

ती देवघरांत गेली तिथें टोपल्यांतून शिगोशीग भरलेल्या गुलाबाच्या, सोनचांफ्याच्या, जाईजुईच्या फुलांचा आणि केवड्यांचा सुगंध दरवळला होता. सांखळीला टांगलेल्या समईतल्या वातीचा मंद प्रकाश पडला होता. पूजेचं सारं साहित्य मांडून तयार होतं. देव्हाऱ्यांतली अष्टभुजा देवी आदल्या दिवशीं वाहिलेल्या हाराखालीं आणि फुलांखालीं अर्धवट झांकून गेली होती. त्या उग्र मूर्तीकडे उषा पहात राहिली. तिला बरं वाटलं...

—*—

# प्रकरण दहावं



" आतां एक माणुस कुठलं आमच्याशीं बोलायला ? सारं लक्ष घराकडे लागलं असेल— "

मोटारींत शेजारीं बसलेल्या प्रभाकरचं बोलणं ऐकून उषानं आतांपर्यंत मिटून ठेवलेले डोळे उघडले. त्याच्याकडे पाहून ती हळूंच हंसली आणि म्हणाली, " असं नाहीं अं. "

त्यानं विचारलं, " मग कांहीं न बोलतां डोळे मिटून गप्प कां राहिली आहेस ? "

ती म्हणाली, " विचार करीत होतें. "

" कसला ? "

" स्वतःच्या सुखाचा. गेले आठ महिने मी किती सुखांत घालविले त्याचा. "

प्रभाकर हंसला. त्यानं विचारलं, " खरंच अगदीं सुखांत होतीस आमच्या घरीं ? "

" अगदीं पूर्ण सुखांत." तिनं उजव्या हातानं हलकेच धरलेला त्याचा डावा हात दाबला, आणि पुन्हां डोळे मिटले. ज्या विचारांच्या तंद्रींत ती इतका वेळ कांहीं न बोलतां, वाऱ्याच्या झोतानं उडणारे केस नीट करण्यासाठीं हातदेखील कपाळावरून न फिरवितां, अगदीं स्तब्ध पडून राहिली होती ते विचार, झोपेची गुंगी आणखी हवीशी वाटल्यावर माणुस पांघरूण आणखी ओढून घेतो त्याप्रमाणें, ओढून घ्यावेसे तिला वाटत होते. त्या विचारांची गोडी चाखावीशी तिला वाटत होती. प्रभाकर तिच्या भाऊंकडे वरचेवर यावयास लागला त्या वेळेपासून आज ती इनामदारांच्या घरचा दसऱ्याचा सण साजरा करून माहेरीं जाण्यासाठीं प्रभाकरबरोबर निघाली होती तेव्हांपर्यंतच्या अवधींत ज्या गोष्टी घडल्या त्या एखाद्या चित्तवेधक

कादंबरींतलीं प्रकरणं पुन्हां पुन्हां उलटून वाचावीशीं वाटावींत त्याप्रमाणें पुनःपुन्हां आठवून पहाव्याशा तिला वाटत होत्या...घरची गाडी रस्त्यानं वेगांत चालली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस जमिनीचा भाग कुठें उंच उंच शेतांनीं, कुठें झाडांच्या रांगांनीं, कुठें रानमाळांतल्या गवतानं किंवा हिरवळीनं झांकलेला दिसत होता. डोंगर क्वचितच दिसत होते, आणि जेव्हां दिसत तेव्हां देखील दूर अंतरावर उंच सखल जमिनीच्या हिरव्यागार विस्तारापलीकडे, जणूं मैल न् मैल आंथरलेल्या रंगदार गालिच्यावर पाऊल टाकणं बरं नव्हे अशा विचारानं उभे राहिल्यासारखे वाटत होते. आभाळ कांहीं अगदीं स्वच्छ नव्हतं, पण जागोजाग तरंगणाऱ्या ढगांचा पावसाळी काळा रंग आतां नाहींसा झाला होता, आणि पातळ कांचेच्या तुकड्यांतून प्रकाश आरपार जावा त्याप्रमाणें त्याच्या अंगांतून उन्हं बाहेर फुटलीं होतीं...बाहेरच्या या शोभेकडे उषा पुष्कळ वेळ पहात राहिली होती, आणि मग ती डोळ्यांत सांठवून घेतली तेवढी पुरे झाली अशा विचारानं तिनं जेव्हां डोळे मिटले तेव्हां आपल्या अंतःकरणांत दाटलेल्या समाधानाची शोभा पाहण्यांत ती गर्क झाली होती... आतां आपण घरीं पोचूं तेव्हां काय काय होईल त्याचं चित्र तिच्या मनापुढें पुनःपुन्हां उभं रहात होतं... मोटार दाराशीं उभी राहील! हॉर्न ऐकतांच अजय घरांतून धांवत बाहेर येईल! भाऊ पुढें येतील व आपल्याकडे आणि प्रभाकरकडे पाहून हंसतील! आपली आई दाराशीं आलेली असेल, आणि आपण जवळ गेलों कीं ती हलकेच म्हणेल, "थांब." आपल्याला ओवाळतांना तिची नजर आपल्या चर्येकडे लागलेली असेल. ज्या नव्या गोड अवस्थेंत आपण तिला दिसूं तिच्याबद्दलचा आनंद आणि कौतुक तिच्या त्या नजरेतून ओसंडत असेल. आपल्याला थोडंसं लाजल्यासारखं होईल. मग आंतल्या दालनांत गेल्याबरोबर आपण आईला मिठी मारूं. आई कदाचित् हळूंच म्हणेल, "उषा!" तिच्या त्या उद्गारांत 'माझी उषाच का तूं!' अशा प्रश्नाचा ध्वनि असेल. तिनं तसं मोठ्यानं म्हटलं नाहीं तरी तिच्या मनाला खचित असं आश्चर्य वाटेल, माझी उषाच का ही!... तिच तिलाच सारखं आश्चर्य वाटत होतं, मीच का ही!...

ज्या दिवशीं तिन्हीसांजा प्रभाकर अकस्मात् आला होता आणि खूप गुलाबाचीं फुलं त्यानं आणलीं होतीं त्या दिवशीं त्यानं जेव्हां प्रथमच तिला एकेरी नांवानं हांक मारली होती, आणि म्हटलं होतं, "इकडे बघ, मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे–" तेव्हां तिनं जिभेनं 'चक्' असा आवाज केला होता. ती मान हालवीत खालीं बघत राहिली होती. त्यानं कितीदाहि 'वर बघ' म्हटल तरी वर पाहिलं नव्हतं. त्यानंतर तिला वाटलं होतं कीं प्रभाकर आपल्याला पुन्हां कांहीं विचारणार नाहीं. पण तिची कल्पना खोटी ठरली होती. उलट प्रभाकर प्रत्येक संधि साधून तिला आपलं प्रेम सागू लागला होता. प्रभाकरवर जडूं पाहणाऱ्या आपल्या मनाला आवरण्याचा तिनं दर वेळीं प्रयत्न केला होता. परंतु आपल्या हातांतील दोरीचं एक टोंक दुसऱ्याच्या हातीं जावं व तें ओढून घेण्याच्या प्रयत्नात उलट आपल्या हातांतलंच टोंक सुटूं लागावं तशी उषाची अवस्था होत गेली होती. प्रभाकरच्या अतीव सौजन्याचा आणि लोककल्याण साधण्याच्या इच्छेचा तिला विलक्षण मोह पडला होता. त्याच्या देखणे-पणानंहि ती आकृष्ट झाली होती.

...तिला एकच भीति वाटत होती कीं आपल्या मनातल्या जगन्नाथ-बद्दलच्या आठवणी कधीं पुसल्या जाणार नाहींत. त्या मनांत असूनहि प्रभाकरवर आपल्याला निस्सीम प्रेम करतां येईल कीं नाहीं ? या भीतीनं ती प्रभाकरला 'हो' म्हणण्याचं लांबणीवर टाकीत होती...परतु अखेर तिन 'हो' म्हटलं होतं आणि तिचा रुकार मिळाल्याबरोबर प्रभाकरनं भाऊंना विचारलं होतं. त्याचे आईबाप, दादा वगैरे मंडळी नंदगढहून मुद्दाम तिला पाहण्यासाटीं आली होती. तिचं लग्न केवढ्या तरी थाटांत झाल होत, ती इनामदाराची सून म्हणून नंदगढला गेली होती...आणि आतां ती माहेरीं निघाली होती...निराळ्याच नव्या गोड अवस्थेंत !... तिला आतां साडेसहा महिने गेले होते...या नवीन अवस्थेंत तिला शारीरिक श्रम अगदीं सोसवेनासे झाले होते. पण तिच्या सासरची एकदर हौस अशी कीं आज तिनं बाबासाहेब, आक्कासाहेब आणि दादा यांच्या पायां पडून मोटारींत पाऊल ठेवल, तोंपर्यंत तिला सारखी धांदल करावी लागली होती...गेले चार दिवस तर तिला क्षणाची देखील उसंत नव्हती...

नवरात्राच्या सातव्या माळेच्या दिवशीं नैवेद्य, सवाष्णींचीं जेवणं वगैरे रगाडा झाला होता, आणि दुसऱ्या दिवशीं दुर्गाष्टमीनिमित्त पहांटेपर्यंत दंगल चालू राहिली होती. दत्तभट पढिक विद्वान होते तसेच कसबी कलावंत होते, आणि बाबासाहेबांच्या घरचा लहानमोठा उत्सव असला कीं त्यांच्या हौसेला भरती येत असे. त्यांनीं रात्रीं देवीची सजावट अशी केली कीं जणुं एखाद्या प्रदर्शनांत मांडायसाटींच एक देखावा त्यांनीं बनविला होता. सौभाग्य आणि वीरश्री देवीच्या त्या मूर्तींतून ओसंडत होती. तिच्या एकंदर थाटांत आणि मुखवट्यांत मांगल्य आणि उग्रता पुरेपूर भरलेली दिसत होती. तिच्याकडे न्याहाळून पाहतांना उषा दत्तंभटाना म्हणाली होती, "तुमच्या या देवीलाच पाहणाराची दृष्ट लागेल बघा. ती लागूं नये म्हणून दुसरी एकादी देवी बसवायला हवी!" दत्तभट म्हणाले, "इतकी आवडली तुम्हाला? माझ्या श्रमांचं सार्थक झालं." आक्कासाहेब म्हणाल्या, "दरवर्षी नाहीं बरं का दत्तंभट येवढी खटपट करीत! यंदा तूं आली आहेस ना आमच्या घरांत? म्हणून!" उषानं दत्तंभटांकडे कृतज्ञतेनं नजर टाकली होती, व ते तिच्याकडे बघून हंसले होते...रात्रीं बायकांनीं घर भरून गेलं होतं आणि त्यांनीं घडे फुंकायला सुरवात केली, तेव्हां घटांतून निघणाऱ्या 'फू' 'फू' आवाजांनीं पूजेचं दालन घुमत राहिलं होतं. ब्राह्मणांप्रमाणें मराठ्यांच्या, सुतार-लोहारांच्या बायकांनादेखील इनामदारांच्या घरच्या दुर्गाष्टमीचं आमंत्रण दरवर्षी-प्रमाणें यंदांही होतं. गांवांतल्या साऱ्या बायका जमा झाल्या होत्या. बरोबर आणलेलीं तान्हीं मुलं शेजारच्या खोलींत गोधड्यांवर, दुपट्यां-वर त्यांनीं झोपेच्या स्वाधीन करून टाकलीं होतीं, आणि त्या घडे फुंकीत पुनःपुन्हां नाचत होत्या. तरण्याताठ्या पोरींच्या बरोबरीनं म्हाताऱ्या बायका घडे फुंकीत होत्या, कुणब्यामाळ्यांच्या बायकांच्या बरोबरीनं ब्राह्मणांच्या बायका दमछाक ठेवून घुमत होत्या. आक्कासाहेबांनादेखील एखाद्या अठरा वर्षांच्या नवथर पोरीचं अवसान आलं होतं. सदू कांबळ्याच्या धिप्पाड तरुण सुनेबरोबर घडा घुमविण्याची शर्यत करून त्यांनीं तिला अखेर मटकन् खालीं बसायला लावली, आणि 'फू' 'फू' करीत घडा झेलीत नाचणं सूरूच ठेवून कदमांच्या मुलीला विचारलं, "काय रंगे, होती आहे

का तुझी माझी ?" तेव्हां साऱ्या बायकांची कौतुकानं हंसतां हंसतां मुरकुंडी वळली... उषाला मात्र त्या सारख्या म्हणत राहिल्या होत्या, "तूं फार फुंकूं नकोस हं !" आणि तिला कोणी आग्रह करूं लागलं कीं दटावीत होत्या, "तिला बसूं द्या ग स्वस्थ पहात ! तिला सोसणार नाहीं."... कुळकर्ण्यांच्या दुर्गाबाईच्या घेड फुंकतां फुंकतां अगांत आलं होतं. मग फू फू आवाज एकदम बंद झाले होते. साऱ्याजणी दुर्गाबाईभोवतीं जमा झाल्या होत्या, आणि प्रश्न विचारूं लागल्या होत्या. निशाणीच्या कोर्टांत चाललेल्या आमच्या खटल्याचा निकाल काय होईल, आमच्या शेतांत कुठें विहीर खणली तर पाणी लागेल, पोरगा रुसून घरांतून निघून गेला आहे तो परत येईल कीं नाहीं, असे प्रश्नांवर प्रश्न बायका विचारूं लागल्या, आणि थरथर कांपत पिंगा घालणाऱ्या दुर्गा-बाईच्या तोंडून उत्तर झडूं लागलीं. दत्तंभटांच्या बायकोनं "थांबा ग !" म्हणून सर्वांना दूर केलं आणि दुर्गाबाईना विचारलं, "ताई ! माझा प्रश्न सांगा पाहूं." जिनं तिनं कोरडं कुंकू कपाळावर लावल्यामुळें आतां मळवट भरल्याप्रमाणें दिसणाऱ्या दुर्गाबाईनीं आपल्या बेहोषींत डोळे अर्धवट मिटलेलेच ठेवून झुलत म्हटलं, "विचार." दत्तंभटांच्या बायकोनं विचारलं, "आक्कासाहेबांच्या सुनेला काय होईल ? मुलगा कीं मुलगी ?" दुर्गाबाईनीं सांगितलं. "मुलगी !" त्या उत्तरानं निराशा झाल्याप्रमाणें सगळ्या बायका एकदम गप्प झाल्या होत्या. उषानं आक्कासाहेबांकडे हळूच पाहिलं होतं. त्यांचा चेहरा पडल्यासारखा तिला वाटला होता. तिला स्वतःला मात्र किंचित्‌ही वाईट वाटलं नव्हतं. उलट, प्रभाकरच्या ज्या अपत्याला ती जन्म देणार होती त्याचा दुर्गाबाईच्या मुखानं प्रत्यक्ष कुलदेवतेनं केलेला उल्लेख ऐकताच आपल्या उदरातला गर्भ नाम-रूप धारण केलेला दिसल्याप्रमाणें तिला वाटलं होतं, व तिच्या अंगभर एक गोड शिरशिरी उठली होती. त्या शिरशिरीसकट प्रभाकरच्या अंगाला मिठी मारण्याची अधीरता तिच्या शरीराला वाटली होती. बायका पुन्हां घडे फुंकूं लागल्या होत्या. "तूं दमली असशील. जा, नीज. ऊठ" असं आक्कासाहेबांनीं म्हटल्याबरोबर आढेवेढे न घेतां ती माडीवर गेली होती... प्रभाकरच्या कुशींत शिरल्यावर तिनं त्याला विचारलं, "एक नांव सांगा."

" घेऊं कीं सांगूं ?" त्यानं विचारलं.

" घेऊं नका, सांगा."

" पण नांव सांगा म्हणजे काय ? कोणाचं ?"

" बायकांचं. सगळ्यांत सुंदर."

" उषा !"

" अंहं. तें सोडून."

" वा ! तें कसं सोडतां येईल ?"

" बरं, नका सोडूं. त्याच्या खालोखाल सुंदर सांगा."

" सांगतों." तो विचार करण्यासाठीं थांबला, आणि मग म्हणाला, " आशा !"

" आशा !" तिनं तीं दोन अक्षरं गोंजारून उच्चारलीं, आणि ती गप्प झाली.

त्यानं विचारलं, " कशासाठीं चाललाय हा नांवाचा शोध ?"

" सांगूं ?" ती म्हणाली.

आणि त्याच्या कुशींत आणखीच बिलगून त्याचा ओठ आपल्या बोटानं दाबण्याचा चाळा करतां करतां तिनं सांगितलं.

" होय ?" असा आनंदाचा उद्गार काढून त्यानं तिचा मुका घेतला होता.

सकाळीं ती जागी झाली व तिनं डोळे उघडून पाहिलं तों प्रभाकरही जागा झाला होता, व तिच्याकडे टक लावून बघत होता. अंथरुणांतली उजाडल्यावरची त्याची तिची ही पहिली दृष्टिभेट रोजची ठरलेली होती. तिला एकदम आठवलं, कीं दसऱ्याच्या दुसऱ्याच दिवशी आपण माहेरीं जाणार आहोंत. त्याच्या गळ्याभोंवतीं हात टाकून ती म्हणाली, " माझ्या-जवळ काय कबूल केलं आहांत तुम्हीं, लक्षांत आहे ना ?"

तो म्हणाला, " तूं इतक्या गोष्टी माझ्याकडून कबूल करून घेतेस, कीं तूं विचारतेस तेव्हां कोणत्या गोष्टीबद्दल तें चटकन् लक्षांत येत नाहीं."

ती म्हणाली, " मला माहेरीं सोडून इकडे पळून यायचं नाहीं."

" अ हं. "

" मी महिनाभर एकटी कशी राहूं ? "

" एकटी ? तुझे भाऊ, आई, अजय इतक्यांची सोबत असेल कीं तुला ! "

" ती नाहीं पुरायची ! तुम्ही हवेत. जर मला टाकून इकडे निघून आलांत तर बघा ! "

" महिनाभर राहूं तुझ्या घरीं ? "

" मी नाहीं का राहिलें आठ महिने तुमच्या घरीं ? तसं तुम्हीं कां राहूं नये ? 'राहीन' म्हणा. "

" बरं, राहीन. " असं म्हणतांना तो हंसला होता.

पण त्याच्या त्या आश्वासनाचा तिला पुरेसा भरंवसा वाटला नव्हता. नंतरच्या दोन दिवसांत रोज पहाटे तिनं त्याला तोच प्रश्न विचारला होता, अन् तेंच वचन त्याच्याकडून घेतलं होतं. तिला पुनःपुन्हां वाटत होतं, प्रभाकरच्या 'राहीन' म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तो कुठला राह्यला ? त्याचीं कामं त्याला कुठून राहूं देणार ? मला एकटंच राहावं लागणार, आणि तसं राहणं मला कठीण होणार...

तिनं डोळे उघडले, तेव्हां मोटर थांबली होती. प्रभाकर तिच्याजवळ होता. पण गाडीभोंवतीं आठ दहा माणसं गोळा झालीं होतीं, अन् प्रभाकर त्यांच्याशीं बोलण्यासाठीं पुढें झुकला होता. उषानं डोळे उघडलेले त्यानं पाहिलं, तेव्हां रस्त्यावर उभ्या राहिलेल्या मंडळीकडे बोट दाखवून तो तिला म्हणाला, " यांच्याशीं तुझा परिचय करून देतों. हें इथल्या कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष. अण्णासाहेब, या ना पुढें. इथल्या निष्ठावंत कार्यकर्त्यांचे पुढारी. घरदार कशाची पर्वा न करतां–"

'नमस्ते' करून उभे राहिलेले अण्णासाहेब म्हणाले, " हां, पुरे पुरे. आम्ही तुमच्यासाठीं चहा घेऊन आलों आहोंत तो घ्या आधीं. अरे सदाशिव, आण चहा. दे. " मग ते उषाकडे बघून म्हणाले, " खरं म्हणजे तुम्हीं आमच्याकडे एक दिवस राहून मग पुढें जायला हवं. न उतरतां जातां हें कांहीं बरं नाहीं. उतरतां का ? "

उषानं फक्त नजर खालीं केली. प्रभाकर म्हणाला, " या वेळीं नको अण्णासाहेब, पुन्हां केव्हां तरी."

चहा घेतां घेतां त्यांच्या कॉंग्रेसच्या कांहीं स्थानिक कामासंबंधीं गप्पा चाललेल्या उषानं ऐकल्या. अण्णासाहेब वरचेवर प्रभाकरला म्हणत होते, " पण तुम्हीं स्वतः याल तरच हें होईल. तुमचा शब्द लोक ऐकतात. तुम्ही यायला हवं." आणि तो अण्णासाहेबांना म्हणत होता, " मी येईन ना! यायलाच हवं. एवढं महत्त्वाचं काम असल्यावर "...तीं त्या दोघांचीं बोलणीं ऐकून उषाला आनंदही होत होता, वाईटही वाटत होतं. इनामदारांच्या लौकिकाचा नंदगढ गांवांत अन् भोंवतालच्या मुलखांत केवढा दबदबा आहे, आणि प्रभाकरच्या तळमळीच्या कार्यामुळें जनतेचा केवढा आदर व विश्वास त्यानं संपादन केला आहे, या गोष्टींचा प्रत्यय गेल्या आठ महिन्यांत तिला किती तरी प्रसंगांनीं आला होता, अन् प्रत्येक वेळीं तिला गाढ समाधान झालं होतं. इनामदाराचं घर श्रीमंताचं व ब्राह्मणाचं येवढ्याच कारणांनीं त्यांच्याबद्दल अडाणी लोकांत दुस्वास माजविण्याचे प्रयत्न होऊं लागलेले तिला दिसत. दादा तर वारंवार म्हणत कीं ' हीं माणसं आपले उपकार अन् आपला चांगुलपणा विसरून लबाड, संधिसाधु पुढाऱ्यांच्या नादीं लागून आपल्यावर केव्हां उलटतील नेम नाहीं! पूर्वींचे दिवस आतां उरले नाहींत.' बंडबा धुमाळानं निशाणीहून तमाशा आणला व विष्णुमंदिरापुढच्या पटांगणांत रात्रभर अचकट विचकट शिव्यांचा गोंधळ घातला, त्या दिवशीं तर गांवांत आणि आजूबाजूच्या भागांत हळुहळू उठणाऱ्या या विरोधी वावटळीचे परिणाम कोणते होणार अशा भीतीनं ती मनांतल्या मनांत अगदीं धास्तावून गेली होती. पण प्रभाकर तिला म्हणाला होता, ' पंधरा वर्षे मीं लोकाची सेवा केली ती काय मतलबी लोकांच्या फुंकरानं उडून जाईल? लोकांची माझ्यावर अन् आपल्या घरावर श्रद्धा आहे. धुमाळासारखीं माणसं निघालीं म्हणून काय झालं? गांवांतलीं चार माणसं बिघडतील त्यांच्या नादानं. सबंध गांव बिघडेल कीं काय? सबंध जिल्हा माझा आहे. मीं लोकांना आपलंसं करून ठेवलं आहे.' आणि या त्याच्या उद्गारांची सत्यता तिला एखाद्या प्रसंगानं पटे, व तिला पुन्हां समाधान

होई. "तुम्ही याल तरच हें होईल. तुमचा शब्द लोक ऐकतात..." हे अण्णासाहेबांचे उद्गार ऐकून तिला आत्तांहि हाच आनंद झाला. पण "येईन ना! यायलाच हवं." असं प्रभाकरन दिलेलं उत्तर ऐकून तिला वाईट वाटलं. तिच्या मनांत आलं, पहा, मला दिलेलं आश्वासन हा कांहीं लक्षांत ठेवणार नाहीं; मला एकटीला सोडून हा इकडे येणार. पण तिनं मनाशीं विचार केला, या बाबतींत हट्ट करणं मला शोभायचं नाहीं. याच्या कामाच्या आड येणं हें माझं कर्तव्य नव्हे. त्याला जावं लागलं, तर आपण जा म्हटलं पाहिजे...

स्वतःच्या मनाची अशी तयारी तिनं केल्यामुळें तिच्या घरीं दोनच दिवस राहून प्रभाकर जावयास निघाला तेव्हां त्याच्या वचनभंगाबद्दल तिनं त्याची लाडिकपणानं चेष्टा केली, पण त्याच्यावर रागावून त्याला जाणं कठीण व्हावं असा हट्ट केला नाहीं. मात्र तो गेल्यानंतर तिला आपल्या माहेरींसुद्धां चैन पडेना. वास्तविक शरीराच्या अशा अवस्थेंत ती होती आणि नंदगढला तिला इतकी धांदल करावी लागली होती, कीं निर्वेध विश्रांति केव्हां मिळेल असं तिला झालं होतं, आणि अशी विश्रांति माहेरीं मिळेल अशी खात्री असल्यामुळें भाऊंकडे व आईकडे यावयासाठीं ती उत्सुक झाली होती. पण आतां इथें घरीं आल्यावर तिला वाटू लागलं, प्रभाकरपासून अशी दूर मी कशी राहूं ? तिचा जीव सासरकडे ओढ घेऊं लागला. नंदगढला असतांना तिला आईबापांच्या व धाकट्या भावाच्या वरचेवर आठवणी होत, आणि त्या झाल्या कीं तिला वाटे पंख लावावेत आणि उडून जावं. पण आतां इकडे आल्यावर तिला नंदगढच्या धांदलीनं भरलेल्या दिनक्रमाची, दादांच्या विनोदी खंवचट बोलण्याची, प्रभाकरच्या गोड सहवासाची दहादां आठवण होई, आणि वाटे तिकडे धाव घ्यावी. उषाच्या मनांत येई ही काय चमत्कारिक मनाची द्विधा अवस्था ? लग्न झाल्यानंतर सगळ्याच तरुण मुलींच्या वांट्याला ही येते, कीं मलाच अनुभवावी लागत आहे ?...

तरी प्रभाकरचा प्रत्यक्ष सहवास सोडला तर नंदगढापासून आपण पुरत्या दुरावलों आहोंत असं तिला वाटण्याचं कारण नव्हतं. एक दोन

दिवसांआड तिकडून कोणी ना कोणी उषाच्या घरीं येई; आणि येणारं माणूस रिकाम्या हातांनीं येत नसे. कधीं भाजीनं भरलेली करंडी येई. कधीं मुद्दाम उषासाठीं मळींतलीं कोवळीं लुसलुशीत कणसं धाडलेलीं असत. कधीं मोठं पातेलं भरून चक्का धाडलेला असे, आणि 'अजयला श्रीखंड फार आवडतं, म्हणून त्याच्यासाठीं धाडला आहे' असा निरोप त्याबरोबर आलेला असे. येणाऱ्या प्रत्येक माणसाबरोबर उषासाठीं चूर्ण म्हणा, भस्म म्हणा, मात्रा असं कांहीं तरी औषध दादानीं धाडलेलं असे, आणि तें केव्हां घ्यायचं, किती घ्यायचं त्याबद्दलच्या सूचना देण्यासाठीं लिहिलेल्या छोट्या पत्रांत दोन वाक्यांचा तरी थट्टाविनोद त्यांनीं केलेला असे. एकदां त्यांनीं लिहिलं होतं,

"खरं म्हणजे तुला जें औषध आज पाठवीत आहे त्याला अनुपान असं कीं तूं रोज शेरभर गाईचं दूध प्यालं पाहिजेस. तिकडे गाईचं दूध मिळेल का? आई म्हणाली 'आपली एक गायच पाठवून देऊं सूनबाईकडे, म्हणजे अडचण नाहीं.' मीं तिला म्हटल 'दुधाची अडचण नाहींशी होईल, पण गायीचीच अडचण होऊन बसेल. सूनबाईच्या घरांत गाय बांधणार कुठें?' तुझे भाऊ लिहायला वाचायला बसतात त्या खोलीचं रूपांतर गोठ्यांत होऊं द्यायला ते तयार आहेत का विचारून मला कळव. आमची गाय केव्हांही यायला तयार आहे..."

नंदगढला परत जाणाऱ्या माणसाबरोबर प्रत्येक पत्रांत उषा दादांना विचारी, तिकडली सविस्तर बातमी कां नाहीं तुम्ही लिहीत? तेव्हां त्यांनीं एका पत्रांत तिला लिहिलं, "इनामदारांच्या सूनबाई माहेरपणाला गेल्या आहेत ही एकच महत्त्वाची बातमी सध्यां गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं आहे. अन् ही बातमी तुला माहीत असेल अस मला वाटलं म्हणून इतके दिवस तुला कळविली नाहीं. याइतकीच महत्त्वाची दुसरी बातमी गांवांत उठलेली आहे ती ही, कीं इनामदारांच्या सूनबाई महिनाभरानं परत येणार आहेत. माहीतगार गोटांत या बातमीला दुजोरा मिळतो कीं नाहीं तें पुढच्या पत्रांत कळवीन..."

दादांच्या व उषाच्या वयांत पुष्कळच अंतर असतांनाही त्या दोघांत जें मनमोकळेपणाचं नातं झालं होतं त्याची खूण पटविणारा मजकूरही

त्यांच्या एखाद्या पत्रांत असे. एकदां त्यांनीं लिहिलं, "तूं गेल्यापासून थट्टामस्करी करायला मला माणूस राहिलं नाहीं अन् मला चुकल्या चुकल्यासारखं होत आहे. खरं सांगायचं म्हणजे एकंदर घरालाच ओके-पणा आला आहे. तुझ्यामुळें घर कसं भरलेलं दिसत होतं तें आतां आम्हांला कळतं आहे. तुला कदाचित् माहीत नसेल उषा, पण मी लग्न न करतां राहिलों म्हणून बाबा अन् आई माझ्यावर रागावलीं होतीं, आणि प्रभाकरही तिशी उलटली तरी लग्नाची गोष्ट बोलेना, तेव्हां तोहि माझ्या मूर्खपणाचा कित्ता गिरवितो कीं काय अशा भीतीनं तीं दोघं कांहींशीं उदास व्हायला लागलीं होतीं. पण तूं प्रभाकरला भेटलीस अन् त्याला अगदीं मारूनच टाकलंस ! तो जेव्हां एके दिवशीं घरीं आला अन् बाबांना म्हणाला, 'मी लग्न करणार आहे; मुलगी पाहायला चला,' तेव्हां मुलीच्या घरच्या श्रीमंतीची चौकशी त्यांनीं एरवीं केली असती ती मुळींसुद्धां केली नाहीं. आम्ही तुला पाहून इकडे परत आलों तेव्हां आई सगळ्यांना सांगत सुटली, मुलगी नक्षत्रासारखी आहे. आणि खरोखर एखादं शुभनक्षत्र उगवावं त्याप्रमाणें तूं या घरांत आल्यापासून घर प्रसन्नतेनं भरून टाकलंस आणि आतां आणखी एक नक्षत्र तूं आमच्या घरांत आणणार आहेस ! आमच्या आयुर्वेदाचा एका बाबतींत तूं पराजय केला आहेस, तुला ठाऊक आहे का ? तोंडल्याचा निषिद्धपणा तूं साफ खोटा ठरविला आहेस ! तुला आठवतं का, एक दिवस उजाडत तूं दुधाची चरवी घेऊन सैंपाकघरांत आलीस तेव्हां तुझ्या तोंडांत तोंडलं पाहून मीं तुला म्हटलं, 'टाकून दे तें.' तूं विचारलंस, 'कां ?' मीं सांगितलं, 'तोंडलीं खाल्लीं कीं मुलं होत नाहींत. तूं नुसतं 'इश्श' म्हणून हंसलीस. किती लबाड ग तूं ! त्या वेळींच मला कां सांगितलं नाहींस ग ? आणि मी येवढा पटाईत वैद्य—नुसतं माणसाच्या चेहऱ्याकडे पाहून निदान करतों अशी ऐट मिरवणारा. पण मलाहि तुझं गुपित ओळखतां आलं नाहीं ! माझी अगदीं फजीति केलीस तूं..."

दादांच्या असल्या पत्रांनीं उषाच्या मनाला उल्हास वाटे. आणि मग मध्येंच एखादे दिवशीं प्रभाकर अकस्मात् आला कीं तो दोन दिवसांनीं पुन्हां जाणार याबद्दल रुष्ट व्हावंसं तिला न वाटतां तिच्या अंतःकरणांत

आनंदाची रोषणाई होत असे. एकदां तो आला व तिला पाहतांच आश्चर्यानं म्हणाला,

"हें काय?"

पुढच्या खोलींत ती व्हायोलिन वाजवीत बसली होती!

"तुझ्या अंगचा हा गुण इतके दिवस कां लपवून ठेवला होतास?" त्यानं हंसत विचारलं.

तिनं गज पेटींत ठेवला व व्हायोलिनही ठेवून देण्यासाठीं दूर केलं. तेव्हां तो तिला आडवून म्हणाला, "वा वा! ठेवून का म्हणून देतेस? ऐकूं दे कीं मला." त्यानं गज पुन्हां काढून तिच्यापुढे धरला. "हं वाजव!"

"वेडे तर नाहीं तुम्ही?" ती हंसूं लागली.

"वेडा म्हण. पण वाजव."

"अहो, वाजव काय? करमेना म्हणून अजयचं हें व्हायोलिन काढून बसलें होतें. तो व्हायोलिनच्या क्लासला जातो आतांशा. हें कांहीं माझं नव्हे."

"कोणाचंही कां असेना! वाजवीत होतीस हें तर खरं?"

"वाजवणं का म्हणायचं त्याला? गज कसा फिरवायचा तेंसुद्धां मला ठाऊक नाहीं. उगीच आपली सा–सा रे–रे करीत बसलें होते."

"तेंच पुन्हा कर. मला गोड लागेल!"

"हें लाघट बोलणं कशासाठीं चाललंय मला कळतं बरं का!" उषा मानेला झटका देऊन म्हणाली. "मला वाट पाह्यला लावण्याचा अपराध केला आहांत, त्याच्यावर पांघरूण घालण्याची युक्ति आहे ही. पण मी फसायची नाहीं हो. खूप रागवायचं ठरवलं आहे मीं." तिनं व्हायोलिन पेटींत ठेवून पेटी बंद केली.

प्रभाकर तिच्याकडे हंसत पहात राहिला, "मींसुद्धां ठरवलं आहे—"

"काय?"

"तुझा सारा राग काढून टाकायचं!"

"असं का?" तिनं हंसून विचारलं. "मग बघूं का तुमची परीक्षा?"

"हं !—पण आधीं मी दमून आलों आहे. माझं स्नान व्हायचं आहे, मला भूक लागली आहे, याचा कांहीं विचार कर कीं !"

तें ऐकतांच 'अग बाई !' असा उद्‌गार काढून तिनं तोंडावर तळहात टेकला. "माझं लक्षच कसं नाहीं ? माफ करा हं." असं प्रभाकरला हंसत म्हणून ती दूर झाली, व "आई ! ए आई !" अशा आनंदानं हांका मारीत ती आंत पळाली.

आणि मग जेवतांना व जेवल्यानंतर प्रभाकर जेव्हां तिला इकडल्या तिकडल्या गोष्टी सांगूं लागला, तेव्हां त्याच्यावर रागावून तो समजूत कशी काढतो त्याची परीक्षा पहाण्याची आठवणच तिला राहिली नाहीं.

प्रभाकरनं राजकारणाच्या ज्या हकीगती तिला सांगितल्या, त्यांत कांहीं गोष्टी गभीर आणि चिंता उत्पन्न करणाऱ्या होत्या. सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस महात्मा गांधी कलकत्ता सोडून दिल्लीस आले, तेव्हांपासून त्यांचा मुक्काम दिल्लीसच होता. परंतु फाळणीनंतर पंजाबांत आणि बंगाल्यांत जी अस्वस्थता आणि अराजक माजलं होतं तें अजूनहि शमलं नव्हतं. निर्वासितांचे लोंढेच्या लोंढे आश्रयाची आशा दिसेल तिकडे गेल्यामुळें देशाच्या दूरदूरच्या कोपऱ्यांतल्या लोकांच्याहि जीवनावर फाळणीच्या आपत्तीचा परिणाम होऊन असंतोष उत्पन्न झाला होता. आवश्यक वस्तूंचं दुर्भिक्ष्य लोकांना जाणवत होतं, नफेबाजीचं व्यसन व्यापाऱ्यांमध्यें वाढत होतं. नियंत्रणांच्या घटहुकुमांनीं जनता गांजली होती. या साऱ्या प्रकारांमुळें एकंदर साऱ्या देशातच असंतोषाचा भडका उडाला होता. कॉंग्रेसवरची लोकांची निष्ठा संपूं लागली होती. प्रांतिक सरकारांतलीं भांडणं, कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांचा सत्तेचा हव्यास आणि अप्रामाणिकपणा, इत्यादि गोष्टींमुळें लोकांच्या मनांत कॉंग्रेसविषयीं अप्रीति वाढूं लागली होती. कॉंग्रेसवाल्यांचा हा अधःपात गांधींना दिसत होता. राजकीय संघटना या नात्यानें कॉंग्रेसचं आतां विसर्जनच केलं पाहिजे असं ते उघडपणें बोलूं लागले होते. देशांतल्या क्षोभाला आणि अत्याचाराच्या प्रवृत्तीला आळा कसा घालावा हें त्यांना समजेनासं झालं होतं. तारीख २ ऑक्टोबर रोजीं त्यांचा अठ्याहत्तरावा वाढदिवस साजरा झाला. तेव्हां

गांधी म्हणाले, " माझ्या अंतर्यामीं तीव्र दुःखाखेरीज दुसरं कांहीं नाहीं. " जरी फाळणी झाली होती, तरी हिंदुमुसलमानांनीं बंधुभावानंच वागलं पाहिजे असं ते अजूनहि प्रतिपादीत होते. या प्रतिपादनामुळें त्यांची लोकप्रियता ढळूं लागली होती. रावळपिंडीच्या हिंदूंना आणि शिखांना त्यांनीं सल्ला दिला होता, कीं आपलीं घरंदारं सोडून भारतांत पळून येण्या-पेक्षां त्यांनीं तिकडेच रहावं, तसं करण्यांत प्राण गेले तरी ते द्यावेत. सामान्य लोकांना हा उपदेश अर्थातच मूर्खपणाचा वाटण्यासारखा होता. काश्मीरच्या प्रश्नावर पाकिस्ताननं हटवादीपणा चालविला होता, म्हणून भारत सरकारनं पाकिस्तानला देण्याचं कित्येक लक्षांचं देणं अडवून धरलं होत. ही रक्कम भारत सरकारनं पाकिस्तानला देऊन टाकावी असं गांधी सांगूं लागले. त्यांचं म्हणणं असं, कीं असं केल्यानं पाकिस्तानला सौजन्यानं आणि रीतीनं वागणं भाग पडेल. गांधींचा हाहि उपदेश लोकांना चमत्कारिक वाटण्यासारखा होता. नेहरू सरकारचं गांधींशीं पटेनासं होत चाललं आहे अशा गटारगप्पा पसरत होत्या. कांहीं माणसं उघड उघड म्हणूं लागलीं होतीं, कीं गांधींना वेड लागलं आहे.

प्रभाकर म्हणाला, " हिंदुमहासभेची मंडळी तर गांधींना नुसतं वेडे ठरवीत नाहींत, त्याच्याहि पुढें जात आहेत. दोन दिवसांपूर्वी पुण्यांत एका जाहीर सभेंत हिंदुमहासभावाल्यांनीं काय काय बोलून घेतलं, तुला माहीत आहे का ? "

उषा म्हणाली, " नाहीं. इथें आल्यापासून वर्तमानपत्र वाचणं मीं अजिबात सोडलंय. आमचे भाऊ तर असल्या सभांना कधींच जात नाहींत. तेव्हां मला कुठून माहीत असणार ? काय काय बोलून घेतलं ? "

प्रभाकर म्हणाला, " तिकडे निशाणीला मला जें कळलं तें सांगतों. वर्तमानपत्रांत तर त्यांचे कांहीं उद्गार आलेच आहेत. परंतु त्यापेक्षांहि भयंकर गोष्टी या सभेंत बोलल्या गेल्या असं म्हणतात. गांधींबद्दलचे असले उद्गार ब्राह्मणांच्या तोंडून निघावेत ही फार वाईट गोष्ट आहे. गांधींची विचारसरणी सामान्य माणसाच्या मनाला पटण्यासारखी नाहीं. ' हिंदूंनीं आणि शिखांनीं रावळपिंडीला मरावं, पण आपलीं घरं सोडूं नयेत '

हा उपदेश चमत्कारिक वाटण्यासारखा आहे. पाकिस्तानचं देणं देऊन टाकावं हाहि. पण म्हणून आपण गांधींना वेडे ठरवू शकत नाहीं. ते आपल्यांत रहावेत अशी आपली लायकी राहिली नाहीं, असं फार तर म्हणतां येईल." प्रभाकर बोलतां बोलतां थांबला, आणि जणूं मनांतला एक खोल विचार तो आतां उषाला सागणार होता, अशी चर्या करून पुढें म्हणाला, "कांहीं विवक्षित तत्त्वांवर गांधींनीं अढळ श्रद्धा ठेवलेली आहे, व प्राण गेले तरी ती श्रद्धा ते सोडणार नाहींत. दुसऱ्याच्या चांगुलपणावर नेहमीं भरंवसा टाकावा, आणि आपल्या वर्तनानं दुसऱ्यांतला देवपणा जागा करावा हें त्यांच्या जीवितांतलं एक आद्य तत्त्व आहे. त्यांच हें तत्त्व आपल्या मनाला सध्यांच्या प्रक्षुब्ध परिस्थितींत पटण्यासारखं नाहीं; पण म्हणून ते वेडे ठरत नाहींत, आणि त्यांच्याविषयीं भलभलतं अभद्र बोलणं तर हिंदुमहासभावाल्या लोकांना मुळींच शोभत नाहीं. त्यांना कल्पना नाहीं, पण त्यांच्या या असल्या भलत्या बोलण्यानं नसतीं संकटं उत्पन्न होणार आहेत."

उषानं घाईनं विचारलं, "काय, बोलले तरी काय हे लोक ?"

"गांधी लौकर मरतील तर बरं होईल, असं कांहीं वक्ते म्हणाले. एकजण म्हणे असंहि बोलला कीं त्यांचं आयुष्य संपत नसेल तर आपण संपवून टाकलं पाहिजे—"

"काय, सांगतां काय ?" उषा उद्गारली.

"तूंच बघ म्हणजे झालं." प्रभाकर म्हणाला, "या असल्या भाषणांचा फार वाईट परिणाम होणार आहे. आपल्या नंदगढकडच्या भागांत ब्राह्मणांविरुद्ध लोकमत कस उठविलं जात आहे तें आपण पाहतोंच. हीं भाषणं म्हणजे ब्राह्मणाविषयींचा द्वेष पसरविणाऱ्यांच्या हातीं मोठं कोलीत होणार आहे." तो बोलतां बोलतां फार गंभीर झाला आणि म्हणाला, "राजकीय चळवळीची कशी गुंतागुंत होत आहे बघ. कॉंग्रेसचं राज्य हें उच्चवर्णीयांचं राज्य आहे असं सांगून बहुजनसमाजवादी अराजक माजवीत आहेत. उलट नेहरू सरकार आणि गांधी मुसलमानधार्जिणे आहेत या मुद्यावर हिंदुमहासभेचे लोक असंतोष पेरीत आहेत. आणि

हिंदुमहासभेंत ब्राह्मणांचा भरणा असल्यामुळें त्यांना देशद्रोही ठरविणं बहुजनसमाजवाद्यांना सोपं जात आहे. म्हणजे बहुजनसमाजवाद्यांना नेहरू सरकारलाहि शिव्या देतां येताहेत, आणि नेहरूंवर आणि गांधींवर हिंदुमहासभा तुटून पडते म्हणून त्याकडे बोट दाखवून त्यांना ब्राह्मणांनाहि शिव्या देतां येताहेत! इथें परवां झालेल्या सभेसारख्या आणखी सभा जर होत गेल्या तर आपल्या भागांतलं राजकारण अगदीं गलिच्छ होणार आहे, आणि आपल्या जीवितावर त्याचे परिणाम होणार आहेत..."

बोलतां बोलतां तो एकदम गप्प झाला. त्याच्या त्या गप्प होण्याच्या तऱ्हेवरून आणि गंभीर चर्येवरून उषाला वाटलं, कीं 'आपल्या जीवितावर त्याचे परिणाम होणार आहेत' या वाक्याची फोड करण्यासाठीं कोणत्या तरी नव्या घटनेचा तो उल्लेख करणार होता. पण तोंडाशीं आलेले शब्द त्यानं आवरले होते असं वाटल्यामुळें 'काय सांगणार होतांत? सांगा.' असे शब्द तिच्या ओंठाशीं आले, तरी तिनंही ते आवरले. तीहि गप्प राहिली.

कांहीं वेळानं प्रभाकर म्हणाला, "पण पुरे झाला हा अप्रिय विषय. होऊं दे जें होणार असेल तें. सत्याला स्मरून अन् लोकांचं बरं करण्याच्या आपल्या प्रतिज्ञेला जागून जें करावंसं वाटेल तें करावं; मग लोकांकडून त्याचं फळ कांहीं का मिळेना!" ती पलंगावर पडली होती, तो कांठावरच मांडी घालून बसला होता. एकदम मांडी मोडून तो म्हणाला, "तुला सोसणार नाहीं अशी भीति वाटते म्हणून, नाहीं तर या वेळीं अशी इच्छा झाली आहे, कीं लांब कुठें तरी अगदीं एकांत जागीं जाऊन बसावं, आणखी—"

"कुणीं सांगितलं मला सोसणार नाहीं म्हणून?" तिनं त्याचा हात धरला व हंसून म्हटलं, "अवश्य जाऊं या—" ती उठून बसली. कपडे करून तीं दोघं मोटारींत बसलीं, तेव्हां गाडी सुरू करतां करतां प्रभाकर तिला म्हणाला, "भर दोन वाजतांच्या उन्हांत तुला घेऊन मी फिरायला निघालों आहे हें पाहून तुझ्या आई मला वेड्यांतच काढतील."

ती म्हणाली, "तिनं मागंच काढलंय तुम्हांला वेड्यांत."

" केव्हां ? "

" लग्नाच्या आधीं आमच्या घरीं सारखे हेलपाटे घालूं लागलांत तेव्हां ! "

" असं होय ? " तो हंसला.

" भाऊ एकदां काय म्हणाले होते, माहीत आहे का ? "

" काय ? "

" तुम्ही नवी मोटार घेऊन आलांत तेव्हां—"

" काय ? " ती काय सांगते तें ऐकण्यासाठीं तो अगदीं अधीर झाला होता. तें पाहून उषाला हंसू आलं.

" काय ?—सांग ना. "

" भाऊ म्हणाले प्रदर्शनासाठीं वरचेवर यावं लागणार म्हणून गाडी घेतली हें यांचं सांगणं केवळ सबबीपुरतं. उषाच्या भेटीसाठीं हवं तेव्हां येतां यावं म्हणून—"

तो मोठ्यांदा हंसत सुटला, व म्हणाला, " शाबास ! म्हणजे आमच्या साऱ्या युक्त्या भाऊंनीं ओळखल्या होत्या म्हणायच्या ! मला वाटत होतं माझा खरा हेतु मीं मोठ्या शिताफीनं लपविला आहे ! "

" तुम्हांला कांहीं लपवितां येत नाहीं जगापासून ! तुम्ही फार साधे आहांत ! " तिनं त्याचा हात धरला. त्या क्षणीं तिला त्याच्याबद्दलच्या नाजूक ममतेचा येवढा उमाळा आला होता, कीं तो न् ती घरीं असतीं तर तिनं त्याला मिठीच मारली असती.

रस्त्याच्या कडेला गाडी थांबवून एका मोठ्या मैदानाच्या कोंपऱ्यांत दाट हिरव्या रानवेलींनीं वेढलेल्या एका उचट चौथऱ्यावर तीं दोघं बसलीं तेव्हां त्यानं तिला विचारलं, " ही जागा ओळखलीस ? "

" हो ! इथेंच तुमचं प्रदर्शन भरलं होतं, नाहीं का ? "

त्यानं मान हालविली, व कांहीं वेळानं तो म्हणाला, " होय. इथेंच प्रथम मीं माझी बैलांची जोडी तुला दाखवली. अन् इथेंच प्रथम माझीं शेतं, मळा, आमचा वाडा, आमच्या घरांतलीं माणसं याबद्दल तुझ्याशीं बोलत बसलों. " तो तिच्याकडे टक लावून पहात राहिला व मग त्यानं एकदम विचारलं, " मी तुला आवडतों ? "

ती हंसली, व म्हणाली, " फार. "

" अन् माझीं माणसं ? "

" तींसुद्धां. दादा तर मला फार आवडतात. त्यांचा स्वभाव किती थट्टेखोर आहे. त्यांचं फटकळ बोलणंसुद्धां मला आवडतं. "

" पण तेवढं नसतं त्याच्या स्वभावांत तर फार बरं झालं असतं." प्रभाकर म्हणाला अन् गंभीर झाला. " त्यांच्या तसल्या बोलण्यानं अन् वागण्यानं उगीच शत्रु होतात घराला. मघाशीं घरीं बोलतां बोलतां दादांचीच एक गोष्ट तुला सांगणार होतों, पण गप्प बसलों. "

" कुणाशीं कांहीं भांडण केलं त्यांनीं ? "

" प्रत्यक्ष भांडण नाहीं, पण–"

" काय केलं ? "

" हिंदुमहासभेचीं माणसं आतांशा गांधीजींबद्दल भलभलतं बोलतात, त्यामुळें लोकांत तीं अप्रिय झालीं आहेत. रा. स्व. संघाचीं माणसंही. अशा परिस्थितींत आपल्या मळ्याची जागा रा. स्व. संघाच्या छावणीसाठीं दादांनीं द्यायला नको होती... "

" दिली त्यांनीं ? " उषानं आश्चर्यानं विचारलं, " पण तुम्ही—"

" मी नव्हतों नंदगढला. माझ्या पश्चात् झालं सारं. रा. स्व. संघाच्या लोकांना निशाणीच्या आसपास छावणी भरवायची होती. कुठें जागा मिळेना. मग त्यांचे प्रमुख गेले दादांकडे. त्यांची अन् दादांची शाळेंतली जुनी दोस्ती. त्यांची अडचण पाहून दादा त्यांना म्हणाले, ' ठीक आहे, घ्या आमची मळ्याची जागा.' छावणी भरली. व्याख्यानं झालीं, गांधींना शिव्या दिल्या गेल्या अस लोक म्हणतात. खरं खोटं देवाला माहीत. तुला माहीत आहे कीं दादा कॉंग्रेसवाले नाहींत, हिंदुमहासभावादी नाहींत. रा. स्व. संघाचाहि त्यांना पुळका नाहीं. सगळ्यांनाच मूर्ख ठरवून बोलण्याचा त्यांचा स्वतंत्र खाक्या आहे. पण आपल्या मळ्यांत संघाची छावणी भरली हें एक नवंच कोलीत मिळालं आपल्या शत्रूना. त्यांनीं दादांना हिंदुमहासभावाले ठरविलं आहे ! दादा म्हणतात, ' ठरवीनात का लेकाचे !' परिणामांची कल्पना नाहीं त्याना, पण मला आहे. कारण प्रत्यक्ष

राजकारणांत काम करतों आहे मी. अन् मला पुढेंहि करायचं आहे. आपण ब्राह्मण म्हणून ज्यांच्या डोळ्यांत सलत आहोंत त्यांना इनामदारांचा एक लेक कॉंग्रेसवाला आहे पण दुसरा गांधीद्वेष्टा आहे असं लोकमत चिथवतां आलं तर फार हवं आहे ! ”

“ चू ! असं व्हायला नको होतं. ” असं म्हणून उषा गप्प राहिली.

कांहीं वेळ त्यांच संभाषण बंद पडलं. पण मग तो म्हणाला, “ पण हा विषय उगीच निघाला पुन्हां. विसरून जा तूं. आपण दुसऱ्या गोष्टी बोलूं. ”

एक दोन मिनिटं तशींच गेलीं. मग उषा म्हणाली,

“ आपली स्वारी किती दिवस राहणार आहे ? ”

‘ स्वारी ’ शब्दांतला राग ओळखून प्रभाकर हंसला. त्यानं विचारलं, “ कां ? ”

“ रविवारीं रहावंच लागेल तुम्हांला. आधीं गेलांत तर अजय तुमच्यावर रागावेल. तुम्ही येणार म्हणून घोकतो आहे तो. त्याच्या शाळेचं गॅदरिंग आहे. तो नाटकांत काम करणार आहे. तुम्हीं तें पाहावं अशी त्याची फार इच्छा आहे. आतां संध्याकाळीं तुम्हांला भेटला कीं तो विचारील. ”

“ चांगलं करतो काम ? ”

“ गतवर्षी छान केलं होतं. ”

“ तूं केलं आहेस कधीं नाटकांत काम ? ” त्यानं एकदम विचारलं.

“ हो ! शाळेत दरवर्षी करीत असे. एका वर्षीच्या नाटकांत मीं म्हाताऱ्या मोलकरणीचं काम केलं होतं... ” तिनं हंसत ती हकीकत सांगितली. “ त्या कामाबद्दल मला पदक मिळालं होतं. ”

“ पदकाचं राहूं दे. ” प्रभाकर म्हणाला, “ पण तुला म्हाताऱ्या कुणबिणीचं विद्रूप काम देणाऱ्याच्या अकलेची तारीफ म्हटली पाहिजे. बाकी मलासुद्धां एकदां असंच विद्रूप केल होत आमच्या मास्तरांनीं. औरंगजेब झालों होतों मी ‘ आग्र्याहून सुटकें ’ त ! ”

“ तुम्ही ? ” ती हंसूं लागली, आणि अशा नजरेनं पाहूं लागली, कीं जणूं औरंगजेबाच्या सोंगांत तो कसा दिसला असेल याचं चित्र ती डोळ्यापुढें उभं करीत होती.

अशा गप्पांत किती वेळ गेला त्यांना कळलाहि नाहीं. पुढच्या गवतां-तल्या एका रानवेलीचा पाला खुडून घेऊन ती तो सारखा हुंगत होती. तो म्हणाला, " आतां जाऊं या ना ? " तेव्हां उठतांना तिनं हात त्याच्या नाकाशीं लावून विचारलं, " किती गंमतीदार वास आहे ! कसली वेल आहे ही ? "

" कसली कुणास ठाऊक ! " प्रभाकर म्हणाला. " वास गोड तिखट औषधी आहे खरा. दादा सांगेल तुला नांव, अन् मळ्यांत ही वेल नसेल तर तुला म्हणेल ' घेऊन ये. ' कुणाबरोबर तरी पाठवून दे त्याच्याकडे नमुना. "

" खरंच ! " असं म्हणून ती परतून वांकली, आणि त्या वेलीचा चांगला चार हात फोक तिनं ओढून उपटून घेतला.

तो हंसून म्हणाला, " ए ! खरंच पाठविणार कीं काय ? "

" हो. कां ? "

" आमचा दादा एक वेडा, अन् तूं दहा वेडी ! त्यानं मळ्याच्या अर्ध्या भागांचा वनस्पति–संग्रह करून टाकला आहे. तूं आतां असे नवे नमुने दे त्याला म्हणजे–" तो वाक्य अपुरं ठेवून हंसला.

" उगीच नका नांवं ठेवूं ! " ती म्हणाली. " किती सुंदर संग्रह केला आहे औषधी झाडांचा अन् वेलींचा दादांनीं. तुमच्या द्राक्षांच्या वाफ्यांनीं जशी शोभा आली आहे मळ्याला तशीच दादांच्या— "

" बरं बरं, चल. " तिला ओढून तो म्हणाला.

पण गाडींत बसल्यावरसुद्धां ती मळ्याबद्दल आणि औषधी झाडवेलीं-वरच्या दादांच्या प्रेमाबद्दल बोलत राहिली.

तीं दोघ घरीं परत आलीं तों नंदगडहून कृष्णा कदम आला होता. त्याला पाहून प्रभाकरनं सहज विचारलं, " काय कृष्णा, काय बातमी घेऊन आला आहेस ? "

" वाईट बातमी आहे. "

" आं ? " प्रभाकरनं एकदम चमकून विचारलं.

" परवां रात्रीं मळा जळला— "

" काय, सांगतोस काय ?" प्रभाकर उद्‌गारला. त्याच्याजवळ उभ्या असलेल्या उषानं तोंडावर हात ठेवला.

" जळला कसला, जाळला ! " कृष्णा म्हणाला. " सारे लोक असंच म्हणताहेत. संघाच्या लोकांची छावणी झाली ना मळ्यांत ? त्याचा बदला घेतला म्हणे हा ! मळा काय आपोआपच जळतो ? नीट व्यवस्था करून जाळलाय बघा ! सोन्यासारखीं द्राक्षाचे वाफे, दादांनीं जिवापलीकडे जपलेलीं औषधी झाडं, केळी, गुलाब–साऱ्यावर आग टाकली मांगांनीं ! ज्यांनीं हें पाप केल... "

कृष्णा आणखी बोलत राहिला. पण प्रभाकर आणि उषा यांचं लक्ष त्याच्या बोलण्याकडे नव्हतं. ती प्रभाकरकडे पहात होती. तो तिच्याकडे अशा अर्थान पहात होता कीं 'मीं म्हटलं नाहीं मघाशीं तुला ?... आपल्या भागांतलं राजकारण उत्तरोत्तर गलिच्छ होणार आहे !...आणि त्याचे आपल्या जीवितावर परिणाम होणार आहेत ! '...



# प्रकरण अकरावं



इस्पितळाच्या छोट्या इमारतीपुढच्या कमानीखालीं टांगलेल्या झंगटावर पहांटेच्या पांचाचे टोले मारून पुन्हां घोंगडं अंगाभोंवतीं लपेटून धाकू जागल्या शेकोटीपाशीं पुरता बसला न बसला तोंच फाटकापुढें एक मोटर थांबलेली त्याला दिसली, व दुसऱ्याच क्षणीं तिच्या हॉर्नचा पों पों आवाजहि त्याच्या कानावर आला. त्यानं आपले जाळावर धरलेले हात आवरून एकमेकावर चोळले, घोंगडं सावरलं, जमिनीवर आडवा टाकलेला दंडा उचलला, व तो फाटकाकडे लगबगीनं निघाला. हॉर्नचा पुन्हां एकदां आवाज झाला तेव्हां तो ओरडला, " आलों, आलों नव्हं का ! " त्यानं कोयडा काढून फाटकाचीं दोन्ही दारं आंत पुरतीं ओढलीं, व गाडींत कोण आहे तें पाहण्यासाठीं पुढें झाला. " काय धाकू ? " असा प्रश्न ऐकतांच इनामदारांच्या दादांचा आवाज ओळखून तो म्हणाला, " कोन आपुन व्हय ? " आणि त्यानं वाकून रामराम केला. उघडलेल्या फाटकांतून मोटर हलकेच आंत सरकूं लागली. धाकू तिच्याबरोबर पावलं टाकूं लागला.

दादांनीं विचारलं, " डॉक्टरीणबाई आहे कीं नाहीं बंगल्यावर ? "

" हये. " धाकूनं सांगितलं, " सावंतवाडीला गेली व्हती परवां—म्हंजी गुरुवारीं. काल रातची आली परत. परत आली ती काय, घडीभर इसावा घ्येतला म्हंता काय ? वडगांवचा रागुशेट बसलाच व्हता बगा वाट बगत येटिंगरुमांत. घोटभर चा नि तुकडाभर पाव खाल्लान् नि गेली त्येच्या शेटाणीला बघाया. उदरानी आजारी हये नव्हं का ती ! ह्ये पिपागत झालया बयाच पोट. तिला दवा देऊनशान आली ते फआटचं तीन वाजलं व्हतं. दोन घंटंबी झालं न्हाइती ती निजल्याला— "

"अरे !–" असा उद्‌गार दादांच्या तोंडून बाहेर पडला. दमून भागून अंथरुणांत पडून जिनं दोन तासांचीहि विश्रांति घेतली नाहीं, त्या डॉक्टरीणबाईला पुन्हां उठविण्याचा कठोरपणा आपल्याला करावा लागणार, असा विचार त्यांच्या मनांत आला होता.

जणूं त्यांचा तो विचार ओळखून धाकू जागल्या म्हणाला, "पर बोलावनं आलं म्हटल्यावर ती उठंल. आपुन आलाया म्हनतांना ती ताडदिशीं उठंल. कामाफुडं तहान, भूक, झोंप कशाची शुद न्हाती म्हंता तिला ? एक येळ इटुबा न्हाई हाकंला धांव घ्यायचा, पर ही बारवुनबाई न्हायची न्हाई धावल्याबिगर ! उगीच न्हाई गोरगरीब पायां पडत !..."

डॉक्टर मार्था ब्राऊन हिच्या आडनांवाचा 'बारवुन' हा अपभ्रंश धाकूच्या तोंडून ऐकून दादांना हसूं आलं. तो अपभ्रंश ते आतां प्रथम ऐकत होते असं नव्हे. निशाणीचे आणि आसपासचे अशिक्षित अडाणी तिला पहिल्यापासूनच बारवुनबाई म्हणत आले होते. निशाणीच्या पश्चिम दिशेला एक दोन मैलांच्या अंतरावर सरकारी 'तंबाखू फार्म'च्या समोर असलेलं मार्था ब्राऊनचं हॉस्पिटल "बारवुनबाईचं इस्पिताळ" या नांवानंच जवळच्या दूरच्या खेडुतांत ओळखलं जात होतं. बारवुनबाई हा अपभ्रंश दादांच्या कानीं तर हजारदां आलेला होता. पण तरी आतां धाकूच्या तोंडून तो ऐकतांच त्यांना हंसूं आल; आणि ज्या अत्यादरानं व कौतुकानं तो ब्राऊनबाईच्या कर्तव्यदक्षतेचं अन् कनवाळूपणाचं वर्णन करीत होता तें कौतुकही अगदीं योग्य होतं असं त्यांच्या मनांत आलं. 'उगीच न्हाई गोरगरीब पायां पडत !'. दादा मनाशीं म्हणाले, गोरगरीबच कां, श्रीमंत देखील मार्था ब्राऊनचे पाय धरतात. लोकांची तिच्यावर श्रद्धाच तशी आहे. तिच्या अंगची हुशारी अन् हाताचा गुणच तसा आहे. ब्राऊन-बाईच्या हातांत आपलं माणूस असलं कीं कशाच भय नाहीं असा भरंवसा लोकांना वाटतो...आतां हेंच पहा ना, उषाचं बाळंतपण मार्था ब्राऊनच्या हातून करायचं ही गोष्ट इनामदारांच्या आक्कासाहेबांनीं किती आधींपासून ठरविली होती. ब्राऊनबाईकडे गेल्या दीड महिन्यांत उषाला दाखविण्या-साठीं प्रभाकर तिला घेऊन चार वेळां आला होता, 'हिची प्रकृति उत्तम

आहे, बाळंतपणाचा मुळीं त्रास होणार नाहीं ' असं ब्राऊनबाईनं सांगितलं होतं, आणि तिनं सांगितलेल्या तारखेच्या दहा दिवस आधींच आज पहांटे उषाच्या पोटांत दुखूं लागल्याबरोबर प्रभाकर मुंबईला गेलेला असल्या-मुळें दादा एकटेच गाडी काढून ब्राऊनबाईला नंदगढला घेऊन जाण्या-साठीं आले होते. वाटेनं ते एकच चिंता करीत आले होते, ती ही कीं बाई कुठं गांवाला गेलेली नसली म्हणजे मिळवली. त्यामुळें बाई बंगल्यावर आहे असं धाकू जागल्याच्या तोंडून ऐकल्याबरोबर त्यांनीं मनाशीं सुटकेचा श्वास टाकला होता, आणि धाकूचं पुढचं बोलणं त्यांनीं गमतीनं ऐकून घेतलं होतं...

दादा गाडी कमानीकडे नेऊं लागले तेव्हां धाकू त्यांना म्हणाला, " तकडं कशापायीं ? बाईच्या बंगल्यावर ध्या कीं ! "

" असं ? " असं म्हणून दादांनीं उजव्या अंगच्या किंचित् चढणा-वरून गाडी नेली ती अगदीं आवाज होऊं न देतां. आणि छोट्या बंगली-पुढें गाडी उभी केल्यावरसुद्धां त्यांनीं हॉर्न वाजविला नाहीं. ब्राऊनबाईला झोंपेंतून उठविणं त्यांना भाग होत. पण तें करतांना आपल्या हातून अशिष्ट वर्तन होतां कामा नये हें त्यांना कळत होतं...ते हळूच गाडींतून खालीं उतरले.

पण त्यांची चाहूल लागल्यामुळें ब्राऊनबाईचा कुत्रा भोकूं लागला, आणि दारावर थाप मारावी कीं न मारावी अशा विचारांत दादा होते तोंच पावलांची चाहूल झाली. व्हरांड्यांतला दिवा लागला, आणि " जॅक, चूप चूप ! " असे शब्दहि त्यांच्या कानांवर आले. तो आवाज डॉक्टरीण-बाईचा नव्हता. पण बाईचा होता. दादांनीं लाकडी पट्ट्यांच्या जाळीच्या भोकांतून पाहिलं तों सतरा अठरा वर्षांची एक काळी किरिस्ताव मोलकरीण पुढें येऊन दार उघडीत होती. ती इतक्या वयाची, पण तिनं लहान मुलीप्रमाणें परकर पोलका घातला होता, याचा दादांना चमत्कार वाटला. तिच्याकडे सरळ बघणं त्यांना जमेना. ती दादांना म्हणत होती, " या ना आंत ! ए जॅक, चूप म्हटलं ना ! चूप ! या. "

दादा व्हरांड्यांत गेले व म्हणाले, " डॉक्टरीणबाई झोंपल्या आहेत ना ? "

“ हां, तीन वाजतां– ”

“ पण त्यांना उठवायला पाहिजे. ”

“ कोण आलं आहे म्हणून सांगूं ? ”

दादांनीं नांव सांगितलं, कामही सांगितलं.

“ बसा. ” म्हणून सांगून ती मुलगी मार्था ब्राऊनला उठविण्यासाठीं आंत गेली.

दादा एका खुर्चीवर बसले. जॅकचं भुंकणं आतां बंद झालं होतं. तो आतां फरशीवर पुन्हां पहुडला होता. पण पुढच्या पायाच्या बचकांत तोंड ठेवून पडल्या पडल्या त्याचं हलक्या आवाजांतलं गुरगुरणं अजून चालूच होतं. जणूं तो दादांना म्हणत होता, तुमच्यावर माझं लक्ष आहे बरं का ! जर कांहीं गडबड केलीत तर बघा...दादांनीं इकडे तिकडे पाहिलं. चार सहा खुर्च्या, दोन हॅट–स्टॅंड, एक वेताची आरामखुर्ची एवढंच फर्निचर तिथें होतं. आरामखुर्चीपुढं एका रुंद बैठ्या टेबलावर वर्तमानपत्रं अन् पुस्तकं पडलीं होतीं. एका टेबलावर रोज तारीख फाडायचं बैठं कॅलेंडर होतं. शुक्रवार ता. २९ जानुआरी, १९४८ अशी कालची तारीख त्यावर होती... वाऱ्याच्या झोतानं टेबलावरचीं वर्तमानपत्रं फडफडलीं. जॅकनं एकदम आवाज चढवून गुर्रर्र केलं. “ जॅक ! ” म्हणण्याचा प्रयोग दादांनीं करून पाहिला, तो यशस्वी झाला. आपली झुपकेदार शेपटी फरशीवर तीन चारदां आपटून जॅक गप्प झाला. झुळकेबरोबर गोड नाजुक सुगंधाचा दरवळ आला. बाहेर जवळच कुठें तरी रातराणीच्या झाडावर तिचे तुरे फुलले असले पाहिजेत. बाहेर अंधार होता. लाकडी पट्ट्यांच्या बारीक चौकोनी भोकांतून थोड्या चांदण्या दिसत होत्या. दादांच्या मनांत काय आलं कोण जाणे, ते उठले, टेबलाजवळ गेले. त्यांनीं कॅलेंडरवरचं पान फाडलं. शनिवार तारीख ३० जानुआरी उजाडल्याप्रमाणें त्यांना वाटलं. कॅलेंडरकडे पहात ते मनाशीं म्हणाले, आज पौष कृष्ण पंचमी ! रवि चंद्र चांगल्या नक्षत्रांवर आहेत ! उषाची प्रसूति चांगल्या मुहूर्तावर होईल...ते खुर्चीवर पुन्हां बसण्यासाठीं वळले तोंच दारावरचा पडदा दूर करून त्याचा घोळ हातांत धरून चौकटींत

उभी राहिलेली मार्था ब्राऊन त्यांना दिसली. ती हंसून म्हणाली, " गुड मॉर्निंग, दादा ! "

ते म्हणाले " गुड मॉर्निंग. "

" मला घेऊन जावयास आलां आहांत काय ? "

पुस्तकांतलं वाक्य वाचल्याप्रमाणें व्याकरणशुद्ध बोलण्याची तिची तऱ्हा, आणि चुकत माकत पण मराठींतच बोलण्याची तिची हौस दादांना नेहमींच गंमतीची वाटली होती. ते किंचित् हंसले व म्हणाले,

" तुम्हांला त्रास देणं जिवावर येतं, पण— "

" नाहीं, नाहीं ! " ती मान हालवून म्हणाली, " तुमच्या जीवावर यावयास नको. माझ्या कर्तव्यालाच बोलावण्यास तुम्ही आलांत ! उषा-बाईंना बेबी होण्याचा दिवस दहा फेब्रुआरी दिला होता मीं. "

" हो ना. पण आजच तिचं पोट—"

" कधीं कधीं अंदाज चुकतो असा. पण चिंतेचें कारण नाहीं. मी कपडे पांघरतें आणि येतें. बसाल ना त्या वेळापर्यंत ? "

" बसतों. सावकाश आटपा तुमचं. "

ब्राऊनबाई आंत गेली. पण पुन्हां परतून तिनं विचारलं, " उषाबाईंना फार त्रास होत आहे काय ? "

" छे छे ! "

" तुम्हीं सर्व तयारी ठेवली असेल अशी मी आशा करतें. "

" अगदीं उत्तम ठेवली आहे. "

" हें ऐकण्यांत मला आनंद होत आहे. आलेंच बघा मी. " असें म्हणून ती आंत गेली.

आवाज जरा उंचावून दादा म्हणाले, " सावकाश होऊं द्या तुमचं. "

ते खुर्चीवर बसले. ते निश्चिंत होते. मुख्य काळजी होती मार्था ब्राऊन जागेवर सांपडते कीं नाहीं. ती सांपडली होती. आतां सारं ठीक होणार याबद्दल त्यांना शंका नव्हती...उषाच्या बाळंतपणाची सारी तयारी अगदीं उत्तम ठेवण्यांत आली होती...तिचं बाळंतपण माहेरीं व्हावं असा

तिच्या आईची इच्छा होती. आक्कासाहेबांनीं उषाला नंदगढला आणण्याचा हट्टच केला तेव्हां तिच्या आईनं अखेर संमति दिली होती, पण ती नाखुषीनंच. भाऊसुद्धां दोन तीनदां म्हणाले होते, "इथें शहरांत जशी व्यवस्था होईल तशी नंदगढला कशी होणार?" तेव्हां आक्कासाहेब म्हणाल्या होत्या, "बघा तरी. आमचं नंदगढ खेडं खरं, पण निशाणीला ब्राऊनबाई आहे ती मुंबईतल्या साऱ्या डॉक्टरांहून हुशार आहे. तिचा आमचा घरोबा आहे. अन् तिच्या हॉस्पिटलमध्येंसुद्धां नाहीं पाठवणार मी सूनबाईला. आमच्या जुन्या शकुनी वास्तूंत करायचं तिचं बाळंतपण. ज्या घरांत प्रभाकर झाला तिथेंच आतां बत्तीस वर्षांनंतर त्याच्या मुलाचा जन्म आमच्या कुलदेवतेच्या साक्षीनं व्हायला हवा. ब्राऊनबाईला म्हणणार आहें तुला इथं आलं पाहिजे. तूं म्हणशील त्याप्रमाणें सारी व्यवस्था ठेवतें वाटलं तर. हवा, उजेड उत्तम पाहिजे म्हणून नवी छोटी माडी बांधू..." आणि आक्कासाहेबांनीं खरोखरच असं केलं होतं. अवघ्या दीड महिन्यांत अगदीं नव्या थाटाची छोटी माडी बांधण्यांत आली होती. ब्राऊनबाईच्या सल्ल्यानं त्या खोलींतलं फर्निचर खरेदी करण्यांत आलं होतं. त्या खोलींत पाऊल टाकतांच इनामदारांच्या जुन्या वाड्यांतनं निघून एखाद्या आधुनिक हॉस्पिटलच्या दालनांत आल्याप्रमाणें वाटे. आक्कासाहेब उषाला वरचेवर म्हणत, "तुझ्या भाऊंना मीं म्हटलं त्याप्रमाणें केली ना सारी व्यवस्था? लेकीचं बाळंतपण सासरीं कसं होतंय काय जाणं अशी काळजी आतां नाहीं ना त्यांना वाटायची?" उषा म्हणे, "त्यांना काळजी करायची असती तर त्यांनीं इकडे धाडलीच नसती मला!" ...उषासाठीं तयार करण्यांत आलेल्या माडीचा प्रवेशसमारंभ थाटांत करण्यांत आला होता. सारी तयारी पुरी झाली होती. ब्राऊनबाईनं सांगितलं होतं उषाची वेळ फेब्रुआरीच्या दहा तारखेस येईल. पण त्याच्या आधींच तीन आठवडे माडी अगदीं सुसज्ज तयार झाली होती...आणि झाली हेंच बरं झालं होतं. कारण दहा दिवस आधीं आजच पहांटे उषाच्या पोटांत दुखूं लागलं होतं. दादा लगोलग गाडी काढून ब्राऊनबाईला न्यायला आले होते.

...एकच वाईट गोष्ट होती. प्रभाकर नंदगढला नव्हता! उषाच्या प्रसूतीला निदान तीन आठवड्यांचा अवधि आहे अशा खात्रीमुळें तो म्हणाला होता, जाऊन येतों. चार पांच दिवसांत परत येण्याच्या बेतानं तो गेला होता, पण अजून आला नव्हता. तो गेलाहि नसता. पण पुणें जिल्हा कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षांची त्याला तार आली होती, ताबडतोब निघून या म्हणून. जिच्यामुळें सारा देशच हवालदिल व्हावा, पण कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांत विशेष खळबळ उडावी, अशी एक घटना घडली होती. जानेवारीच्या तेरा तारखेस गांधीजींनीं प्राणांतिक उपास सुरू केला होता...

"दादा! चला, मी तयार आहें." असे मार्था ब्राऊनचे शब्द कानीं पडतांच दादांची विचारांची तंद्री संपली. ते चटकन् खुर्चीवरून उठले, आणि म्हणाले, "चला."

गाडी रस्त्याला लागल्यावर ते म्हणाले, "बाई, तुम्हीं मला क्षमा केली पाहिजे हं. तुम्हांला पुरती दोन तासमुद्धां झोंप मिळाली नाहीं. राघूशेटकडून परत येऊन तुम्ही तीन वाजतां निजलांत हें मला समजलं होतं, तरी मीं तुम्हांला उठविलं. तुम्हीं मला क्षमा केली पाहिजे."

मागच्या बाजूस बसलली ब्राऊनबाई म्हणाली, "क्षमा, क्षमा, हें तुम्ही काय बोलत आहांत, दादा? मला खरोखर समजत नाहीं. आणि तुम्हांला खरी गोष्ट सांगू? अलीकडे मला अंथरुणांत पडलें तरी झोंपच लागत नाहीं बघा. माझ्या मनांत सारखे विचार चालू असतात."

'कसले विचार?' असे शब्द दादांच्या तोंडाशीं आले. परंतु त्यांनीं ते उच्चारले नाहींत. असा प्रश्न विचारणं म्हणजे तिच्या खाजगी आयुष्याविषयीं चौकसपणा दाखविल्यासारखं होईल अशा शंकेनं ते गप्प राहिले.

परंतु ब्राऊनबाईच पुढें म्हणाली, "दादा, तुम्हांला खोटं वाटेल, परंतु आतांशा माझं मन गांधींविषयीं सारखं विचार करीत असतं."

"गांधींविषयीं?" दादा एकदम उद्गारले.

...खरं म्हणजे ब्राऊनबाईच्या बोलण्याचं त्यांना फार आश्चर्य वाटण्याचं कारण नव्हतं. गांधी म्हणजे चमत्कारिक विचाराचे एककली हट्टी गृहस्थ आहेत असं जरी त्यांचं स्वतांचं मत असलं, गांधींच्या वर्चस्वामुळें देशाच्या

राजकारणाला फार चमत्कारिक वळण लागलेलं होतं आणि स्वत: गांधी कितीहि प्रामाणिक आणि उदात्त हेतूचे असले तरी स्वतःच्या मतलबासाठीं त्यांचा उदोउदो करणाऱ्या कॉंग्रेसवाल्यांत ढोंगाचं प्राबल्य माजलं होतं असं जरी त्यांना वाटत होतं व ते फटकळपणानं उघडउघड बोलून दाखवीत होते, तरी गांधींबद्दल मिशनरी लोकांत सामान्यतः कोणत्या भावना होत्या याची दादांना कल्पना होती. ते पुष्कळदां म्हणत, "गांधींना आम्हीं कितीहि नांवं ठेवलीं तरी देशांतल्या निरनिराळ्या लोकांत निरनिराळ्या कारणासाठीं गांधीं-विषयीं केवढा जिव्हाळा आहे तें आम्हांला दिसतं. गांधींच्या पुण्याईवरच आपल राजकारणांतलं स्थान टिकायचं आहे हें माहीत असल्यामुळें कॉंग्रेस-वाल्यांना ते गुरु म्हणून हवे आहेत. गांधींचा आवाज ऐकू येत आहे तोंपर्यंत हिंदुस्थानांत एक वेळ हिंदूंच अकल्याण होईल, पण मुसलमानांचं कधींच होणार नाहीं हें पक्कं माहीत असल्यामुळें मुसलमानांनाहि ते एक विश्वसनीय मित्र म्हणून हवे आहेत. आणि पतितांचा कैवार घेणाऱ्या येशू ख्रिस्ताप्रमाणें गांधींच एकंदर चरित्र आहे अशा समजुतीनं येशूचा दुसरा अवतार म्हणून मिशनरी लोकांना त्यांच्याबद्दल अगदीं गाढ आत्मीयता वाटत आहे. हिंदुस्थानचे एक राजकीय पुढारी या दृष्टीनें मुळीं हे मिशनरी लोक गांधींकडे पहातच नाहींत. जगांत जिकडे तिकडे उठूं पाहणाऱ्या अत्या-चारी पशुतेला आवरणारा आणि शांतीचं साम्राज्य स्थापण्यासाठीं स्वतःच्या प्राणांचं बलिदान करणारा एक महात्मा या दृष्टीनंच हे लोक गांधींकडे पहातात."...दादांना आठवत होतं कीं ज्या ज्या प्रसंगीं गांधींनीं उपास सुरू केला त्या त्या प्रसंगीं कॉंग्रेसवाल्यांत उडाली नसेल इतकी खळबळ मिशनरी लोकांत उडाली होती...'आतांशा माझं मन गांधीं-बद्दल विचार करीत असतं' हे ब्राऊनबाईचे शब्द ऐकून दादांना विशेष आश्चर्य वाटण्याचं कारण नव्हतं. केवळ तिच्या तोंडनं गांधींचं नांव अनपेक्षितपणानं निघालं एवढ्याच कारणानं त्यांनीं उद्गार काढला "गांधींविषयीं!"

"होय दादा, गांधींविषयीं." असं ब्राऊनबाई म्हणाली, आणि मग ती गांधींविषयीं बोलत राहिली.

हिंदुस्थानांतील अल्पसंख्य मुसलमानांना स्वतःच्या जीविताचा आणि वित्ताचा पूर्ण भरंवसा वाटला पाहिजे, यासाठीं हिंदूनीं अत्याचारी वृत्ति अजिबात सोडली पाहिजे, आणि असं होत नसेल तर मला जगण्याची इच्छा नाहीं, असं म्हणून गांधींनीं तेरा तारखेचा उपास सुरू केला होता. गांधींचे विचार आणि आचार दादांना सहसा पटत नसत. गांधींनीं दिल्लींस सुरू केलेला हा उपास देखील त्यांना आततायीपणाचा वाटला होता. ते स्वतः हिंदुमहासभावादी नव्हते. परतु त्याचप्रमाणें कॉंग्रेसवालेहि नव्हते. गांधी आतां अठ्याहत्तर वर्षांचे होते. या वयांत उपासाचं दिव्य करणं सोप नव्हतं. हें दिव्य करतांना त्यांचा देहपात झाला तर ती अत्यंत दुःखाची गोष्ट होईल असं दादांना मनापासून वाटलं होतं. परंतु या उपासाचं कौतुक करायला ते मुळींच तयार नव्हते. गांधींचं सारं राजकारण अनैसर्गिक आहे असं ते नेहमीं म्हणत असत. या वेळींहि ते असंच म्हणाले...परंतु ब्राऊनबाई अगदीं निराळ्या दृष्टीनं गांधींच्या या उपासाकडे बघत होती, असं तिच्या बोलण्यावरून त्यांना दिसून आलं. ती म्हणत होती,

" माणसें जेव्हां माणुसकी विसरतात तेव्हां गांधींसारख्या पुरुषांनीं प्राणार्पणाचे क्लेश सोसलेले पाहूनच तीं शुद्धीवर येऊं शकतात. आतां हेंच पहा ना दादा, गांधींनीं हा उपास सुरू केला नसता तर बंगाल्यांत ज्या गोष्टी झाल्या त्याच देशाच्या राजधानींत घडल्या असत्या. पण त्या घडल्या नाहींत. गांधीजींनीं उपास सुरू केल्याबरोबर अवघ्या पांच दिवसांत कोणता अद्भुत चमत्कार झाला तुम्हीं पाहिलात ना? दिल्लींतल्या साऱ्या जमातींचे पुढारी एकत्र आले, त्यांनीं एक शांतता समिति स्थापन केली. यापुढें शहरांत सर्व जमाती सलोख्यानं आणि बंधुभावानं राहतील याची आम्ही हमी घेतों असे ते म्हणाले. रक्तपात टळला, शांतता स्थापन झाली, अठरा तारखेस गांधींचा उपवास सुटला. आत्म्याच्या शक्तीचा नव्हे, तर दुसरा कसला विजय म्हणाल तुम्ही याला?"

गाडी हांकतां हांकतां दादांनीं 'हं' असं उत्तर केलं. तिच्याशीं या वेळीं या विषयावर मोठा वाद करण्याची त्यांची इच्छा नव्हती. त्यांना तिला एवढंच विचारावंसं वाटलं, 'हें सारं झालं, परंतु तुमचं मन गांधीं-बद्दल विचार करीत असतं आणि त्यामुळें तुमची झोप उडाली आहे हें

कसं काय तें मला अजून कळलं नाहीं.' परंतु त्यांनीं तोहि प्रश्न केला नाहीं. ते समोर रस्त्याकडे पाहून गाडी हांकत राहिले.

रस्ता अगदीं मोकळा होता. क्वचित् एखाद दुसरी बैलगाडी भेटत होती. गाडीच्या सार्‍या कांचा बंद केलेल्या होत्या, तरी बाहेरची थंडी आंत गाडींत शिरतच होती. तापलेल्या एंजिनची उष्णता दादांच्या पायांना हवीशी वाटत होती. हिंवाळ्याचे दिवस असल्यामुळें उजाडायला अजून बराच अवकाश होता. तथापि रात्रीचा गडद अंधार आतां संपला होता. क्षितिजाच्या कंगोर्‍यांतून हलकेंच वर डोकावणार्‍या मंद प्रकाशानं अंधाराला बारीकशी चीर पाडलेली दिसत होती. रस्त्याच्या कडेच्या झाडांच्या आकृतींना उगीच थोडासा काळा स्पष्टपणा येऊं लागला होता.

दादांनीं जरी मनांत आलेला प्रश्न ब्राऊनबाईला विचारला नाहीं तरी त्याचं उत्तर त्यांना मिळावं अशा प्रकारें तीच पुढें बोलत राहिली. ती म्हणाली, " पण दादा, माझी झोंप नाहींशी करणारे गांधींबद्दलचे विचार माझ्या मनांत आतांशा सारखे येतात. वाटतं, हें दुष्ट मूर्ख जग गांधींसारख्या पुरुषांसाठीं नाहीं. गांधींनीं उपास सुरू केला त्याबरोबर लोक शुद्धीवर आले, हें सारं झालं. पण हें असंच किती दिवस चालायचं ? मनुष्याच्या अंगांत दुष्टपणाचा जो सैतान आहे त्याला आत्म्याची शक्ति वरचेवर आडवी आलेली खपत नाहीं. ती शक्ति ज्या कुडींत असेल त्या कुडीचा तो सैतान विध्वंस करून टाकतो. येशू ख्रिस्ताला लोकांनीं शेवटीं क्रूसा-वर चढवलं. तसंच गांधींचं कांहीं होणार नाहीं ना अशी शंका माझ्या मनांत सारखी वावरते. मग मला झोंप येत नाहीं. दहाच दिवसांपूर्वी गांधींच्या प्रार्थनेच्या सभेंत एका तरुणानं बॉंब टाकला ही गोष्ट सारखी मनांत येते, आणि वाटतं अभद्र गोष्टीचा हा इषारा तर नसेल ? खरोखरी सरकारनं गांधींच्या प्रार्थनासभेच्या वेळेस फार कडक बंदोबस्त ठेवायला हवा."

दादा एकदम म्हणाले, " पण तुमच्या गांधींनाच असा बंदोबस्त बिलकूल पसंत नाहीं ना ?"

" आमच्या गांधींना ?" ब्राऊनबाई एकदम उद्गारली, " म्हणजे दादा, तुम्हांला गांधी तुमचे वाटत नाहींत ?"

दादा एकदम चमकले. प्रभाकरशीं वाद करतांना ' तुमचे गांधी ' असा शब्दप्रयोग कधीं केवळ प्रभाकरला गंमतीनं हिणविण्यासाठीं, कधीं गांधींच्या एखाद्या कृत्याबद्दल तीव्र नापसंती दर्शविण्यासाठीं, ते वापरीत असत. संवयीनं तो शब्दप्रयोग त्यांच्या तोंडांत बसला होता, व आतां ब्राऊनबाईशीं बोलतां बोलतां तो त्यांच्या तोंडून सहज बाहेर पडला होता... परंतु हा सारा खुलासा ब्राऊनबाईजवळ कुठं करीत बसायचा, अशा विचारानं ते हंसले व तिला म्हणाले, " वा वा ! मी गांधींना आमचे कसे समजणार नाहीं ? आमचे आहेत तर ! पण आमचे म्हटले तर तुम्हीं कदाचित् माझ्याशीं पुन्हां भांडूं लागाल, कीं गांधी काय तुम्हांला आंदण दिलेले आहेत ? ते तुमच्याप्रमाणें आमचेहि आहेत. "

ब्राऊनबाई हंसली. पण लगेच गंभीरपणानं म्हणाली, " होय होय दादा. गांधी साऱ्या जगाचे आहेत ! " तितक्यांत गाडी चढणीवरून जाऊं लागल्याचं तिच्या लक्षांत आलं, आणि ती म्हणाली, " आपण नंदगढच्या हद्दींत आलों कीं काय ? "

दादा म्हणाले, " होय ना ! ". त्यांनीं गाडीचा वेग आणखी वाढविला, आणि हॉर्न मोठमोठ्यानं वाजविला. ऐन पहांटेच्या शांततेंतून हॉर्नचा आवाज आपल्या वाड्यापर्यंत पोंचेल अशी त्यांची खात्री होती. आपण ब्राऊनबाईला घेऊन केव्हां येतों म्हणून वाट पहात बसलेल्या घरच्या मंडळींना हॉर्नचा आवाज ऐकूं जाईल आणि त्यांना धीर वाटेल अशी दादांची खात्री होती. त्यांनीं पुन्हां दोन तीनदां हॉर्न वाजविला...आतां पांच मिनिटांत गाडी वाड्याच्या दारापुढें उभी राहणार होती. ते ब्राऊनबाईला घेऊन वाड्यांत पाऊल टाकणार होते. नव्यानं बांधलेल्या पश्चिमेकडच्या छोट्या माडीवर जाणार होते...माडींत कॉटवर निजलेल्या उषाजवळ त्यांना जातां येणार नव्हतं. ते खोलीच्या बाहेरच उभे राहणार होते. पण खोलींत शिरल्यावर ब्राऊनबाई हलक्या पावलांनीं उषाजवळ कशी जाईल, व तिच्या डोक्यावरून हात कसा फिरवील तें प्रत्यक्ष न पाहतांहि त्यांना समजणार होतं. " काय उषाबाई ? मी आलें ना, आतां कांहीं चिंता करूं नका " असं एखाद्या कोंकणस्थ ब्राह्मणाला शोभेलशा रेखीवपणानं

उच्चारलेलं ब्राऊनबाईचं व्याकरणशुद्ध वाक्य ते ऐकणार होते...खोलीबाहेर वाट पहात उभे राहणार होते...

* * *

उषाच्या मुलाच्या रडण्याचा पहिला ‘ ह्यहां ’ असा आवाज कानीं पडल्याबरोबर दादांनीं मनगटावरचं घड्याळ पाहिलं. चार वाजून दहा मिनिटं झालीं होतीं. दत्तंभटजींनीं त्यांना बजावून ठेवलं होतं, कीं पत्रिका तयार करण्यासाठीं जन्मवेळ अगदीं बरोबर पाहिला हवी. दादा लगबगीनं वडिलांच्या खोलीकडे जायला निघाले, पण मुलगा कीं मुलगी म्हणून बाबांनीं विचारलं, तर सांगतां आलं पाहिजे याची त्यांना आठवण झाली व ते पुन्हां थांबले. ‘ह्यहां’ असा खणखणीत आवाज त्यांच्या कानांवर पुन्हां पडला. ‘ खास मुलगाच ! ’ ते मनाशीं म्हणाले. अंगांत आलं असतांना दुर्गाबाईनीं सांगितलं होत मुलगी होईल, त्याची त्यांना आठवण झाली. ते मनाशीं म्हणाले, छीः! दुर्गाबाई काय सांगते?...ह्यहां ऽ!...हा लख्ख मुलाचाच आवाज आहे ! शंकाच नको !... त्यांना वाटलं, खोलींत घुसावं, आणि आईला विचारावं... पण ते थांबले... ह्यहां ऽऽ!...च् ! किती वेळ थांबायचं बुवा ! आई, म्हातारी मोलकरीण, मार्था ब्राऊन, कोणी तरी येऊन सांगायचं नाहीं ?... दारावर थाप मारायसाठीं त्यांचा हात वर झाला.

तितक्यांत दाराची आंतली कडी काढल्याचा आवाज झाला. दार उघडलं गेलं. आक्कासाहेब डोकावून म्हणाल्या, “ दादा ! ”. त्यांच्या दृष्टींत आनंद मावत नव्हता. त्या कांहीं सांगणार त्याच्या आधींच दादा म्हणाले, “ मुलगा ना ? ” आक्कासाहेबांनीं मान हालवली आणि म्हटलं, “ सांग जाऊन ! ” दादा म्हणाले, “ निघालोंच होतों मी बाबांकडे ! ” ते जाऊं लागले, आक्कासाहेब म्हणाल्या, “ आणखी निशाणीला जाऊन पेढे– ” दादा म्हणाले “ तें करतों सारं ! ” ते पायऱ्या उतरूं लागले. आक्कासाहेब उंबऱ्याबाहेर पाऊल टाकून म्हणाल्या, “ आणखी— ”

“ काय ? ”

“ तारा करायला हव्यात–”

" माझ्या ध्यानांत आहे–" दादांनीं जिन्याचा पायथा गांठला होता.

बाबासाहेब प्रभाकरच्या माडींत बसले होते. दोन दोन पायऱ्या ओलांडीत दादा जिना चढून गेले. त्यांना पाहतांच बाबासाहेबांनीं अधीरपणानं विचारलं, " काय ? "

" मुलगा ! "

" दुर्गाबाईचं भविष्य खोटं ठरलं म्हणायचं ! "

" ती काय सांगते ?—आई उगीच खट्टू होऊन बसली होती ! अन् तुम्हीसुद्धां ! थोडेसे !—"

" अरे, मुलगी झाली असती तरी आनंदच झाला असता ! " बाबासाहेब म्हणाले. " पण हें विशेष नामी झालं. ईश्वराची कृपा ! "

हे शब्द बाबासाहेबांच्या तोंडून पुरते बाहेर पडले नाहींत तोंच खळकन् आवाज झाला ! त्यांनीं व दादानीं चमकून पाहिलं. प्रभाकरच्या लिहिण्याच्या टेबलासमोर भिंतीवर लावलेला गांधींचा फोटो खालीं पडून फुटला होता ! दोघेहि क्षणभर त्याकडे पहात गप्प उभे राहिले. मग जणूं त्याबद्दल कांहीं न बोलण्याचा दोघांनींहि निश्चय केला. दादांनीं वाकून दुभंगलेल्या कांचेचे तुकडे उचलून टेबलावर ठेवले. बाबासाहेबांनीं फोटो उचलून घेतला व आपल्या अंगावरच्या करवतीकांठी उपरण्यानं तो पुसला. ते दादांना म्हणाले,

" तुला निशाणीला जायला हवं ना ? "

" हो, निघालोंच. ब्राऊनबाईला आधीं पोचवतों अन् मग निशाणीला जाऊन तारा करीन, पेढे घेईन. तिचं आटपेपर्यंत थांबायला हवं. "

पुसलेला फोटो टेबलावर मांडून त्याकडे पहात बाबासाहेब म्हणाले, " आज प्रभाकर इथें असायला हवा होता. त्याला तार करशील त्यांत लिही ताबडतोब ये म्हणून. "

" लिहितों ना—"

" अन् भाऊंना तार करशील त्यांत लिही, बारशाला तुम्हीं सगळ्यांनीं यायला हवं. पेढे किती आणशील ?—"

" आणतों—"

" सगळ्या गांवांत वाटायला हवेत—"

" निशाणींतल्या आपल्या साऱ्या मंडळींना द्यायला हवेत आर्धी—"

" हो हो!" दादा जिन्याकडे वळले तेव्हां बाबासाहेब म्हणाले, " अन् हा फोटो घेऊन जा. फ्रेम करून आणलेला बरा लगोलग—" त्यांनीं फोटो पुढें केला.

तो घेऊन दादा जिना उतरले.

उषाच्या माडीचा जिना चढून ते दाराशीं पोंचले, तों मार्था ब्राऊन दारांतच उभी होती. त्यांना पाहतांच ती म्हणाली, " दादा, तुम्हांला फार सुंदर पुतण्या झाला आहे. मला तुमचें अभिनंदन करू द्या."

तिच्या वाक्यरचनेची नक्कल करून दादा म्हणाले, " आणि ब्राऊनबाई, मला तुमचे आभार मानूं द्या. आतां मी उषाबाईला एक मिनिट भेटूं शकतों काय?"

" हुं हुं!" असं म्हणत ब्राऊननं मान हालविली, " मात्र दादा, वेळ लावू नका. घरीं परत जाण्यासाठीं मला आतां फार घाई वाटते. तुम्ही पोंचविणार ना मला?"

" वा! हें काय विचारणं!" असं हंसून म्हणत दादा खोलींत शिरले.

आक्कासाहेब दूर झाल्या. मोलकरीण दूरच उभी होती, पण दादांना पाहून ती आणखीच मागं सरकली. दादा पलंगाजवळ गेले. उषानं त्यांच्याकडे पाहिलं. क्षणमात्र तिच्या सुंदर चर्येवर लज्जेचा तरग उठला. पण तो लगेच नाहींसा झाला, आणि ती हळूच हंसली. दादाही कांहीं न बोलतां फक्त हंसले आणि तिच्याकडे व तिच्याजवळच्या बाळाकडे पहात राहिले. उषावर त्यानीं नेहमींच फार ममता केली होती. ती त्यांची लाडकी होती. पण या क्षणीं तिच्या मातृत्वाच्या नवीन सात्त्विक वैभवाकडे पाहून त्यांचं प्रेम अगदीं उचंबळून आलं, आणि जिभेनं उच्चारलेल्या शब्दांनीं प्रगट होण्याऐवजीं त्या प्रेमाच्या धारा त्यांच्या दृष्टिवाटेच सरळ ओघळल्या आणि उषाच्या अंगभर सांडल्या. त्या धारांचा ऊष्ण स्पर्श स्पष्ट कळल्या-प्रमाणें उषा हंसली. तिलाहि शब्द नकोसे वाटले. पातळ गुलाबी मऊ

रगाखालचा हात तिनं बाहेर काढला व दादांपुढें धरला. त्यांनीं तो आपल्या हातांत अलगद धरला. क्षणभर तो तसाच हातांत ठेवून ते स्तब्ध राहिले. आणि मग जणूं एक पवित्र विधि पूर्ण केल्याप्रमाणें त्यांनीं तो कोमल करपल्लव रगाखालीं झांकला, व ते तिला हलकेच म्हणाले,

"प्रभाकरला तार करतों. परवांच्या दिवशीं तो येईल."

उषानं मान हालविली व ती हंसली.

दादांनीं पुन्हां एकदां तिचा हात थोपटला, तिच्या बालकाकडे निरखून पाहिलं, आणि उषाच्या कानाजवळ तोंड नेऊन ते हळूच म्हणाले, "तुझा गर्व नाहींसा झाला ना?"

'म्हणजे काय?' अशा अर्थानं उषानं भुंवया उचलल्या.

दादा हंसले व म्हणाले, "माझा पुतण्या तुझ्यापेक्षां सुंदर आहे! बघ!"

"असं होय?" उषाला हंसूं आलं.

दादांनीं तिचा हात पुन्हां थोपटला, आणि ते दूर झाले.

मार्था ब्राऊन हें सारं पहात दारांत उभीच होती. दादा जवळ आले तेव्हां तिला जांभई आली म्हणून तिनं डाव्या पंजानं तोंड झांकलं. दादा तिला म्हणाले, "चला, तुम्ही फार दमलां आहांत!"

मोटर चालू झाल्यावर दादांनीं मागच्या सीटवर गांधींचा फोटो ठेवला होता, तो उचलून पाहून ती म्हणाली, "हें काय? हा फोटो कशाला घेतला आहे तुम्ही बरोबर?"

"फ्रेम करून आणायचा आहे." असं म्हणून तो एकाएकीं भिंतीवरून पडून त्याची कांच कशी फुटली होती, त्याची हकीगत दादांनीं तिला सांगितली.

ती ऐकून मार्था ब्राऊन म्हणाली, "काय, सांगतां काय तुम्ही दादा?"

दादा म्हणाले, "होय. खरंच! तसबीर एकदम खालीं पडली अन् खळकन् फुटली!"

"फार वाईट गोष्ट झाली!" ती एकदम इंग्रजींत म्हणाली.

"त्यांत काय मोठंसं? दुसरी फ्रेम घालतां येईल!"

" पण हा शकुन चांगला नाहीं ! "

" शकुन ? " दादा म्हणाले. तुम्ही अमेरिकन लोक येवढे सुधारलेले, आणि तुम्ही शकुन मानतां ?–आश्चर्य आहे !–इतका अर्थ त्यांच्या त्या एका शब्दांत भरलेला होता.

जणुं तो कळल्याप्रमाणें मार्था ब्राऊन म्हणाली, " होय, तसबीर फुटणं हा फार वाईट शकुन समजतों आम्ही ! " ती कांहीं वेळ गप्प बसली. नंतर तिनं विचारलं, " दादा, तुम्ही लॉर्ड किच्नेरचं चरित्र वाचलं आहे का ? "

" नाहीं. कां ? "

" त्याची तसबीर अशीच निखळून पडून फुटली होती, आणि त्याच वेळीं त्याला मृत्यु आला असं पुढें उघडकीला आलं ! "

दादा हंसले व म्हणाले, " ब्राऊनबाई, तुम्ही फार दमलां आहांत, दुसरं कांहीं नाहीं ! "

यावर मार्था ब्राऊन कांहीं बोलली नाहीं. सबंध वाटभर मग ती गप्पच राहिली, पण निशाणीच्या हम रस्त्यांत गाडी शिरली तेव्हां ती म्हणाली, " दादा, मला माझ्या बंगल्यावर पोचवूं नका. "

" मग ? " दादांनीं आश्चर्यानं विचारलं.

" अलीकडच्या कोपऱ्यावरच्या चर्चमध्यें सोडा मला. "

" होय ? "

" हं. गांधीजींसाठीं प्रार्थना करणार आहे मी ! "

" बरं ! " दादांनीं आपलं आश्चर्य बोलून दाखविलं नाहीं.

गाडी थांबल्याबरोबर मार्था ब्राऊननं खाली उडी टाकली, व चर्चकडे धांवत जाऊन दारांतून आंत शिरून ती दिसेनाशी झाली.

दादा चकित होऊन क्षणभर चर्चच्या दाराकडे पहात राहिले. मग त्यांनीं गाडी चालू केली.

आधीं निशाणीच्या पोस्ट ऑफिसांत जाऊन त्यांनीं तारा केल्या. मग ते बाजारांत गेले. हलवायांच्या साऱ्या दुकानांत मिळाले तेवढे सारे पेढे त्यांनीं

खरेदी केले. मग निशाणींतल्या सगळ्या ऋणानुबंधी लोकांच्या घरीं जाऊन त्यांनीं उषाला मुलगा झाल्याची बातमी सांगितली, आणि पेढे वाटले. सिद्रामप्पासारखे जे लोक त्यांना स्वतःला मतलबी, लुच्चे, बेभरंवशाचे आणि घातकी वाटत होते, पण ज्यांच्याशीं मित्रत्वाचे जुने संबंध प्रभाकरनं अजून ठेवले होते, त्यांच्या घरींदेखील जाऊन त्यांनीं बातमी सांगितली व मिठाई दिली. प्रभाकर आज असता तर त्यानं जें केलं असतं तें आपल्याला करायला हवं आणि त्याकरतां आपलीं स्वतःचीं मतं व स्वभाव बाजूला ठेवला पाहिजे, हें त्यांना समजत होतं. बंडू धुमाळ त्यांना रस्त्यांत भेटला, तेव्हां प्रभाकरनं त्यालासुद्धां पेढे दिले असते हें लक्षांत घेऊन त्यांनीं गाडी थांबवली. " अरे बंडबा, इकडे ये ! " असे त्यांचे शब्द ऐकून धुमाळ चकितच झाला. दादा आपल्याला बोलावतात, हें त्याला खरंच वाटेना. तो जागच्या जागींच घोटाळून उभा राहिला. तें पाहून दादा हंसून ओरडले, " अरे ये ना ! " तो जवळ आल्यावर ते म्हणाले, " हे घे ! "

पेढ्यांच्या पुड्याकडे पहात धुमाळ म्हणाला, " कशाबद्दल दादा ? "

" प्रभाकरला मुलगा झाला ! "

" होय ? फार आनंदाची गोष्ट घडली ! "

त्याच्या चेहऱ्यावर हास्य होतं, पण पोटांत आनंद मुळींच नव्हता हें दादांना ओळखतां येत होतं. ' अरे, कावळ्याच्या शापानं गुरं मरत नाहींत ! ' असं म्हणावंसं त्यांना फार वाटलं. पण ते शब्द त्यांनीं गिळून टाकले. आज आपल्या स्वभावावर त्यांना विजय मिळवायचा होता.

" बरं दादा, चलतों. " म्हणून बंडू धुमाळ चालूं लागला.

दादांनीं मोटार सुरूं केली.

निशाणीच्या हद्दीपलीकडे दादांची गाडी पुरती गेली असेल नसेल, तोंच रेडिओवर बातमी आली—

महात्मा गांधींचा खून झाला !

संध्याकाळच्या प्रार्थनेच्या सभेंत कुणा एका तरुणानं पुढें होऊन त्यांच्यावर गोळ्या झाडल्या होत्या !

गांधीजी जमिनीवर पडले होते !

ती भयंकर बातमी वाऱ्यासारखी वेगानं पसरली. दुकानं बंद झालीं. लोक वेड्यासारखे ठिकठिकाणीं जमून हलक्या आवाजांत चर्चा करीत उभे राहिले. सारे व्यवहार थंड झाले. रहदारी आटली. साऱ्या गांवावर अभद्र कळा पसरली...घटकाभरानं गांधी चौकांतल्या जाहीर शोकसभेसाठीं माणसांचे थवे माना खालीं घालून स्तब्धपणानं आणि जड पावलांनीं गोळा होऊं लागले...



# प्रकरण बारावं

" बरं बुवा, राहिलं. तुम्हांला काय करायचंसं वाटेल तें करा ! " असं आक्कासाहेबांना उद्देशून चरफडल्यासारखं बडबडत स्वैपाकघर आणि माजघर ओलांडणारे दादा ओटीलगतच्या जिन्याच्या पायथ्याशीं आले, तेव्हां वरून त्यांच्या वडिलांनीं विचारलं,

" अरे काय दादा ? कसला वाद घालतो आहेस ? "

ओटीवर टाकायसाठीं उचललेलं पाऊल मागं घेत वर बघितल्यासारखं करून दादा म्हणाले, " वाद कुठें घालतो आहे ! मला वाटलं तें सांगितलं. ऐकायचं नसलं तर नका ऐकूं म्हटलं. "

वर उभे राहिलेले बाबासाहेब म्हणाले, " हो, पण तें म्हणतांना तूं रागावला आहेस असं स्पष्ट दिसतंच कीं. "

" नाहीं बुवा. मी कशाला रागावूं ? "

बाबासाहेब म्हणाले, " अरे, तुझं म्हणणं मलाहि पटतं. आज घरांत गोडधोड न झालेलं बरं असं मलाहि वाटतं. पण तुझ्या आईला तें पटत नाहीं हेंदेखील बरोबरच आहे. तिच्या सुनेला मुलगा झालाय तेव्हां तिला वाटतंय गांधींच्या मृत्यूनं सुतक आल्यासारखं झालं असलं तरी अगदीं भाजी भाकरीच घरांत कशी होऊं द्यायची ? बायकांचे विचार आहेत हे, आपण त्यांच्या नादीं लागूं नये हेंच चांगलं. घालीना का ती पुरण ? साऱ्या गांवाला कांहीं ती बोलावत नाहीं ना जेवायला ! दत्तंभटांची आणि आपल्या घरची मंडळी एवढीच आहेत जेवायला. करूं दे तिला आपल्या मनाची हौस. उगीच वाद हवाय कशाला ? "

" वाद संपविला कीं ! मी आपला जाऊन बसतों आपल्या जागीं. " असं म्हणून दादा ओटीवर आले आणि आपल्या नेहमींच्या जागीं जाऊन तक्क्याला टेकून गादीवर बसले.

रोजच्याप्रमाणें आज त्यांच्याभोंवतीं औषध मागायला आलेल्या लोकांची गर्दी नव्हती. सोपा अगदीं रिकामा होता. सबंध वाड्यावरच शून्यपणाचं एक चमत्कारिक वातावरण पसरलं होतं. वाड्यावरच नव्हे, सबंध गांवावर. गांवकऱ्यांचे नेहमींचे सारे व्यवहार गोठून गेले होते. गांधींच्या मृत्यूची बातमी शुक्रवारीं रात्रीं नऊ दहा वाजतां नंदगढावर येऊन पोंचली होती. निशाणीला कामासाठीं गेलेल्या लोकांनीं ती तिकडे ऐकली होती. आणि मग धांवत नंदगढला येऊन त्यांनीं ती लोकांना सांगितली होती. ती ऐकल्यापासून नंदगढसारख्या लहानशा गांवालाहि दुःखाचा जबरदस्त धक्का बसल्यासारखं झालं होतं. सारीं माणसं आश्चर्यानं आणि दुःखानं सुंद झालीं होतीं. ‘गांधी मारले गेले ! हें काय भयंकर झालं !’—या एकाच उद्गारापलीकडे दुसरं कांहीं बोलणं कुणाला सुचलं नव्हतं. नित्याच्या व्यवहाराकडे कुणाचं लक्ष लागेनासं झालं होतं.

आकाशांतल्या सूर्य चंद्रांचीं भ्रमणं कांहीं थांबलीं नव्हतीं. शुक्रवारची ती भयंकर रात्र उलटली, शनिवारचा दिवस उजाडला, मंदगतीनं सरपटत सरला. रात्र आली, तीदेखील हळूहळू सरली. रविवारचाहि दिवस उजाडला आणि संपला, आणि आतां सोमवार उजाडून सकाळचे प्रहर टळून गेले होते. मध्यान्हाची घटका झाली होती. तरीदेखील गांधींच्या मृत्यूच्या अमंगल वार्तेनं जिकडे तिकडे पसरलेलं शोकाचं वातावरण गडद होतं तसंच होतं.

नंदगढच्या लोकांचे नेहमींचे सारे व्यवहार बंद पडले होते. गांवावर शून्यतेची उदास अवकळा आली होती. ती अवकळा इनामदारांच्या मोठ्या वाड्यांतहि दिसत होती. दादांकडे औषधासाठीं येणाऱ्या माणसांनीं जो सोपा रोज या घटकेला गजबजून गेलेला असायचा त्या सोप्यांत आज एकदेखील मनुष्य आलेलं नव्हतं. दादा एकटेच लोडाला टेकून बसले होते.

...त्यांच्या मनांत आलं, देवरं, थिवरं, डोरलं, सुपलं, धामणी, कापणी अशा बाजूबाजूच्या साऱ्या छोट्या छोट्या गांवांत गांधींच्या हत्येची बातमी जाऊन पोंचली असेल. त्या गांवांहून आज कोणी देखील नंदगढाकडे येणार नाहीं. मोठमोठ्या शहरीं तर लोकांच्या दुःखाचं केवढं प्रदर्शन चालू

असेल! प्रत्यक्ष दिल्ली शहरांत तर शोकाचा हाहाःकार उडाला असेल... हिंदुस्थानांतच नव्हे तर साऱ्या जगांत 'गांधी गेले! गांधी गेले!' असा दुःखाचा टाहो हजारों लोकांच्या अंतःकरणांत फुटत असेल. ज्या पुरुषाच्या निर्वाणामुळें सबंध जगाच्या अंतःकरणांत अशी कालवाकालव झाली तो महापुरुष नव्हे तर काय?...गांधींचं तत्त्वज्ञान दादांना कधींच पटलं नव्हतं. त्यांच्या राजकारणाविषयीं तर त्यांना आदर फार क्वचित् वाटला होता. पण गांधी म्हणजे एक अलौकिक पुरुष होते असं त्यांना मनांतल्या मनांत नेहमीं वाटलं होतं; आणि हा आपला विचार त्यांनीं लोकांजवळ जरी क्वचितच बोलून दाखविला असेल तरी गांधींचा मृत्यु झाल्याबरोबर जिकडे तिकडे शोकावेगाचा जो अंधार पसरलेला त्यांना दिसला तो पाहिल्यावर त्यांच्या मनांतला तो विचार एकदम प्रबळ झाला...

मात्र आज घरांत पुरण वगैरे घालूं नका म्हणून त्यांनीं आपल्या आईशीं जी हुज्जत घातली होती, तिच्यामागं केवळ गांधींचं सुतक चालू असतांना घरांत पक्वान्न होणं बर नव्हे एवढाच विचार नव्हता. त्यांच्या कानांवर फार चमत्कारिक गोष्टी आल्या होत्या. आणि त्यामुळें त्यांना वाटत होतं, आज आपल्या घरीं पुरणपोळी झाली ही गोष्ट जर गांवकऱ्यांना कळली तर तिचा भलता विपर्यास झाल्यावांचून राहणार नाहीं... शुक्रवारीं संध्याकाळीं त्यांनीं मार्था ब्राऊनला चर्चपुढें सोडल्यानंतर निशाणीला जाऊन पेढे घेतले होते आणि वाटले होते. या गोष्टीचा कोणता भयंकर अर्थ बंडबा धुमाळसारख्या लोकांनीं मुद्दाम पसरविला होता तें त्यांना कळलं होतं. वास्तविक ज्या वेळीं त्यांनीं निशाणींतल्या लोकांना पेढे वाटले त्या वेळेस गांधींचा वध झाल्याची वार्ता कुणाला कळलेली नव्हती. त्यांनीं पेढे वाटले आणि नंतर लौकरच लोकांनीं ती बातमी रेडिओवर ऐकली. पण अर्धा पाव घटकेच्या अंतरानं झालेल्या त्या दोन गोष्टींची उलटापालट करून सांगणं सोपं होतं. आणि बंडबा धुमाळसारख्या लोकांनीं बरोबर तीच गोष्ट केली होती. ज्या धुमाळानं दादांच्या हातून पेढे घेतांना 'प्रभाकरला मुलगा झाला, फार नामी गोष्ट झाली' असे उद्‌गार काढले होते, तोच धुमाळ निशाणीच्या लोकांना सांगत सुटला होता, "गांधी मेले म्हणून इनामदारांचा दादा पेढे वाटीत सुटला

आहे ! ” लोकांना तें खरं वाटावं अशा प्रकारें गोष्टी घडल्या होत्या खऱ्या...मागें एकदां दादांनीं आपल्या मळ्यांतली जागा रा. स्व. संघाच्या छावणीसाठीं दिली होती. त्याबद्दल त्यांचा मळा जाळण्यांतहि आला होता. दादा फटकळपणानं गांधींविषयीं आणि काँग्रेसविषयीं अनेक वेळां अनेकांजवळ बोलले होते. या साऱ्या गोष्टींचा मेळ घालून इनामदारांच्या शत्रूंना सहज असं भासवितां आलं कीं ब्राह्मण जातीचे हे इनामदार गांधींच्या वाईटावरच होते. गैरसमजाचं वारं एकदां डोक्यांत शिरल्यावर इनामदारांच्या घरांतला प्रभाकर काँग्रेसचा कार्यकर्ता होता ही गोष्ट क्षुल्लक वाटण्यासारखी होती. उच्चवर्णीय लोकांविरुद्ध जनतेला चिथावण्याचंच राजकारण मुद्दाम खेळणारे निशाणींतले जे लोक होते त्यांना दादांनीं शुक्रवारीं रात्रीं पेढे वाटले या गोष्टीचं मोठंच भांडवल मिळाल्यासारखं झालं.

आपल्याविरुद्ध पद्धतशीरपणें गैरसमज माजविण्यांत येत आहे हें कळल्यापासून दादा मनांतल्या मनांत अगदीं अस्वस्थ झाले होते, आणि म्हणून आपल्या आईला ते सकाळपासून सारखं सांगत होते कीं नैवेद्यासाठींसुद्धां घरांत गोडधोड करण्याचा विचार सोडून द्या. पण आक्कासाहेबांनीं त्यांचं ऐकलं नव्हतं. त्या पुनःपुन्हां म्हणाल्या होत्या, “ सोन्यासारखा नातू माझ्या घरांत जन्मलेला आणि देवाला नैवेद्यसुद्धां करूं नको ? मी गांवजेवण का घालतें ? दत्तंभट येतील, त्यांचीं बायकामुलं येतील एवढंच– ” अखेर आई कांहीं आपलं ऐकायची नाहीं असं ठरवून दादा दूर झाले होते. आणि ‘ बरं बुवा, राहिलं. तुम्हांला काय करावंसं वाटेल तें करा ! ’ असा उद्गार काढून सोप्यांत येऊन बसले होते...सोप्यांत दुसरं कोणी नव्हतं. सबंध वाड्यांत शून्य, उदास वातावरण पसरल्याचा भास होत होता. प्रभाकर वास्तविक तार मिळाल्यावर यायचा, पण तो कां कोण जाणे आला नव्हता...

दादांचं मन विषण्णतेनं भरून गेलं होतं. समोरच्या मोठ्या दरवाजाकडे उगीचच पाहात ते किती वेळ तरी बसून राहिले.

त्यांना कुणी तरी विचारलं, “ आंघोळीला उठतां कीं नाहीं ? ”

ते म्हणाले, “ आंघोळीला ? जरा वेळानं उठतों. ”

पण किती तरी वेळ होऊन गेला तरी ते उठले नाहींत. त्यांना उठावंस वाटतच नव्हतं. ते शून्य दृष्टीनं दरवाजाकडे बघत राहिले.

तितक्यांत दत्तू परीट " दादा! अहो दादा!" अशा हांका मारीत दरवाजांतून आंत आला.

त्याच्या त्या हांकांचा आवाज असा कांहीं चमत्कारिक होता, कीं त्या ऐकल्याबरोबर दादांच्या छातींत धस्सच झालं. ते एकदम सांवरून बसले आणि आंगणांतून धांवत येऊन ओटीच्या पायऱ्या चढणाऱ्या दत्तू परटाला म्हणाले, " कायरे, काय झालं?"

दत्तू म्हणाला, " दादा, फार वाईट बातमी आहे."

" म्हणजे? काय आहे बोल."

तो म्हणाला, "सकाळीं माझ्या कामासाठीं मी गेलों होतों निशाणीला."

" बरं मग?"

" संस्थानांत काल सबंध दिवसभर जाळपोळीचा आणि लुटालुटीचा कहर झाला म्हणतात. सकाळीं मोटारींतनं निशाणीला आलेले लोक सांगत होते. एका ब्राह्मणानं गांधींना मारलं, त्याचा सूड घेण्यासाठीं संस्थानांत घरांची जाळपोळ आणखी लुटालूट काल सकाळीं जी सुरू झाली ती दिवसभर चालली होती. अखेर गोळीबार झाला तेव्हां ती थांबली म्हणतात."

दादा म्हणाले, " काय, सांगतोस काय?"

दत्तू म्हणाला, " फार भयंकर गोष्टी ऐकल्या निशाणीला. आणखी हें जाळपोळीचं वेड आतां आजूबाजूला पसरणार आहे. आपला बंड्या धुमाळ—"

दादांनीं एकदम विचारलं, " त्याचं काय सांगतोस?"

" तुमच्या वाड्यावर जाळपोळीची धाड आणायचे बेत चाललेत त्याचे निशाणींत. संस्थानांतून कांहीं माणसं आलीं आहेत. त्यांची मदत घेऊन तो दोन लॉऱ्या भरून माणसं घेऊन येणार आहे. पेट्रोलचे आणि घासलेटचे डबे पण भरपूर आहेत त्यांच्याजवळ. इथें आल्यावर साऱ्या गांवकऱ्यांना तो सांगणार आहे, बामणांचीं घरं आपण जाळलीं पाहिजेत. आणखी पहिला मोर्चा तुमच्या वाड्यावर यायचा आहे. हे त्यांचे बेत मला कळल्याबरोबर मी धांवत आलों बघा. म्हटलं, तुम्हांला आधीं वर्दी दिलेली असावी."

तें ऐकतांच दादा क्षणभर अगदीं स्तिमित होऊन स्वस्थ बसले. कांहीं वेळानं ते दत्तू परटाला म्हणाले, " तूं जा आपल्या घरीं. मला वर्दी दिलीस हें फार बरं केलंस. पण गांवांत उगीच बोलत सुटूं नकोस." आणि दत्तू गेल्यावर त्यांनीं विचार केला, आपणसुद्धां दत्तूनं सांगितलेल्या बातमीची घरांत वाच्यता करण्यांत अर्थ नाहीं. सारींजणं उगाच घाबरतील. माडीवर आपल्या नव्या बालकाला कुशींत घेऊन निजलेली उषा भयभीत होईल. घरांत आत्तांच हाहाःकार उडेल...जें व्हायचं असेल आणि टळणार नसेल तें होईल. प्रतिकार तरी आपण काय करूं शकणार ?...त्यांना प्रभाकरची फार आठवण झाली...तो या वेळेस घरीं असायला हवा होता. त्याच्या पुण्याईनं संकट टळलं असतं असं नव्हे. ज्यांना जाळपोळ करायची होती त्यांचे गुप्त हेतू फार निराळे होते. गांधींच्या वधाचं केवळ एक उत्तम निमित्त त्यांना सांपडलं होतं. प्रभाकर असता तरी ही द्वेषाची लाट त्याला थोपवितां आली नसती. पण तो असता तर फार बरं झालं असतं. आतां संकट खरोखरच येणार असेल तर तें येईल तेव्हां त्या संकटाला एकट्यानं तोंड देणं त्यांना भाग होतं.

मनाशीं असे विचार करीत दादा स्वस्थ बसले. पुन्हां कुणीं तरी त्यांना विचारलं, " आंघोळीला उठतां ना ?" तेव्हां 'आलोंच' असं उत्तर देऊन ते उठले, आणि सदऱ्याच्या गुंड्या काढीत न्हाणी-घराकडे गेले...

माजघरांत पंगत मांडली होती. दादा देवावर अक्षता फुलं वाहण्यासाठीं देवघरांत बसले होते. आक्कासाहेब कुणाला तरी सांगत होत्या, " एवढं सूनबाईचं पान मी तिच्या खोलींत देऊन येतें ग. तंवर बाकीचीं पानं वाढा..." पण दादांचं लक्ष नीटसं कशाकडेच नव्हतं. बाबासाहेब सोवळं नेसून पंगतींतल्या आपल्या पानावर येऊन बसले...दत्तंभटांचा वैश्वदेव आटपला, आणि ते काकबलि टाकण्यासाठीं मागच्या परसाकडे गेले... तितक्यांत " दादा ! अहो दादा " अशी खूप मोठ्या आवाजांतली हांक दादांना ऐकूं आली. दत्तू परटाचा आवाज त्यांनीं ओळखला. कमरेला सोवळ्याचा मुकटा आणि सारं अंग उघडं अशा थाटानंच ते देवघरांतून धांवले. ओटीवर जातांच त्यांनीं दत्तू परटाला विचारलं, " काय रे ?"

दत्तू म्हणाला, "दादा, विष्णूच्या देवळासमोर बंड्याच्या लॉऱ्या येऊन थडकल्या आहेत. त्यानं आपल्याबरोबर तर लोक आणलेच्च आहेत, पण डबे वाजवून गांवकऱ्यांना जमा करून तो सांगतो आहे, 'गांधींचा खून बामणानं केला. या तुमच्या गांवांत बामणाची हरामखोर जात आतां उरतां कामा नये.' दादा, आतां कसं करतां?"

दादांनीं कांहीं उत्तर दिलं नाहीं. फक्त मुकटा नेसलेल्या अवस्थेंतच ते जागच्या जागीं उभे राहिले...आंतून बाबासाहेबांनीं हांक मारली, "अरे दादा, येतोस ना?"

दादांनीं उत्तर दिलं नाहीं.

दत्तंभट दाराशीं आले व म्हणाले, "दादा, चला ना."

ते म्हणाले, "तुम्ही बसून घ्या. मी जरा वेळानं येतों."

दत्तंभटांनीं आंत जाऊन त्यांचा निरोप सांगितल्यावर बाबासाहेब म्हणाले, "म्हणजे काय?"

दादांनीं बाहेरूनच ओरडून सांगितलं, "बाबा, माझं थोडंसं काम आहे बाहेर. तें आटपल्यावर मी येतों. तुम्हीं बसून घ्या."

ते तसेच मुकट्यानिशींच उषाच्या माडीकडे धांवले. उषा अंथरुणावर बसल्या बसल्या जेवत होती. आक्कासाहेब शेजारीं बसल्या होत्या. उषाचा मुलगा पाळण्यांत शांतपणें निजला होता. त्यांना पाहून आक्कासाहेब म्हणाल्या, "हें रे काय? तुम्ही सारीं जेवायला ना बसत होतां?"

दादा उत्तरादाखल कांहीं तरी पुटपुटले. क्षणभर घोटाळून त्यांनीं उषाकडे नजर टाकली, मग ते कांहीं न बोलतां जिना उतरून खालीं गेले, आणि ओटीवरच उभे राहिले. जें संकट येणार होतं त्याचं स्वरूप कितीसं अक्राळ विक्राळ असेल त्याचा त्यांना अदमास करतां येईना. त्या संकटाचा प्रतिकार करणं शक्य आणि शहाणपणाचं होईल कीं नाहीं याबद्दलचाहि निश्चय त्यांना मनाशीं करतां येईना. ते उभे राहिले...संकटाची वाट पहात उभे राहिले!

'गांधी महाराज की जय!' असा ओरडा ऐकूं आला.

त्यांच्याकडे वेगानं येणाऱ्या संकटाची ती ललकारी होती! दादांच्या मनांत आलं, वा! गांधींच्या नांवाची याहून अधिक भयंकर विटंबना

कोणती असूं शकेल ?...पुन्हां जयघोष ऐकूं आला...अधिक जवळून, मग त्याहूनहि अधिक जवळून, आणि मग जवळ येत येत तो दरवाजापुढें झाला ! बंडू धुमाळ हातांतला सोटा परजीत आंत घुसला. त्याच्या मागोमाग लोकहि शिरले. दहा...वीस...तीस...साठ सत्तर लोकांनीं आंगण भरून गेलं. त्यांनीं पुन्हां गजर केला, " गांधी महाराज की जय ! "

तितक्यांत चिंतू गुरवाची बायको रखमा नैवेद्याचं वाढणं घेऊन बाहेर आली, ती ओटीच्या पायऱ्यांवर थबकली. तिच्या हातांतल्या ताटांत पुरणपोळया होत्या.

बंडबा धुमाळ लोकांकडे बघून म्हणाला, " पाहिलंत मंडळी ! या बामणांच्या घरांत पुरणाच्या पोळयांच्या मेजवान्या चालल्या आहेत ! " तो रखमाच्या अंगावर धांवला व ओरडला, " टाक तें ताट खालीं ! लाज नाहीं वाटत तुला बामणाच्या घरची पुरणपोळी न्यायला ? तुमचा बाप तिकडे एका बामणानं गोळी घालून मारला, अन् तुम्ही– "

पुढें बोलण्याऐवजीं त्यानं हातांतली काठी ताटावर ताडकन् मारली. ताट वाट्या पायऱ्यांवर पडून खणखण वाजल्या आणि घरंगळून उपड्या झाल्या. अन्न जिकडे तिकडे उडालं ! रखमानं किंकाळी फोडली, आणि ती आंत धांवली.

त्याच क्षणीं बाबासाहेब आणि दत्तंभट हात धुऊन सोवळ्यानिशीं बाहेर आले. बाबासाहेबांनीं ओरडून विचारलं, " अरे, काय गडबड आहे रे ? "

बाहेरचा गलबला आणि धुमाळचा आवाज ऐकून बाबासाहेब पानावरून उठून हात धुऊन लगबगीनं बाहेर आले होते. साठ सत्तर माणसांचा जमाव आंगणांत जमलेला असेल अशी त्यांची कल्पना नव्हती. त्यामुळें आंगणांतली ती गर्दी पाहिल्याबरोबर तें मनांतल्या मनांत धसकले, आणि 'अरे, काय गडबड आहे रे ?' या त्यांच्या वाक्याची सुरवात दरडावणीच्या उंच स्वरांत झाली होती खरी, पण त्या वाक्यांतले अखेरचे शब्द कांहींशा खालच्या स्वरांत उच्चारले गेले...

धुमाळनं त्यांच्याकडे दुर्लक्षच केलं. रखमाच्या ताटावर मारलेली हातांतली काठी हवेंत उंच फिरविल्यासारखी करून तो दादांना म्हणाला

" वा इनामदार ! चांगलं चालवलंय तुम्हीं ! गांधी मेले म्हणून शुक्रवारीं रात्रीं पेढे वाटलेत, आणि आतां घरीं रोज पक्वान्नं करून खात आहांत होय ? या देशद्रोहाचा जाब तुम्हांला विचारायलाच आम्ही आलों आहोंत."

शेवटचे शब्द बोलतां बोलतां त्यानं आंगणांत उभ्या राहिलेल्या लोकांकडे पाहिलं, आणि त्याच्या नजरेंतला इशारा ओळखतांच कावळ्यांच्या मोठ्या थव्यांनीं कावकाव करावी त्याप्रमाणें त्या लोकांनीं शिव्यांचा उच्चार केला...

दादांनीं दोन्ही हात हवेंत उंच करून म्हटलं, " मंडळी हो, तुम्ही जरा शांत होऊन माझं बोलणं ऐकाल काय ? गांधी मेले म्हणून मीं पेढे वाटले किंवा म्हणून आमच्या घरांत आज पुरणपोळी झाली हा तुमचा समज चुकीचा आहे. आमच्या प्रभाकराला मुलगा झाला."

धुमाळ एकदम ओरडला, " अरे मुलगा झाला तर काय मुलखावेगळी गोष्ट झाली कीं काय ? मुलगा झाल्याबद्दल पेढे वाटणं, पुरण खाणं एरवीं ठीक झालं असतं. पण गांधी मेलेले असतांना तुम्ही बामण लोक खुशाल पक्वान्नांवर हात मारतां होय ? त्यापेक्षां शेण कां खात नाहीं तुम्ही ? प्रभाकराला मुलगा झाला म्हणे ! अरे, दुनियेंत काय कुणाला मुलगा होत नाहीं ? आम्हां लोकांना फसवू नकोस. आतां आम्ही फसणारहि नाहीं. तुम्हां बामणांचं उलटं काळीज आम्हीं ओळखलंय आतां. गांधींना मारणारा गोडसे ज्या जातींत निपजला ती बामण जातच नाहींशी करायला हवी. पिढ्यान् पिढ्या आमची तुम्हीं पिळणूक केलीत, आणखी गबर होऊन श्रीमंतींत लोळलांत. आमच्यावर अधिकार गाजविलात. आमच्या बायकांना खरकटीं भांडीं घासायला लावलींत. पण आतां काळ उलटला आहे बघा दादा ! आतां तुमच्या बायका आमच्या घरीं खरकटीं भांडीं घासतील असं करायचं आहे आम्हांला. तुम्ही सारे बामण पहिल्यापासून गांधींच्या विरुद्ध होतां. एका बामणाच्या कम–अस्सल कार्ट्यानं गांधींना गोळी घातली म्हणून तुम्हां बामणांना आनंद झाला आहे. तुम्ही पेढे वाटीत सुटलां आहांत. पुरणाच्या पोळ्या खात आहांत–"

दादा म्हणाले, " हें बघ धुमाळ, तुला खरी गोष्ट लक्षांत घ्यायचीच नसेल तर सोडून दे. अरे, गांधी मेले म्हणून आनंद होण्याइतके

आम्ही नतद्रष्ट आहोंत काय ? भलतं भलतं काय बोलतोस ? गांधी मेले म्हणून पेढे वाटीन मी ! तोंडाला येईल तें बोलतोस ? ”

धुमाळ म्हणाला, “ अहो दादा, शुक्रवारीं रात्रीं मी तुम्हांला रस्त्यांत भटलों तेव्हां तुम्हीं आपल्या हातानं पेढे दिलेत. मीं तुम्हांला विचारलं, कशाबद्दल ? तुम्ही म्हणालात कळेल तुला लवकरच. पुढें निशाणींत गेलों तों कळलं कीं गांधी मेले. मग माझ्या लक्षांत आलं तुम्ही कशाबद्दल पेढे वाटीत सुटलां होता तें. अन् आतां पेढे वाटले नाहीं म्हणून सांगतां काय ? ”

त्याचं तें बोलणं ऐकून दादा थक्कच होऊन गेले. त्यांच्या मनांत आलं, आतां या हलकटापुढें काय बोलायचं ? ते वैतागानं म्हणाले, “ बरं बंडबा, गांधी गेले म्हणून आम्हीं पेढे वाटले असं तुला म्हणायचंच असेल तर म्हण बापडा ! ”

“ नुसतं म्हणून भागायचं नाहीं दादा ! ” दोन पावलं पुढं टाकून बंडबा म्हणाला, “ आम्ही काय तुमच्याशीं नुसतं बोलायसाठीं आलों असं समजलांत कीं काय तुम्ही ? ” तो मोठमोठ्यांदा हंसला. “ नाहीं, नाहीं, दादा तुमची बामणाची जात नाहींशी करायची आहे आम्हांला. अर्धा-उघड्या अंगानं तुम्हीं रस्त्यावर भीक मागत हिंडतांना आम्हांला पाहायचं आहे. कालच्या दिवसांत या पन्नास साठ मैलांच्या टापूंत किती घरं जाळलीं आणि लुटलीं गेलीं, तुम्हांला कदाचित् माहित नसेल. तुमच्या घराची तीच गत करायची आहे आम्हांला. ”

“ असं ! ” असा उद्गार काढून दादांनीं धुमाळाकडे आणि आंगणां-तल्या त्या जमावाकडे दृष्टि टाकली. त्या जमावांतले बहुतेक चेहरे त्यांच्या ओळखीचे होते. त्यांतलीं दहा पंधरा माणसं तर नंदगडचींच होतीं, तीं या वाड्याच्या याच अंगणांत कितीदां तरी जेवलेलीं होतीं, या सोप्यांत बसलेलीं होतीं, त्यांच्यापैकीं कितीकांना तरी त्यांच्या अडचणीच्या दिवसांत बाबासाहेबांनीं, आक्कासाहेबांनीं, प्रभाकरनं पैसे देऊन, धान्य देऊन मदत केली होती...त्या जमावांत निशाणीचीं जीं माणसं दिसत होतीं तींदेखील प्रभाकरच्या मित्रमंडळींतलीं होतीं, ज्यांचीं कामं प्रभाकरनं हौसेनं केलीं

होतीं, ज्यांना प्रभाकर आपले मित्र समजत होता अशीं होतीं...पण आतां हींच सारीं माणसं काठ्या कुऱ्हाडी परजीत पेट्रोलचे आणि घासलेटचे डबे हातांत घेऊन आली होती. त्यांच्या कानांत धुमाळासारख्या लोकांनीं विषारी फुंकर घातला होता. ब्राह्मण जातीचा सूड घेण्याच्या इच्छेचं वारं त्यांच्या डोक्यांत शिरलं होतं. त्यांच्या नजरा लाल बुंद दिसत होत्या.

दादांच्या मनांत आलं, ज्यांचं आम्हीं कधींच कांहीं वांकडं केलं नाहीं अशीं हीं आमच्या घरीं खाल्लीं प्यालेलीं माणसंच आमच्यावर उलटलीं असलीं तर त्यांची समजूत कुठल्या शब्दांनीं पटणार? त्यांचा प्रतिकार करण्यांत अर्थ कोणता?...ब्राह्मणांची जात भिकेला लावल्यानं गांधींच्या मृत्यूचा बदला घेतां येईल आणि देशाला मिळालेलं स्वातंत्र्य उपभोगतां येईल अशा कल्पनेचं विष लोकांच्या मनांत भिनलेलं आहे... यांना सुविचार सांगण्यांत अर्थ नाहीं. शांत व्हा म्हणण्यांत अर्थ नाहीं... असे विचार मनांत आल्यामुळें ते उद्गारले, "असं?"

धुमाळ म्हणाला, "हां!"

दादा म्हणाले, "ठीक आहे, बंडबा. पण प्रभाकर गांवीं गेला आहे तो परत येईपर्यंत तरी थांबशील का? त्याच्याशीं चार गोष्टी तुम्ही लोक बोलाल तर—"

धुमाळ म्हणाला, "प्रभाकरशीं काय करायच आहे आम्हांला? अन् तो झाला तरी बामणाचीच अवलाद. त्याची कॉंग्रेसची सेवा काय खरी वाटते आम्हांला? तें कांहीं नाहीं दादा, आम्ही जें करायसाठीं आलों तें या घटकेला करून मोकळे होणार. आमच्या पुढाऱ्यांचा आम्हांला हुकूम झाला आहे. नंदगढच्या इनामदाराचं घर बेचिराख झालं पाहिजे. संस्थानांतून आमच्या मदतीला माणसंहि आलीं आहेत. पेट्रोल, घासलेट साऱ्या तयारीनिशीं आम्ही आलों आहोंत. उद्यां सकाळला हा तुमचा वाडा जमीनदोस्त झालेला दिसायला हवा. दत्तंभटाच, बाळू कुलकर्ण्यांचं, आप्पा देशपांड्याचं जेवढीं म्हणून बामणांचीं घर आहेत नंदगढला तेवढीं सगळीं जाळून खाक करणार आहोंत आम्ही!"

आंगणांतल्या जमावांतले लोक मोठमोठ्यांदा ओरडूं लागले, "चला रे, घुसा घरामंदी," "अहो धुमाळ, आतां इथें आंगणांतच किती वेळ उभं करणार तुम्ही आम्हांला?"

धुमाळ म्हणाला, “ दादा, आतां तुम्ही झटपट आटपा पाहूं. ”

“ काय करूं ? ” दादांनीं विचारलं.

“ आम्हांला कुणाच्याहि अंगाला हात लावायचा नाहीं. तुम्ही घरांतलीं सारीं माणसं, नोकर, गडी, स्वैपाकी, सगळयांना घेऊन वाड्यांतून बाहेर व्हा– ”

बाबासाहेब एकदम संतापून ओरडले, “ अरे बंडया, तूं काय दारू-बिरू पिऊन आला आहेस कीं काय ? घरांत चार दिवसांची बाळंतीण आहे माझी सून आणखी तूं आम्हांला घराबाहेर व्हायला सांगतोस ? ”

धुमाळ म्हणाला, “ म्हातारबुवा, उगीच कशाला जिवाचा संताप करून घेतां ? तुम्हीं बामणांनीं सांगावं आणि आम्हीं लोकांनीं ऐकावं हा जमाना गेला आतां. या गांधीवधान तुमच्या पापाचा हंडा कांठोकांठ भरला बघा. आतां आम्हीं हुकूम करायचे आणि तुम्हीं बिनतक्रार मानायचे. असेल सून बाळंतीण. तिचं कंबरडं शाबूत आहे कीं नाहीं ? उठवा तिला. सारींजणं नेसत्या वस्त्रानिशीं बाहेर पडा. वेळ लावूं नका उगाच. ”

यानंतर अवघ्या अर्ध्याच तासानंतर इनामदारांचा तो सत्तर वर्षांचा जुना वाडा सर्वस्वी त्या प्रक्षुब्ध जमावाच्या स्वाधीन झाला. जमावांतले ते लोक सैरावैरा सगळीकडे घुसले. माड्यांमाड्यांत शिरून त्यांनीं लुटालूट केली ! बिलोरी आरसे, तसबिरी, शोभेच्या वस्तू काठ्यांच्या आणि कुऱ्हाडींच्या तडाक्यांनीं फोडून टाकल्या, साऱ्या दालनांतलीं कपाटं फोडून चीजवस्तु फराफरा ओढली, स्वैपाकघरांत शिरून धुळवडींतल्या चिखला-प्रमाणें अन्नाची फेकाफेक केली, गोठ्यांत शिरून दावीं तोडून गुरं उधळून लावलीं, इकडे तिकडे घासलेट आणि पेट्रोल ओतून आग लावून दिली ! मोटारीची मोडतोड करून ती जाळली ! वैरणीचा सांठा आणि धान्याचं कोठारदेखील त्यांनीं खुशाल पेटवून दिलं ! चांदीचीं भांडीं, दागिने, उंची वस्त्रं, देवांच्या सोन्याचांदीच्या मूर्ती, रोकड पैसे जें जे म्हणून हातीं लागेल तें त्यांनीं उचललं ! कामाच्या आणि हिशोबाच्या वह्या, गालिचे, सतरंज्या, गाद्या, नेण्यासारखीं नव्हतीं अशीं चिरगुटं पांघरुणं, पुस्तकं, सगळयांचा एकच ढीग करून त्याची त्यांनीं होळी केली ! सत्तर वर्षांची ती जुनी शोभिवंत

वास्तु बेचिराख करून टाकणाऱ्या आगीच्या ज्वाला आभाळांत उंच उंच चढूं लागल्या तेव्हां साऱ्या नंदगढ गांवाला दिसूं लागल्या...दत्तंभट, कुलकर्णी, देशपांडे, यांचीं छोटीं छोटीं घरंहि थोड्याच वेळानं पेटविण्यांत आलीं...धुमाळ आणि त्याचे साठ सत्तर लोक 'गांधी महाराज की जय' अशा आरोळ्या ठोकीत विष्णुमदिरापुढच्या आवारांत उभ्या असलेल्या त्यांच्या लॉऱ्यांपाशीं येऊन थडकले. इनामदारांचीं सारीं माणसं आणि दत्तंभट वगैरे इतर ब्राह्मणांच्या घरांतलीं माणसंहि देवळाच्या सभामंडपांत येऊन निराश्रितांसारखीं बसलीं होतीं. धुमाळच्या लॉऱ्यांभोंवतीं नंदगढचे सारे गांवकरी जमले. एका लॉरीच्या टपावर चढून धुमाळ ओरडून म्हणाला,

"लोकहो, गांधींना मारणाऱ्या बामणांची या गांवावरची सत्ता आज आम्हीं संपविली आहे! आतां हें गांव इनामदाराचं नाहीं, तुमचं आहे! इथें या देवळांत इनामदारांचीं आणि इतर बामणांचीं माणसं बसलीं आहेत. आम्हांला देवळावर हल्ला करतां येत नाहीं. बसूं द्या त्यांना. पण गांवांतल्या कुणाहि माणसानं यांना कसलीहि मदत करतां कामा नये. अन्नपाण्यावाचून, कपड्यालत्त्यावांचून खुशाल पडूं द्या यांना इथें. जर कुणीं यांना मदत केली तर याद राखा. ही बामणांची जात अशीच हालहाल करून नाहींशी केली पाहिजे. बोलारे, गांधी महाराज की जय!"

त्याच्याबरोबर आलेल्या लोकांनीं आणि लॉरीभोंवतीं जमलेल्या गांवकऱ्यांनीं मोठ्यांदा जयघोष केला, "गांधी महाराज की जय!"

धुमाळ आणि त्याच्याबरोबर आलेले लोक लॉऱ्यांत चढून बसले. लॉऱ्यांचीं दारं धडाधड लावलीं गेलीं. लॉऱ्यांच्या एंजिनांचे फर्फर् असे आवाज झाले. हॉर्न वाजले. लॉऱ्या वेगानं निघाल्या. दूर जातां जातां त्या लॉऱ्यांतल्या लोकांनीं पुन्हां एकदां जयघोष केला, "गांधी महाराज की जय!"

पण विष्णुमंदिरापुढच्या आवारांत जमलेल्या गांवकऱ्यांनीं त्या जयघोषाला उलट साद घातली नाहीं. धुमाळ आणि त्याचे लोक दूर निघून गेल्यानंतर गांवकऱ्यांच्या त्या जमावाचा पिसाट उन्माद किंचित् कमी झाला होता. त्या

लोकांनीं नजरा वर करून इनामदारांच्या वाड्याकडे पाहिलं. संध्याकाळच्या उन्हांत आगीचा डोंब आणि त्यांतून उठणारे धुराचे काळे लोट त्यांना दिसले...त्यांनीं माना वळवून विष्णुमंदिरांत येऊन बसलेल्या इनामदारांच्या माणसांकडे पाहिलं. कोणी रडत नव्हतं ! कोणी ऊर बडवून घेत नव्हतं ! सारीं माणसं आपापल्या जागीं पांखरं भिंतीला चिकटून बसावीं तशीं बसलीं होतीं. फक्त प्रभाकरचा चार दिवसांचा तान्हा मुलगा मधूनच रडत होता, आणि त्याला गप्प करण्यासाठीं त्याची आई आणि आजी दोघी कांहीं तरी शब्द काढीत होत्या...टेकडीच्या माथ्यावर दिसणारा तो आगीचा डोंब, आणि विष्णुमंदिरांत आश्रय घेऊन बसलेलीं तीं माणसं, यांकडे जमावांतले ते गांवकरी आळीपाळीनं बघत राहिले !...त्यांच्या तोंडून ‘ गांधी महाराज की जय ’ असा जयघोष फुटेना...खून करणाऱ्या एखाद्या माणसानं आपल्या बळीकडे पहावं, आणि मीं काय केलं हें असा विचार मनांत आल्यामुळें त्यानं भांबावून जावं, तशी त्या जमावातल्या गांवकऱ्यांची अवस्था झाली होती...गेल्या आठ दहा घटकांमध्यें जो भयंकर अत्याचारी प्रकार त्यांच्या गांवांत झाला होता, आणि जो चालू असतांना त्यांनीं अत्याचारांत भागहि घेतला होता, त्याचं नागडं उघडं स्वरूप थोड्याशा अंतरावरून आतां त्यांना प्रथमच दिसत होतं...जें झालं त्याचा अर्थ त्यांना कळत नव्हता... जें त्यांनीं प्रत्यक्ष हातांनी केलं होतं त्याचाहि अर्थ त्यांना कळत नव्हता...त्यांच्या नजरेला टेकडीच्या माथ्यावरची आग दिसत होती, इकडे खालीं मंदिरांत बसलेलीं असहाय बायका पोरं दिसत होतीं. त्यांच्या कानांना प्रभाकरच्या तान्ह्या मुलाचं रडणं ऐकूं येत होतं...पण डोळ्यांच्या आणि कानांच्या या संवेदना त्यांच्या मेंदूपर्यंत नीटशा पोंचत नव्हत्या... ते सारेजण भांबावून गेले होते, मोठ्या कळपांतलीं जनावरं एकमेकांकडे भकास डोळ्यांनीं पाहतात त्याप्रमाणें एकमेकांकडे बघत होते !

—*—

# प्रकरण तेरावं



संध्याकाळ उलटली होती. नदीच्या वाळवंटांत वाळत टाकलेलीं लुगडीं धोतरं आंघोळ आटपून पाण्याबाहेर आलेल्या माणसांनीं गुंडाळून आवरावीं त्याप्रमाणें तेजोहीन झाल्यासारखीं वाटणारीं उन्हं झराझर गुंडाळलीं जात होतीं. निशाणीच्या मोटर स्टँडभोंवतालचीं घरं आणि झाडं आपल्या सावल्या आणखी आणखी लांब पसरीत होतीं. घरांच्या कौलारांवर आणि झाडांच्या फांद्यांवर पक्ष्यांची फडफड आणि किलबिल वाढूं लागली होती... अशा वेळेस एक गाडी स्टँडवर येऊन उभी राहिली. ती गाडी वास्तविक रोज साडेचार वाजतां येणारी. पण आज ती वाटेंत दहा ठिकाणीं नादुरुस्त झाल्यामुळें तिला आज इतका उशीर झाला होता. पण गाडींतल्या उतारूंची त्या उशीराबद्दल तक्रार नव्हती. अखेर या गाडीनं आपल्याला निशाणीला आणलं हेंच मोठं नशीब असं मनाशीं म्हणत ते उतारू गाडींतून खालीं उतरले. त्या उतारूंत प्रभाकर होता.

इतर उतारूंप्रमाणेंच आपण अखेर निशाणीला येऊन तर पोंचलों असा आभारप्रदर्शक सुटकेचा निःश्वास त्यानंहि मनाशीं सोडला. पण इतरांप्रमाणें तो निःश्वास सोडून स्टँडवरून रस्त्याकडे निघाला नाहीं. तो मनाशीं म्हणाला, 'आतां नंदगढच्या रस्त्यानं जाणारी एकादी लॉरी सांपडते का पाहिली पाहिजे.' त्याच्या मनांत आलं, घरांतलीं सारीं माणसं आपल्या वाटेकडे अगदीं डोळे लावून बसलीं असतील. मुद्दाम नव्यानं बांधलेल्या माडींत पलंगावर उषा तर आतुरतेनं वाट पहात असेल, आपल्यावर थोडीशी रागावलीहि असेल. ती प्रसूत झाली त्याला आजचा पांचवा दिवस होता. वाड्यांत पांचवीच्या पूजेची आईनं गडबड उडवून दिली असेल. आपल्याला अगदीं महत्त्वाच्या कामामुळें पुण्याला राहणं भाग पडलं, आधीं येतां आलं नाहीं, हें कुणाला खरं वाटणार नाहीं. सारीच मंडळी आपल्यावर

रागावली असतील. पण उषा सगळ्यांत जास्त रागावली असेल. पलंगावर पडल्या पडल्या ती आपल्याकडे कोणत्या नजरेनं पाहील त्याचं स्पष्ट चित्र प्रभाकरला दिसत होतं. आपण निदान पांचवीच्या पूजेला तरी घरीं आलों या विचाराच्या समाधानानं आई, बाबा, दादा ही मंडळी आपल्याला क्षमा करतील. उषाचा राग इतक्या सहजासहजीं जाणार नाहीं, पण तोहि आपण घालवूं. तिच्या अंगाभोंवतीं हात टाकून आपण विचारूं, 'कुठें आहेत आमचे युवराज ?' असं विचारल्यावर तिला खचित हंसूं येईल...मग आपला मुलगा आपल्याला दिसेल..."कशी आहे स्वारी कुणास ठाऊक..." आतां नंदगढच्या बाजूला जाणारी भाड्याची मोटार मिळाली नाहीं तर मजुरांच्या डोक्यावर सामान देऊन खुशाल पायानीं चालायला लागायचं असा प्रभाकरनं विचार केला...लॉरीपाशीं धांवत आलेल्या दोन तीन हमालांना त्यानं टपावरचं सामान दाखवून काढायला सागितलं.

...तितक्यांत कुणीं तरी त्याच्या खांद्यावर हात ठेवला आणि म्हटलं, "काय प्रभाकरपंत ?"

त्यानं वळून पाहिलं. बाजार–रस्त्यावरच्या एका मोठ्या सोडावॉटरच्या दुकानाचा मालक त्याच्यासमोर उभा होता. त्यानं हंसून त्याला म्हटलं, "काय प्रल्हाद, सार ठीक आहे ? अरे, नंदगढकडे जाणारी एखादी गाडी मिळेल कीं नाहीं ?"

प्रल्हादनं एकदम आश्चर्यानं विचारलं, "म्हणजे ? आपण नंदगढला जाणार ?"

प्रभाकर म्हणाला, "होय. गाडी मिळाली नाहीं तर चालत जाणार. घरांतली मंडळी माझ्या वाटेकडे अगदीं डोळे लावून बसली असतील."

प्रल्हाद म्हणाला, "म्हणजे ? पंत, तुम्हांला कांहीं माहीतच नाहीं कीं काय ? तुमच्या घरची सारी मंडळी तर आज सकाळीं इकडे निशाणीला आली आहेत."

"आमची मंडळी ? प्रल्हाद, तुला काय वेडबीड लागलंय काय ? आमची मंडळी इकडे कशाला येतील ? आज तर आमच्या घरीं पांचवीची पूजा असेल—"

प्रल्हाद म्हणाला, " पंत, तुम्हांला कांहीं माहीत नाहीं म्हणून असं बोलतां. तुमचीं माणसं खरंच सकाळीं इकडे आलीं. बाबूराव जोशांच्या घरांतल्या दोन खोल्या घेऊन राहिलीं आहेत."

प्रभाकरनं विचारलं, " प्रल्हाद, हें तूं काय सांगतो आहेस ?"

प्रल्हादनं हळूंच त्यांचा हात धरला आणि म्हटलं, " पंत, काल एक भयंकर गोष्ट घडली. तुम्हांला सारं सांगतों. पण इथें नको. तिकडे माझ्या दुकानांत चला. तिथें आपण बसूं, आणखी बोलूं." तेवढ्यांत हमालांनीं सारे बोजे डोक्यावर घेतले होते. त्यांना प्रल्हाद म्हणाला, " तिकडे माझ्या दुकानाकडे चला रे." तो निघाला आणि " चला पंत" असं म्हणून त्यानं प्रभाकरला हातानं ओढलं.

प्रभाकर त्याच्या मागोमाग पावलं टाकूं लागला. पण त्याला वाटलं, आपल्याला स्वप्न तर पडत नाहीं ? प्रल्हाद आपल्याला भेटतो काय, आपली सारी मंडळी निशाणीस आली आहेत असं सांगतो काय, आणि काल एक भयंकर गोष्ट घडली असं म्हणतो काय...आपण खरोखरच का त्याच्या मागोमाग त्याच्या दुकानाकडे चाललों आहोंत !...त्याचीं पावलं हळू हळूं पुढें पडत होतीं. पण त्याचं मन भांबावून गेलं होतं. कोणत्या भयंकर गोष्टीची बातमी हा प्रल्हाद आपल्याला सांगणार आहे याची त्याला मुळींसुद्धां कल्पना करतां येत नव्हती.

वाटेंत एका बाजूस सिद्रामाप्पाचं मोठं दुकान होतं. त्या दुकानांत सिद्रामाप्पा लोडाशीं टेकून गादीवर बसला होता. प्रभाकरनं ओरडून म्हटलं, " काय सिद्रामाप्पा ! काय चाललंय ?" पण सिद्रामाप्पानं उलट उत्तर दिलं नाहीं. नमस्कारहि केला नाहीं. उलट प्रभाकरला पाहतांच तो चमकून जागेवरून उठला आणि दुकानाच्या आंतल्या बाजूस गेला. पुढच्या एका दुकानांत बन्सीलाल परदेशी उभा होता. पण आपण दृष्टीस पडल्याबरोबर तोदेखील जणूं आपल्याला टाळण्यासाठीं चटकन् दूर झाला आणि आंत गेला अशी प्रभाकरला शंका आली. त्या दोघांच्या या वागण्याचा त्याला चमत्कार वाटला. त्याच्या मनांतलं आश्चर्य ओळखून प्रल्हाद त्याला म्हणाला, " पंत, तुमच्याशीं बोलायला आतां या माणसांना तोंड नाहीं."

प्रभाकरानं विचारलं, "म्हणजे काय ?"

"कालच्या जाळपोळींत त्या सिद्रामाप्पानं आणि या गणपत परदेशीनं मोठा पुढाकार घेतला होता. घासलेटचे आणि पेट्रोलचे शेपन्नास डबे यांनीं आपल्या खर्चानं पुरविले होते."

प्रभाकर एकदम जागच्या जागीं थबकला...संस्थानांत रविवारीं झालेल्या जाळपोळीची आणि लुटालुटीची हकीगत त्यानं वर्तमानपत्रांत वाचली होती. तिची त्याला आठवण झाली. त्यानं प्रल्हादला विचारलं, "म्हणजे ? इकडेसुद्धां जाळपोळ झाली म्हणतोस कीं काय ?"

"खुद्द निशाणींत नाहीं झाली, पण—"

"मग ?"

"पंत, तुम्हांला हें सांगण्याची पाळी माझ्यावर यावी याचं फार वाईट वाटतं. पण तुम्हांला कांहींच माहीत नाहीं, तेव्हां सांगितलं पाहिजे. काल दुपारीं तुमचा नंदगढचा वाडा जाळून बेचिराख करण्यांत आला!"

प्रभाकरच्या तोंडून एक अक्षरदेखील बाहेर पडलं नाहीं. तो प्रल्हादकडे नुसता बघत राहिला. फक्त आपल्या मनांत उठलेला भावनांचा आवेग आवरण्यासाठीं त्यानं हातांत धरलेला प्रल्हादचा हात घट्ट दाबला...पांच दिवसांपूर्वी गांधींच्या वधाची बातमी त्याला प्रथम कळली होती त्या क्षणीं तो असाच दोन्ही हातांच्या मुठी आवळून अगदीं सुंद होऊन नुसता बघत राहिला होता. आतांहि तो रस्त्यांत प्रल्हादचा हात पकडून अगदीं थिजून गेलेल्याप्रमाणें उभा राहिला. वाडा बेचिराख करण्यांत आला!... त्या शब्दांचा जबरदस्त धक्का त्याच्या मनाला बसला होता...पण जणूं त्या शब्दांचा अर्थ कळण्यासाठीं त्या शब्दांची आणखी एक धडक त्याच्या मनावर बसायला हवी होती आणि त्या धडकेची तो वाट पहात होता...

प्रल्हाद त्याला म्हणाला, "दुकानांत चला पंत, तिथें सांगतों सगळं."

प्रभाकर पुन्हां त्याच्या मागोमाग जाऊं लागला...ज्या ठिकाणीं एखादं अघोरी भयंकर कृत्य घडल्याचं कळलेलं आहे त्या ठिकाणाकडे जातांना माणूस हलके हलके पावलं टाकतो त्याप्रमाणें त्याचीं पावलं पडत होतीं... प्रल्हादनं जें सांगितलं तें भयंकर होतंच ! पण तो आणखी कांहीं तरी

भयंकर सांगणार होता...काय कोण जाणे!—असं मनाशीं म्हणत प्रभाकर चालला होता....

संस्थानांत रविवारची जाळपोळ ज्यांनीं केली होती त्यांचेच हस्तक निशाणीला कसे आले होते, नंदगढच्या इनामदारांचा वाडा जमीनदोस्त करण्याचा मनसुबा कसा ठरला होता, सिद्रामप्पा आणि गणपत परदेशी यांच्या मदतीनं बंड्या धुमाळच्या नेतृत्वाखालीं दोन लॉऱ्या भरून गुंड कसे नंदगढला रवाना झाले होते, आणि नंदगढला पोचल्यावर गांवकऱ्यांना जमा करून त्यांनीं कसं कसं थैमान घातलं होतं, त्याची इत्थंभूत हकीकत प्रल्हादच्या तोंडून ऐकतांना प्रभाकर अगदीं निःशब्द बसला होता. प्रल्हादच्या बोलण्यांत भयंकर भयंकर असा शब्द वरचेवर येत होता. सारं सांगून झाल्यावरहि तो पुन्हां म्हणाला, "रात्रीच्या वस्तीपुरतीं तुमचीं माणसं विष्णुमंदिरांत राहिलीं होतीं. पहांट झाल्यावर इकडे निशाणीला आलीं, अन् बाबूराव जोशांच्या घरांत दोन खोल्या घेऊन राहिली. चुलीवर चढवायला भांड नाहीं, नेसूचं बदलायला वस्त्र नाहीं, अशा स्थितींत! तुमचीं माणसं धीराचीं! पण त्यांची ती अवस्था पाहून बाबूराव जोशांची म्हातारी आई तुमच्या आक्कासाहेबांना मिठी मारून हंबरडा फोडून ऊर बडवून रडूं लागली!" त्यानं अंगाला शहारे दिले. "छेः! फार फार भयंकर प्रसंग आला तुमच्या माणसांवर याचा आचंबा वाटतो! कॉंग्रेससाठीं, गांधींच्या आज्ञेखातर ज्यांचा कैवार घेऊन तुम्ही कितीक वेळां तुरुंगांत गेलां त्यांनींच तुमचीं बायकामाणसं रस्त्यावर काढावीं! जगांत कांहीं दानत शिल्लक राह्यची आहे कीं नाहीं! छेः! फार भयंकर गोष्ट घडली आहे पंत!"...

पण चमत्कार असा कीं जें घडलं तें भयंकर आहे असं आतां प्रभाकरला वाटेनासं झालं होतं. प्रल्हादच्या तोंडून 'वाडा बेचिराख करण्यांत आला!' ही बातमी ऐकतांक्षणीं त्याला विजेच्या धक्क्यासारखा धक्का बसला होता. पण नंतर जेव्हां प्रल्हाद एकंदर प्रकाराचं वर्णन करूं लागला तेव्हां तें ऐकत असतांना त्याच्या मनांत एक नवाच विचार येऊन दृढ होऊं लागला. त्या प्रकाराकडे थोडया अलिप्त वृत्तीनं तो पाहूं लागला, व त्याला वाटूं लागलं, जें घडलं तें जितकं भयंकर होतं तितकंच—किंबहुना

त्याहून अधिक–सुसंगत होतं...ज्या दुरात्म्यानं गांधींवर पिस्तुल चालविलं तो ब्राह्मण जातीचा होता...त्याच्या त्या पापकृत्याचं प्रायश्चित्त या ना त्या रूपानं ब्राह्मण जातीनं बिनतक्रार घ्यायलाच हवं. तें प्रायश्चित्त देणारे कितीसे स्वच्छ होते, त्यांचे हेतू कितीसे निर्मळ होते, प्रायश्चित्त देतांना ते वाळल्याबरोबर ओलंहि जाळायला कां उद्युक्त झाले होते, या प्रश्नांचीं काय उत्तरं असतील तीं असोत. ते प्रश्न केव्हां तरी विचारले जातील, त्यांचीं उत्तरं दिलीं जातील. पण तें पुढं. आज नव्हे ! आज घटकेला येवढ्याच कार्यकारणसंबंधाकडे नजर पोचण्यासारखी होती, कीं गांधींचा वध करणारा नराधम ब्राह्मण होता. गांधींच्या हत्येचा कलंक ब्राह्मण जातीला लागला होता. तो कलंक धुतला जावा यासाठीं ब्राह्मण जातीनं दुःखभोग सोसायला हवेत. कुलांगाराच्या दुराचारांचं प्रायश्चित्त सबंध कुळाला घ्यावं लागतं, त्याचप्रमाणें जातीच्या बाबतींतहि न्याय मानायला हवा. गोडसे ब्राह्मण नसता तर ब्राह्मणांवर सूड घेण्याची संधि लोकांना मिळाली नसती... गांधीवधानंतरची जाळपोळ म्हणजे गोडसेच्या अघोरी कृत्याचे अटळ परिणाम होते...त्या जाळपोळींत धूर्त क्षुद्र राजकारणाचे आणि जातीय वैमनस्याचे जे धागेदोरे गुंतलेले होते त्यांकडे पाहून चरफडण्यांत या क्षणाला अर्थ नव्हता...भयंकर भयंकर म्हणून ऊर बडविण्यांत अर्थ नव्हता... त्याच्या भयंकर स्वरूपापेक्षां सुसंगतीकडे–कार्यकारणसंबंधाकडे पाहून मन घट्ट ठेवायला हवं होतं...या दुःखभोगानं पापाचा कलंक धुतला जात आहे असं मानायला हवं होतं...

हे विचार प्रभाकरच्या मनांत बळावत गेले. तो मनाशीं म्हणाला, 'दुःखभोगानं आत्म्याचं सामर्थ्य वाढतं हेंच दाखविण्यासाठीं जे गांधी जीवन जगले, त्यांचं अनुयायित्व मी अल्पसं शिकलों असेन तर या संकटानं मी घायाळ होतां कामा नय. माझ्या घरांतल्या माणसांना घायाळ होऊं देतां कामा नये...वाडा भस्म झाला, सारी चीजवस्तु लुटली गेली, गुरंढोरं गेलीं, धान्य गेलं !...जाऊं दे ! हें भयंकर झालं असा विव्हळण्याचा स्वर माझ्या तोंडून निघून उपयोगी नाहीं ! माझ्या माणसांच्या तोंडून निघून उपयोगी नाहीं !...'

मनाशीं असा निश्चय करून प्रभाकर प्रल्हादच्या दुकानांतून बाहेर पडला आणि सामान डोक्यावर घेतलेल्या हमालांना बरोबर घेऊन बाबूराव जोशांच्या घराच्या वाटेनं निघाला खरा, पण घरीं पोंचल्यावर अल्पावधींतच त्याच्या ध्यानांत आलं, कीं त्याच्या या निश्चयाची कांहीं गरजच नव्हती. त्याचे वडील, आई, दादा, उषा—कोणाच्याहि तोंडून विव्हळण्याचा स्वर निघतच नव्हता. घायाळ झाल्याप्रमाणें कोणाचीहि चर्या दिसतच नव्हती. ज्या विचारसरणींतून प्रभाकरच्या मनाचा निश्चय उद्भवला होता, तीच विचारसरणी त्या सर्वांनीं पत्करली असेल हें शक्य नव्हतं. दुःखभोगानं आत्मिक सामर्थ्य वाढतं, या गांधीवादावर प्रभाकरची श्रद्धा होती. त्या श्रद्धेनं तो अनेक वर्षं वागला होता. श्रद्धेची कसोटी पहाणाऱ्या या संकटाच्या वेळीं तिला दृढपणें बिलगलंच पाहिजे असं त्याला वाटत होतं. इतरांची तशी गोष्ट नव्हती. गांधीवादावरील निष्ठेची परीक्षा त्यांना द्यायची नव्हती. तो वाद त्यांनीं स्वीकारलेलाच नव्हता. गांधींचं व कॉंग्रेसचं अनुयायित्व प्रभाकरनं पत्करलं होतं, त्यांनीं पत्करलं नव्हतं. दादांनीं तर मुळींच नव्हतं. तेव्हां प्रभाकरची व इतरांची विचारसरणी एकच असणं शक्य नव्हतं. तथापि निराळ्या विचारसरणीमुळें का होईना, केवळ संकटापेक्षांहि आपण मोठं आणि उच्च ठरलं पाहिजे, इनामदारांच्या घराचा धीरोदात्तपणा सिद्ध केला पाहिजे, एवढ्याच साध्या विचारामुळें का होईना, आपण जो निश्चय मनाशीं केला तोच निश्चय घरांतल्या इतर साऱ्या माणसांनींहि आधींच केला आहे, ही गोष्ट प्रभाकरच्या ध्यानांत यायला वेळ लागला नाहीं.

जोशांच्या वाड्याच्या मागच्या लहान आंगणांत एक फाटकी सतरंजी टाकून दादा बसले होते. प्रभाकरला पाहतांच ते आक्कासाहेबांना ओरडून म्हणाले, “ आई! प्रभाकर आला! ” आंगणालगतच्या एका खोलींतून आक्कासाहेब बाहेर आल्या, बाबासाहेबहि आले. अगदीं हंसत. जणूं सर्वांनीं मनोमय निश्चय केला होता कीं आदल्याच दिवशीं जी आपत्ति डोक्यावर कोसळली होती तिचा उच्चारदेखील करायचा नाहीं. दादा त्याच्या पाठीवर हात ठेवून म्हणाले, “ अरे गृहस्था, आम्ही किती वाट पाह्यची तुझी ! ” प्रभाकर हंसून म्हणाला, “ कामांत अडकून पडलों. काय करूं ? माफ कर. ”

दादा म्हणाले, " आमची माफी मिळविणं सोपं आहे. पण तुझी बायको तुला क्षमा करते का बघ ! "

तितक्यांत दुसऱ्या खोलींतून रडण्याचा आवाज आला, त्याबरोबर आक्कासाहेब म्हणाल्या, " बाहेर कोण आलं आहे तें ओळखलंन् बघ गुलामानं ! "

प्रभाकर म्हणाला, " होय ? "

" तर ! " आक्कासाहेब म्हणाल्या, " फार हुशार आहे हो ! "

हमालांनीं बोजे खालीं ठेवले त्यांकडे पाहून दादांनीं विचारलं, " इतकं काय सामान आणलं आहेस रे ? "

प्रभाकर म्हणाला, " उषाच्या आईनीं लुगडीं अन् साड्या अन् कपडे अन् काय काय दिलंय बुवा ! नातू झालाय तेव्हां लेकीला कुठें ठेवूं अन् कुठें नको असं झालं आहे त्यांना ! "

दादा म्हणाले, " कुठें ठेवूं अन् कुठें नको असं व्हायचं काय कारण ? आमच्याकडेच टेवायची ! " खोलीकडे वळून त्यांनीं आवाज किंचित् चढविला आणि म्हटलं, " ए उषा ! तुझ्या आईना येवढंही कळूं नये काय ग ? "

दादा हंसले. बाबासाहेब व आक्कासाहेबही हंसल्या. त्या प्रभाकरला म्हणाल्या, " बरं पण तूं आधीं हातपाय धू अन् सूनबाईकडे जा बघूं. तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसली आहे ती ! "

त्या तिघांकडे पाहतां पाहतां प्रभाकरच्या मनांत आलं, घायाळ होतां कामा नये, विव्हळण्याचा स्वर तोंडावाटे निघूं देतां कामा नये, हें मी यांना काय शिकविणार ? यांच्याकडे पाहून मलाच शिकतां येईल.

हातपाय धुऊन तो उषाकडे गेला. एका खाटेवर ती बसली होती. मुलाला दुपट्यांत गुंडाळून हातांत आडवा धरून ती त्यांची वाटच बघत होती. तिला एकदम मिठी मारायचं त्यानं मनाशीं ठरविलं होतं. पण तो तिच्याजवळ जातांच तिनं त्याच्या हातांत मुलाला ठेवलं, आणि म्हटलं, " संभाळा आपले चिरंजीव ! " त्याच्या हातांचा स्पर्श झाल्याबरोबर मुलाचं रडणं थांबलं. शेजारच्या खोलींतून आक्कासाहेब म्हणाल्या,

" बघितलंस प्रभाकर! साधं काम नाहीं!" ते कौतुकाचे शब्द ऐकतांच उषाला खुदकन् हंसू आलं. आणि ज्या तिच्या हंसण्याचा अगदीं तिला प्रथम पाहिल्यापासून प्रभाकरला विलक्षण मोह वाटला होता तें गोड हंसणं ऐकल्याबरोबर तो तिच्याजवळ खाटेवर बसला, आणि त्यानं उजव्या हातांत मुलाला सावरून धरून डाव्या हातानं तिला जवळ ओढली व कुशींत घट्ट धरली...

कांहीं वेळ दोघंही गप्प राहिलीं. त्यांना एकमेकाचा ऊष्ण श्वास कळत होता. निकट स्पर्श जाणवत होता. त्या स्पर्शांतलं दुःख कळत होतं. दुःखाचा उच्चार होऊं न देण्याचा निश्चयही समजत होता...तोंडावाटे शब्द काढण्याची गरजच नव्हती. केवळ गाढ आलिंगनाची भाषा पुरेशी होती. सुखाची होती.

* * *

डोक्यावर कोसळलेल्या संकटाचा उच्चार न करण्याचा निश्चय ज्याप्रमाणें इनामदारांच्या कुटुंबांतल्या माणसांनीं मनोमय केला व पाळला, त्याचप्रमाणें त्यांतून मार्ग काढण्याचे त्यांचे बेतहि एकमेकांशीं विशेष चर्चा न करतां जणू सगळ्यांच्या मनांत एकदम आल्यासारखे व सगळ्यांना पटल्यासारखे आपोआप ठरले, व त्याप्रमाणें सारी व्यवस्था होऊ लागली. निशाणीस बाबूराव जोशांच्या घरांत त्यांनीं आश्रय घेतला होता तो अर्थातच तात्पुरता. त्या घरांत अगर त्या गांवांत कायम वस्ती करणं सोयीचंही नव्हतं अन् आवश्यकही नव्हतं. वाडा जळाला म्हणून नंदगढ सोडण्याचं कारण नव्हतं, किंवा सोडण्यांत सोयही नव्हती. ज्यांनीं वाडा जाळला आणि चीजवस्त लुटली त्यांना कांहीं इनामदारी छिनून घेतां येण्यासारखी नव्हती, अथवा जमिनी उध्वस्त करतां येण्यासारख्या नव्हत्या. बाबासाहेबांनीं व दादांनीं मंगळवारीं बिऱ्हाड तात्पुरतं निशाणीला आणलं, आणि त्याच दिवशीं मळ्याच्या जागेंत तीन झोपड्या बांधवून घेण्यास सुरुवात केली. एक मोठी झोपडी स्वतःसाठीं, एक छोटी झोपडी दत्तंभटांच्या बिऱ्हाडासाठीं, व दुसरी छोटी झोपडी नोकर माणसांसाठीं. या झोपडया सहा दिवसांत तयार झाल्या. जमिनी वाळल्या, आणि रविवारीं इनामदारांची मंडळी

निशाणी सोडून मळ्यावर राह्यला आली. दत्तंभटांची मंडळी इतके दिवस विष्णुमंदिरांतच पडून होती तीहि झोपडयांत आली. गडी, मोलकरीण वगैरे माणसंहि आलीं. दावीं तोडून उधळून दिलेल्या गुरांपैकीं एक मोठी म्हैस व दोन सुंदर बैल कोणी तरी पळवून नेले होते, पण बाकीचीं गुरं सांपडलीं होतीं, तींहि आणून जुजबी गोठ्यांत बांधण्यांत आलीं. म्हैस व बैल कुणाकडे आहेत तें दादांना कळलं होतं. भिवरीच्या पाटलाकडे तीं जनावरं ज्यांनीं पाहिलीं होतीं त्यांनीं त्यांना सांगितलं होतं. घराच्या लुटींत कोणी कोणी कोणत्या जिनसा लांबविल्या त्याचीहि खबर दादांना लागली होती. कांहीं जिनसा निशाणीला गेल्या होत्या, कांहीं डोरलं, सुपलं, धामणी अशा दूरच्या गांवीं पोंचल्या होत्या, पण कांहीं खुद्द नंदगढलाच होत्या, आणि कोणाच्या घरांत लुटीचा कोणता माल सांपडेल तें दादांना माहीत होतं. ते मनांतल्या मनांत चरफडत होते. कोणी विश्वसनीय तक्रार गुदरल्यास संशयितांच्या झडत्या घेण्यांत येतील व गुन्हेगार सांपडल्यास त्यांवर खटलेहि भरण्यांत येतील, असा सरकारी हुकुम निघाला तेव्हां दादा म्हणाले, “ सरकारी कचेरींत आपण वर्दी देऊं. पुष्कळ चीज वस्त परत मिळेल आणि अत्याचार करणारांना तुरुंग दाखवितां येईल...”

पण प्रभाकर म्हणाला, ‘ आपल्याला असलं कांहीं करायचं नाहीं, दादा. ’

लुटालुटीचा विषय दोघां भावांमध्यें प्रथमच चर्चिला जात होता. आतांपर्यंत अव्यक्त राहिलेले मतभेद आतां व्यक्त होणं अपरिहार्य होतं. प्रभाकरचं तें उत्तर ऐकून दादा म्हणाले, “ कां करायचं नाहीं ? ज्यांचं आम्हीं कधीं कांहीं वाकडं केलं नाहीं, इतकंच नव्हे वाईट चिंतिलं देखील नाहीं त्यांनीं खुशाल एक दिवस उठावं, जाळपोळ करावी, अन् हा अत्याचार आम्हीं मुकाट्यानं खालीं मान घालून सहन करावा ? या लोकांचा आम्हीं कोणता अपराध केला होता ?– ”

प्रभाकर म्हणाला, “ गोडसे आपल्या जातींतला हा आपलाच अपराध आपण मानायला हवा– ”

“ हें मला नाहीं पटत ” दादा म्हणाले, “ ज्यांनीं आमचं घर जाळलं त्यांच्या जातींत कोण कोण देशद्रोही नतद्रष्ट होऊन गेले आणि

आज घटकेला आहेत त्यांची यादी देतां येईल मला! त्या पापाबद्दल यांना कोणी कोणतं प्रायश्चित्त दिलं आहे म्हणून हें आम्हांला शासन करायला लायक ठरले रे?"

प्रभाकर म्हणाला, "दादा, अशा उखाळ्या पाखाळ्या काढल्यानं कुणाचाच फायदा होणार नाहीं. गांधीवधानंतर ज्यांनीं जाळपोळ केली त्यांनीं फार वाईट गोष्ट केली. पण त्याबद्दल त्यांना शासन देण्यासाठीं खटले भरावेत, तुरुंग दाखवावा, असं मला वाटत नाहीं. त्यांची चूक त्यांना कळेल अन् पश्चात्ताप होईल तरच त्यांतून कांहींतरी चांगली गोष्ट निर्माण होईल. अत्याचारांचा बदला संतापानं अन् द्वेषानं घ्यावा हें मला पटत नाहीं. गांधींची शिकवणुक निराळी आहे. कॉंग्रेसच्या राज्यांत त्या शिकवणुकीची अंमल चालेल असं साऱ्यांनीं वागायला हवं ना?"

दादा एकदम तुच्छतेनं हंसले व म्हणाले, "हंः! भ्रमांत आहेस तूं प्रभाकर! अरे देशांत कॉंग्रेसचं राज्य आहे कुठें? उच्च वर्णीयाचा द्वेष शिकविणाऱ्या गुंडांचं राज्य आहे! परवांची जाळपोळ ज्यानीं डोळ्यांनीं पाहिली असेल त्यांची खात्री पटली असेल कीं देशांत कॉंग्रेसचं राज्य नांवाला आहे. बहुजनसमाजातल्या गुंडाचीच खरी हुकमत आहे. देश स्वतंत्र झाला अस तुम्ही कॉंग्रेसवाले आम्हांला सांगतां, पण आम्हांला खरं स्वातंत्र्य कुठें मिळालंय? सुखासमाधानानं निर्भयपणानं साऱ्या लोकांना जगतां आलं तर तें स्वातंत्र्य खरं. तें आम्हांला मिळालंय? ते अजून दूरच आहे ना? अन् प्रभाकर मी तुला सांगतों, हा बहुजनसमाज उत्तरोत्तर असलं गुंडगिरीचच राजकारण अधिकाधिक खेळणार आहे. सत्ता त्यांच्या हातांत आणखी गेली तर—"

"गेली तर कां म्हणतोस?" प्रभाकर म्हणाला, "ती बहुजनसमाजाच्या हातांत जावी असा मुळीं स्वातंत्र्यासाठीं जे आम्ही झगडलों त्यांचा हेतुच आहे. बहुजनसमाजाचंच राज्य व्हायला हवं, अन् तें होणार."

"मग जातिद्वेषाचं थैमान होणार—"

"इथें तूं चुकतोस, दादा. परवांच्या जाळपोळीनं तूं निराश झाला आहेस म्हणून असं बोलतोस. बहुजनसमाज नेहमींच अशी गुंडगिरी

करील असं तुला वाटतं. पण तसं होणार नाहीं. बहुजनसमाजाला अत्याचारी धोरण सोडायला आम्ही लावूं. कॉंग्रेसच्या तत्त्वज्ञानांत जर कांहीं ताकद उरली असेल, आम्हां कॉंग्रेसवाल्यांची स्वतःची दानत कांहीं शाबूत राहिली असेल तर बहुजनसमाजाला आम्ही अनत्याचारी बनवूं!"

"त्यांची गुंडगिरी मुकाट्यानं सहन करून होय?" दादांनीं उपहासानं विचारलं.

"होय, सहन करून, अन् तो मार्ग चुकीचा आहे हें त्यांना पटवून!"

"हंः! भ्रमांत आहेस तूं प्रभाकर!"

प्रभाकर म्हणाला, "तुला तो भ्रम वाटतो. मला ती श्रद्धा वाटते!"

यावर दादांनीं वाद वाढविला नाहीं.

पण दोन दिवसांनीं सकाळीं ते झोपडीच्या एका दालनांत एक भस्म खलीत बसले असतांना निशाणीची मंडळी प्रभाकरकडे म्हणून आली व प्रभाकर शेतावर गेला असल्यामुळें त्याची वाट पहात त्यांच्यासमोर बसली, आणि त्या मंडळींत सिद्रामप्पा, परदेशी, बंड्या धुमाळ या व्यक्ती त्यांना दिसल्या तेव्हां मनांतला राग मनांत ठेवणं त्यांना कठीण झालं. त्या मंडळींना या बसा केल्यावर त्यांनीं सिद्रामप्पाला विचारलं, "काय, आज पेट्रोलचा भाव काय आहे?"

सिद्रामप्पाला वाटलं कुशल विचारण्याचीच ही एक तऱ्हा असेल. त्यानं भाव सांगितला.

तो ऐकून दादा हंसले व म्हणाले, "पण बामणांचीं घरं जाळायला हवं असेल पेट्रोल तर कांहीं सवलतीच्या दरानं किंवा फुकट मिळेल कीं नाहीं?—"

तें ऐकून सिद्रामप्पाचा चेहरा उतरला. इतर मंडळीही मनांतल्या मनांत चपापून गेली. दादा थोडा वेळ गप्प राहिले, पण मग धुमाळकडे बघून म्हणाले, "इनामदारांचीं माणसं एका झोंपडींत कशीं राहतात तें पाह्यला आलास होय बंडबा? अरे, त्या दिवशीं काठ्याकुऱ्हाडीनिशीं ज्यांना घेऊन आला होतास त्यांना कां नाहीं आणलंस? आमची ही स्थिति पाहून त्यांचे

डोळे निवले असते. ‘ गांधी महाराज की जय ’ अशी आणखी एक आरोळी त्यांना ठोकतां आली असती ! ”

मंडळींतले एक गृहस्थ म्हणाले, “ दादा, उगीच कां छेडतां ? आम्ही प्रभाकरची भेट घ्यायला आलों आहोंत तें झालं गेलं विसरा म्हणायसाठींच अन् त्यांची मदत मागण्यासाठींच ! ”

“ प्रभाकरची मदत ! ” दादा मोठ्यांदा उद्गारले व हंसू लागले. “ तो काय मदत करणार तुम्हांला ? जनतेचं पुढारीपण आतां त्याच्याकडे राहिलंय कुठें ? आतां लोकांचे पुढारी हा बंडबा, हे सिद्रामाप्पा—”

“ छे छे दादा, तसं नाहीं. आम्ही जें काय योजिलं आहे त्यांत प्रभाकर असतील तरच—”

“ आतां काय योजलं आहांत ? ”

“ गांधींचं मोठं स्मारक करायचं आहे—”

“ अरे, ते स्मारक झालंसुद्धां ! या साठ मैलांच्या टापूंत जीं ब्राह्मणांचीं घरं जाळलीं गेलीं त्यांच्या काळवंडलेल्या पडक्या भिंती, उघडे चौथरे, हें गांधींचं केवढं स्मारक उभारलं गेलं !—”

“ पुन्हां तुम्ही छेडायला लागलांत दादा. जें झालं गेलं तें विसरा असं म्हणायसाठीं आम्ही आलों म्हणून सांगितलं ना तुम्हांला ? निशाणीला गांधींचं खूप मोठं स्मारक उभं करायचं आम्हीं ठरविलं आहे. त्यासाठीं कार्यकर्त्यांची एक लहान सभा आज संध्याकाळीं म्युनिसिपालिटीच्या हॉलमध्यें आम्ही घेणार आहोंत, आणि उद्यां संध्याकाळीं गांधी चौकांत जाहीर सभा बोलावली आहे. प्रभाकर असतील तरच या दोन्ही सभा यशस्वी होतील. म्हणून त्यांना आग्रह करायसाठीं आम्ही आलोंय. ते आम्हांला नकार देणार नाहींत अशी आमची खात्री आहे. ”

“ ही तुमची खात्री बरोबर आहे. ” दादा टोचून बोलण्याच्याच स्वरांत म्हणाले, “ तुम्ही प्रभाकरला बरोबर ओळखलेलं आहे, याबद्दल तुमची तारीफ केली पाहिजे. येईल प्रभाकर इतक्यांत, बसा. ” असं म्हणून दादांनीं आपलं भस्म खलण्याचं काम सुरू केलं...प्रभाकर आल्यावर या मंडळींचं काम कळल्याबरोबर तो त्यांच्याबरोबर निशाणीला जाईल याबद्दल

त्यांना शंका नव्हती. आणि जाऊं नकोस असं प्रभाकरला आपण म्हणायचं नाहीं असं त्यांनीं मनाशीं ठरविलं होतं.

त्यामुळें प्रभाकर त्या मंडळींच्या बरोबर गेला तेव्हां त्यांना आश्चर्य वाटलं नाहीं.

निशाणीस होणाऱ्या स्मारकासाठीं प्रभाकरनं दहा हजार रुपयांचा आंकडा टाकल्याचं त्यांना कळलं तेव्हांही त्यांना आश्चर्य वाटलं नाहीं, किंवा प्रभाकरनं एवढी मोठी देणगी दिल्याबद्दल त्यांनीं त्याच्याशीं वादहि घातला नाहीं. इतकंच नव्हे तर प्रभाकरच्या आग्रहावरून ते दुसऱ्या दिवशींच्या गांधी चौकांतील जाहीर सभेलादेखील गेले. त्यांचीं स्वतःचीं मतं प्रभाकरच्या मतांहून अगदीं वेगळीं होतीं; तरी पण त्या जाहीर सभेंतलं प्रभाकरचं भाषण ऐकतांना त्यांना वाटूं लागलं, प्रभाकर म्हणतो त्यांतसुद्धां तथ्य आहे.

पांच हजार लोकांच्या त्या सभेपुढें गांधीस्मारकाबद्दल भाषण करतांना कॉंग्रेसच्या अनत्याचाराच्या मार्गानंच देशाला स्वातंत्र्य कसं मिळालं, आणि या मार्गानं देशांतली सारी जनता यापुढें गेली तरच स्वातंत्र्याचीं फळं साऱ्या लोकांना उपभोगायला कशीं मिळतील याचं विस्तारपूर्वक विवेचन प्रभाकरनं केलं. नुकत्याच झालेल्या जाळपोळीचा उल्लेख करून तो म्हणाला,

" जे प्रकार झाले ते फार वाईट झाले, याबद्दल विचारी माणसांत दुमत होणार नाहीं. ज्यांनीं ते प्रकार केले त्यांनासुद्धां आज होत नसला तरी केव्हां तरी पश्चात्ताप होईल. धर्मद्वेष, जातिद्वेष इत्यादि अमंगल भावना गाडून टाकून सारे भारतीय सलोख्यानं, एकोप्यानं वागले तरच देशाचं स्वातंत्र्य आपल्याला टिकवितां येईल, व त्या स्वातंत्र्यांतून संपन्नता निर्माण करतां येईल. गतकालांत कोणत्या धर्मानं, जातीनं, अगर प्रांतानं किती देशद्रोह केला, कोणत्या जातीनं इतर जातींवर किती जुल्म केला, याच्या आठवणी आपण काढूं लागलों अन् सूड घ्यायला लागलों तर एकमेकांचे हिशोब देतां घेतां आपण सारेच नामशेष होऊं. पूर्वीच्या इतिहासाकडे पाहून एकमेकांचं वैर करायचं म्हटलं तर बदला घेण्यांतच आपली सगळ्यांची ताकद संपेल. यापुढचा इतिहास आपल्याला घडवायचा आहे,

हें आपण लक्षांत ठेवायला हवं. मत्सरानं, द्वेषानं बरबटलेल्या हातांनीं हा इतिहास घडवितां येणार नाहीं. ज्यांनीं बंधुभावाची, अनत्याचाराची, खऱ्या देशभक्तीची प्रतिज्ञा केली आहे अशा लाखों नव्हे कोट्यवधि लोकांचे हात काम करतील, तेव्हांच तो उज्ज्वल इतिहास घडविला जाईल! गांधीजींची आठवण ठेवायची याचा अर्थ या विचाराची आठवण ठेवायची! ही आठवण तुम्हीं आम्हीं ठेवली तर स्वतंत्र झालेला आपला मायदेश बलवानही होईल! न ठेवली तर स्वातंत्र्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं! तें मिळूनही न मिळाल्यासारखं ठरेल! उजाडलं, पण सूर्य कुठें आहे, असं विचारण्याचा लाजिरवाणा प्रसंग आज आला आहे, तो कधीं संपणार नाहीं!...”

❁ समाप्त ❁